# "छत्रपती शाहू महाराज यांच्या जीवन कार्याचा चिकित्सक अभ्यास - १६८२ ते १७४९"



डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या
सामाजिक शास्त्रे विद्याशाखा–अंतर्गत पीएच. डी. (इतिहास)
या पदवीकरिता सादर करण्यात आलेला

**शोध-प्रबंध**


**✱ संशोधक ✱**
सुर्यवंशी दिपक वामनराव

**✱ मार्गदर्शक ✱**
डॉ. एस. बी. देशमुख
**प्रपाठक (निवृत्त)**
**ऐतिहासिक वस्तुसंग्रहालय प्रमुख,**
**इतिहास विभाग,**
**डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ,**
**औरंगाबाद.**


**मार्च - २००८**

IV

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद



## प्रमाण-पत्र

प्रमाणित करण्यात येते की, सुर्यवंशी दिपक वामनराव यांनी "छत्रपती शाहू महाराज यांच्या जीवन कार्याचा चिकित्सक अभ्यास - १६८२ ते १७४९" या विषयावर हा शोध–प्रबंध डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद यांच्या सामाजिकशास्त्रे विद्याशाखा–अंतर्गत इतिहास विषयातील पीएच.डी. पदवीसाठी सादर केला आहे.

प्रस्तुत शोध–प्रबंध त्यांनी माझ्या मार्गदर्शनाखाली स्वतः लिहिला असून, तो इतर कोणत्याही विद्यापीठाच्या पदवी किंवा पदविकेसाठी सादर केलेला नाही.

ठिकाण :– औरंगाबाद.

दिनांक :– १२/०३/२००८

मार्गदर्शक

डॉ. एस. बी. देशमुख

प्रपाठक (निवृत्त)

ऐतिहासिक वस्तुसंग्रहालय प्रमुख,

इतिहास विभाग,

डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ,

औरंगाबाद.

# प्रतिज्ञा पत्र

मी प्रतिज्ञापूर्वक निवेदन करतो की, "छत्रपती शाहू महाराज यांच्या जीवन कार्याचा चिकित्सक अभ्यास - १६८२ ते १७४९" हा शोध-प्रबंध स्वतः लिहिलेला असून तो डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद यांच्या सामाजिक शास्त्रे विद्याशाखा-अंतर्गत इतिहास विषयातील पीएच.डी. पदवीसाठी सादर केला आहे.

हा शोध-प्रबंध यापूर्वी कोणत्याही पदवी अथवा पदविकेसाठी सादर केलेला नाही.

ठिकाण :- औरंगाबाद.

दिनांक :- १८/०३/२००८

Deepak

संशोधक

**सुर्यवंशी दिपक वामनराव**

# ऋणनिर्देश

प्रस्तुत संशोधनासाठी ज्यांचे मला मार्गदर्शन लाभले ते माझे संशोधन मार्गदर्शक, गुरुवर्य डॉ. एस. बी. देशमुख (निवृत्त प्रपाठक व ऐतिहासिक वस्तुसंग्रहालय प्रमुख) इतिहास विभाग, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद यांचे ऋण मी प्रथम व्यक्त करतो. त्यांचे सहकार्य व मौलिक मार्गदर्शन यामुळेच हे संशोधन कार्य पूर्ण होऊ शकले. त्यांचा मी आजन्म ऋणी राहिल.

या संशोधन कार्यात मला ज्यांचे मोलाचे सहकार्य व मार्गदर्शन लाभले असे प्रा. शिंदे बी. ई. (विभाग प्रमुख), डॉ. बगाडे यु. आर., डॉ. गवळी पी.ए., डॉ. चौधरी बी. व्ही., प्रा. पुष्पा गायकवाड, प्रा. बोराडे मॅड्म आणि विभागातील व ऐतिहासिक वस्तुसंग्रहालयातील श्री. सोन्ने के.ए. (काका), मंडळकर ए.के., बलखंडे एस. एस., पेरकर एस. के., मानपुरे ए.जी., चौधरी एम. आर., पाखरे एस.पी. यांचा मी ऋणी आहे.

या संशोधन कार्य पूर्ण करण्यासाठी ज्यांच्याकडून मोलाची प्रेरणा आणि प्रोत्साहन दिले ते डॉ. व्ही. एच. बजाज (विभाग प्रमुख), डॉ. कावळे एस. व्ही., संख्याशास्त्र, डॉ. बा. आं. म. वि., औरंगाबाद. प्रा. जाधव पी. के., डॉ. लांडे पाटील टी. आर., विवेकानंद महाविद्यालय, औरंगाबाद, श्री. ज्ञानोबा मुंडे, डॉ. बिराजदार डी. एस., डॉ. माने डी. व्ही., डॉ. रेडेसर, प्रा. अनिल खसगीकर, शिवाजी महाविद्यालय, उमरगा, प्रा. गावंडे एस. यु., प्रा. करपे राजेश, पैठण, प्रा. पाटील बी. एम. यांचाही मी ऋणी आहे.

माझ्या संशोधन कार्यास संशोधन बाबींच्या पूर्ततेसाठी ज्या संस्थांचे मला सहकार्य लाभले त्यात विद्यापीठ ग्रंथालय, डॉ. बा.आं. म. विद्यापीठ, औरंगाबाद, भारत संशोधन मंडळ पुणे, शासकीय ग्रंथालय, औरंगाबाद, डेक्कन महाविद्यालय, पुणे, राजवाडे संशोधन मंडळ, धुळे यांच्या ऋणात मी सदैव राहील.

या संशोधन कार्यासाठी ज्यांनी मला वेळोवेळी मार्गदर्शन केले व प्रोत्साहन दिले असे, प्रा. रवि खंदारे, प्रा. उमाप सर, डॉ. ओमप्रकाश जाधव, डॉ. मारुती तेगमपुरे, डॉ. संतोष बोडके, डॉ. आशुतोष देशमुख, प्रा. प्रकाश महाजन, डॉ. उमाकांत राठोड,

सुनिल मदनसुरे (भैय्या), तुषार कांबळे, ॲड. कार्तिक मुंडे, नागेश बावलगावे, उमेश जाधव, दत्ता जाधव, भाऊसाहेब झिरपे, कैलाश भरकड, विवेकानंद चव्हाण, नागेश गरजे, डॉ. प्रविण खरात, दिपक गायकवाड, तनवीर पठाण, विकास हुंबे, रवि गात, अनिल लोहार, डॉ. रणखांब, अतुल चोरपगार, प्रा. बी. बी. शेंडगे, प्रा. गोकुळ सुरासे, सतिश देशमुख, बाळासाहेब शिंदे, लोहगावकर मनमत, लटपटे, सोमनाथ बडे, अनिकेत मुळे, प्रशांत पांगरीकर, शंतनु चव्हाण, सचिन चव्हाण, जीवन सोळुंके यांच्या सहकार्याबद्दल मी त्यांचा ऋणी राहिल.

ज्यांच्या नैतिक पाठिंब्यावर व मौलिक सहकार्यावर मी हे संशोधन पूर्ण करु शकलो असे माझे मित्र सुनिल सुर्यवंशी, धनराज माने, बलवान जाधव, विकास जाधव, रवि ढोले, जनार्धन माने, धनवान पाटील, संदिप पाटील, शरद धुमाळ, अर्जुन माने, गणेश माने, रमेश माने, गुणवंत बिराजदार, गजानन, पवार, बद्रीनाथ यांचे ऋण व्यक्त करणे मी माझे कर्तव्य समजतो.

निसर्गावर अवलंबून असणाऱ्या शेतीवर ज्यांनी अहोरात्र काबाड कष्ट करुन शिकविण्यासाठी अनंत अडचणीवर मात करुन खंबीरपणे माझ्या पाठीमागे उभे राहिले ती माझी आजी धनाबाई व्यंकटराव सुर्यवंशी, माझे वडील श्री. वामनराव व्यंकटराव सुर्यवंशी आई सौ. चंद्रकला वा. सुर्यवंशी, तसेच माझे घरातील सर्व काका-काकी, माझी मावशी व काका तसेच माझ्या बहिणी व माझे बंधु विनोद, विकास, बलवान, व्यंकट, राम, तसेच माझ्या वहिणी यांच्या अनमोल सहकार्याने हा शोध प्रबंध पूर्णत्वास गेलेला आहे. त्यामुळे मी त्यांचे आजन्म ऋणात राहणेच पसंत करतो.

तसेच या प्रबंधाची सुबक मांडणी करणारे श्री. कॉम्प्युटर्सचे श्री. वाघ बंधु यांच्या सहकार्याबद्दल मी त्यांचे ऋण व्यक्त करतो.

**- सुर्यवंशी दिपक वामनराव**
**संशोधक**

# अनुक्रमणिका


| अ. क्र. | प्रकरणाचे नाव | पृष्ठ क्रमांक |
| --- | --- | --- |
| १. | छत्रपती शाहू महाराज यांच्या उदयापूर्वीची परिस्थिती | १ ते ५८ |
| २. | छत्रपती शाहू महाराज यांचे बालपण व त्यांच्या व्यक्तिमत्त्व विकासाचा इतिहास | ५९ ते १०५ |
| ३. | छत्रपती शाहू महाराज यांच्या काळातील मराठ्यांचा साम्राज्य विस्तार | १०६ ते १९८ |
| ४. | छत्रपती शाहू महाराज त्यांच्या राजकीय व प्रशासकीय कामगिरीचे अध्ययन | १९९ ते २५४ |
| ५. | छत्रपती शाहू महाराज यांची सामाजिक व सांस्कृतिक कामगिरी | २५५ ते २७८ |
| ६. | निष्कर्ष | २७९ ते २९४ |
|  | संदर्भ ग्रंथ सूची | २९५ ते ३०७ |
|  | परिशिष्ट्ये<br>अ) शाहूंची पत्रे ब) छायाचित्रे | -- |

प्रकरण पहिले

# छत्रपती शाहू महाराज यांच्या उदयापूर्वीची परिस्थिती


१.१ प्रस्तावना

१.२ राजकीय परिस्थिती

१.२.१ राष्ट्रीय परिस्थिती

१.२.१.१ औरंगजेब

१.२.२ प्रादेशिक परिस्थिती

१.२.२.१ मालोजी राजे

१.२.२.२ शहाजी महाराज

१.२.२.३ छत्रपती शिवाजी महाराज

१.२.२.४ छत्रपती संभाजी महाराज

१.२.२.५ छत्रपती राजाराम महाराज

१.२.२.६ महाराणी ताराबाई

१.३ सामाजिक परिस्थिती

१.४ आर्थिक परिस्थिती

१.५ धार्मिक व सांस्कृतिक परिस्थिती

१.६ संशोधनाची आवश्यकता

१.७ संशोधन पद्धती

१.७.१ प्रकाशित सामग्रीचा आढावा

१.७.२ कागदपत्रांचे विश्लेषण

१.७.३ वाङ्मयीन साधने

१.७.४ ऐतिहासिक संशोधन पद्धती

१.७.५ वर्णनात्मक आराखडा.

## १.१ प्रस्तावना:-

मराठ्यांचा इतिहास हे भारताच्या इतिहासातील एक सोनेरी पर्व आहे. मराठ्यांचा इतिहास हा या देशाच्या इतिहासातील मैलाचा दगड आहे. हा टप्पा वगळून देशाच्या इतिहासाला पूर्णत्व येणे शक्य नाही. मध्ययुगातील या महत्त्वपूर्ण पर्वातील मराठ्यांच्या स्वराज्याचे साम्राज्यात रुपांतर करणारे छत्रपती शाहू महाराज यांचे कार्य लक्ष वेधून घेते.

इतिहासात अशी अनेक उदाहरणे आहेत की, प्रतिकूल परिस्थिती असताना देखील त्या त्या परिस्थितीवर मात करुन महापुरुषांनी आपले साम्राज्य निर्माण केले आहे. कार्लाईलने म्हटलेच आहे की, 'महापुरुषांची चरित्रे हा अर्धा इतिहास असतो.' महापुरूषच आपल्या कर्तृत्वाने इतिहासाला कलाटणी देतात. म्हणून इतिहासाच्या शास्त्रीय अभ्यासामध्ये महापुरुषांच्या चरित्र व कार्यास विशेष महत्त्व असते. कारण इतिहास अशा महापुरुषांच्या कर्तृत्वशाली योगदानामुळे समृद्ध बनत असतो. याच परंपरेतील छ. शाहू महाराज हे मध्ययुगातील मराठ्यांच्या इतिहासाला आपल्या कर्तृत्वाने वेगळी कलाटणी देणारे महापुरुष होते. या महापुरुषांचे जीवनकार्य, उदय व विकास याचा अभ्यास करताना मराठ्यांच्या पराक्रमाचा इतिहास तसेच शहाजी राजे भोसले यांच्यापासून ते छ. राजाराम महाराज (ताराबाई) पर्यंत इतिहासाची पार्श्वभूमी अभ्यासावी लागते. मराठ्यांच्या कालखंडात समाज, धर्मपरिवर्तनासाठी महाराष्ट्रातील संत परंपरेचा थोडक्यात आढावा घेतला आहे. ही पार्श्वभूमी अभ्यासताना छ. शाहू महाराजांचे कार्य हे प्रतिकूल परिस्थितीत प्रदर्शनास येते. मध्ययुगामध्ये परिस्थिती प्रतिकूल असूनही मराठ्यांनी भारतीय स्वातंत्र्य लढ्यात मोलाचे योगदान दिले. छ. शिवाजी महाराजांनी मराठ्यांना जागृत करून स्वराज्य निर्माण केले व तूर्क, मोगल व्याप्त इतिहासाची चार दशके विसरायला लावून भारतीयांना आत्मविश्वास मिळवून दिला. त्यानंतर छ. संभाजी महाराज, रणरागीनी ताराबाई, संताजी व धनाजी यांनी मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध चालविले. पुढे शाहूची सुटका होऊन छत्रपती झाल्यावर इ.स. १७०८ ते १७४८ या कालखंडात त्यांनी मराठी राज्याचे साम्राज्यात रुपांतर करण्यासाठी यशस्वी वाटचाल केली. त्यांनी आपल्या सेनापती, पेशवे, सरदार यांच्या साह्याने संपूर्ण उत्तर भारतामध्ये मराठी सत्तेचा विस्तार केला. त्यात गुजरात, माळवा, कर्नाटक, बुंदेलखंड, उत्तरप्रदेश येथे मराठी सत्तेचा विस्तार घडवून आणला व हे करताना मोगलांच्या केंद्र सत्तेवर मराठ्यांचे वर्चस्व प्रस्थापित केले. बादशहावर अंकुश

लादून त्याच्याकडून चौथाई व सरदेशमुखीच्या सनदा मिळविल्या. छ. शाहू महाराजांच्या कर्तृत्वामुळे मराठ्यांमध्ये एकी निर्माण झाली.

या पायावर १८व्या शतकात मराठ्यांनी जी झेप घेतली तिला देशाच्या इतिहासात तोड नाही. तंजावर पासून ते अटकेपर्यंत व बंगालपासून ते गुजरात पर्यंत देशाच्या सर्व भागात मराठ्यांचा मुक्त संचार झाला. हळूहळू मराठ्यांच्या हातात सत्तेची सूत्रे आली. पुढे १९व्या शतकात भारतात इंग्रजी अंमल सुरु होईपर्यंत मराठे हेच खऱ्या अर्थाने देशाचे रक्षक बनले होते.

मराठ्यांच्या इतिहासातील कर्तृत्ववान महापुरुषांमध्ये छ. शाहू महाराज यांचा समावेश होतो. त्यांचा जन्म ता. १५ जानेवारी १६८२ रोजी झाला. त्यांची राजकीय कारकीर्द इ.स. १७०८ ते १७४८ पर्यंतची होती व मराठ्यांच्या इतिहासात सर्वात जास्त काळ राज्य करणारे ते एकमेव छत्रपती शाहू महाराज होय. भेद-नितीचा प्रादूर्भाव करण्याच्या दृष्ट हेतूने शाहूची सुटका करण्यात आली; परंतु शाहू महाराजांनी हा हेतू साध्य होऊ दिला नाही व मराठ्यांचे राज्य लयाला जाऊ दिले नाही. त्यांच्या काळात मराठी साम्राज्याच्या विकासाचा आलेख सतत वाढतच होता. त्यांचे सर्वात महत्त्वाचे कार्य म्हणजे त्यांनी मराठ्यांमध्ये कधीही फूट पडू दिली नाही. छ. शाहू महाराज हिंदू धर्माचे अभिमानी होते पण मुस्लीम धर्माच्या विरोधी नव्हते. ब्रम्हेंद्रस्वामी, कचरेश्वर बाबा या सारख्या संतपुरुषाबद्दल छ. शाहू महाराजांना आदर होता. ब्रम्हेंद्रस्वामी यांना ते गुरुस्थानी मानत.

छ. शिवाजी महाराजांनी स्थापिलेल्या मराठी राज्याची शान त्यांनी राखली. लहानपणापासून ते आयुष्याच्या शेवटपर्यंत वैयक्तिक जीवन सुखात गेले असे नाही. बालपणी मुघलांची कैद, तेथून सुटका झाल्यावर आप्तस्वकीयांशी सत्तेसाठी संघर्ष, मराठा सरदारांमधील वैमनस्य व खाजगी जीवनातील नैराश्य असा त्यांच्या जीवनातील प्रवास होता. परंतु शाहू महाराजांनी तोल सुटू दिला नाही. आपल्या स्वभावाच्या जोरावर त्यांनी सर्वांना सामावून घेवून स्वराज्याची धूरा सांभाळली. आपल्या कर्तृत्वाची छाप केवळ मराठ्यांच्या इतिहासातच नव्हे तर भारताच्या इतिहासावर सोडली. छ. शाहू महाराजांनी आपल्या अंगी असणाऱ्या उत्तम गुणांनी व कर्तृत्वाने हिंदुस्थानच्या इतिहासात महत्त्वपूर्ण स्थान मिळविले होते. मराठ्यांच्या राज्याची सेवा त्यांनी प्रामाणिकपणे केली.

त्यांनी प्रत्यक्ष बादशहावर कधीही शस्त्र उगारले नाही किंवा बादशहास संपविले नाही. पण बादशहावर अंकुश निर्माण केला. हे करताना मराठी राज्याच्या हितसंबंधाचे रक्षण करणे हाच प्रमुख हेतू असे. छ. शाहू महाराजांनी राज्य कारभाराची घडी जी विस्कटली होती, ती सावरुन त्यात स्थिरता आणली.

छ. शाहू महाराजांनी राज्यकारभारात योग्य माणसांचा योग्य ठिकाणी वापर केला. शाहूंचा स्वभाव अत्यंत मनमीळावू व नि:स्पृह असल्याने त्यांचा धाक निर्माण झाला होता. चिटणीसांच्या बखरीतील उद्‌गार उल्लेखनीय आहेत. ''मनुष्य मात्रास कृपामतता लावून वेध लाविला. सर्वांस वाटावे की, आपले इतकी कृपा कोणावर नाही. तैनाता, नेमणुका, जमिनी, इनामे ज्याच्यापासून ज्या कामात उपयोग त्यात एखादा अवगुण आहे, तरी युक्तीने झाकून तो त्याजपासून सोडवावा. गुण तितका प्रकट करून द्यावा. माणसे वाढवावी. याप्रमाणे राज्याची उदयकाल वृद्धी व्हावी हे समजून...यथास्थित संगोपन करुन माणसांचा गुणग्रहणच बहुत केला. आपलेसे करून वेधास लाविले. प्रौढ माणसे सर्वकाळ सहवासात असतील त्यांच्या युक्ती व बुद्धी ऐकत असावे. सर्वांचा विचार करून कार्ये करीत असावे...पुर्वी विस्कळीत प्रसंगी चांगली माणसे, मातब्बर लोक परराज्यात गेले, ते प्रयत्नाने आणून, सेवेत त्यांचे बंदोबस्त करून ठेविले. गोरगरीब फिर्यादीस उभे राहिले असता, स्वारीत पालखी उभी करून अगर मजालसनीत ऐकून घेऊन समक्ष आज्ञा लागलीच सांगावी. न्याय प्रकरणाकडे सांगावयाचे असेल तर त्याजकडे सांगावे. वाजवी ते होऊन कोणास वावगा उपद्रव लागू नये, असे केले. उग्र दंड करावयाचा नाही.''

यावरून शाहूंचा स्वभाव, राज्यकारभाराची दृष्टी, माणसांची पारख व न्यायदानाविषयी धोरण आपल्या लक्षात येते.

राजकारणात आवश्यक असणारा कणखरपणा, कठोरपणा शाहूंच्या प्रकृतीतच नव्हता. परंतु तरीही योग्य माणसावर योग्य कामगिरी सोपवून शाहू महाराजांनी आपले संयमी धोरण चालविले. आपल्या समंजस, शांत स्वभावाला फाटा देवून शाहू महाराजांनी बाजीरावाच्या आक्रमक धोरणास पाठींबा दिला व मराठ्यांच्या राज्याचा विस्तार घडवून आणला. असे अनेक प्रसंग आले की, शाहू महाराज्ञांनी पेशव्यांच्या सर्व धोरणांना पाठींबा दिला नाही. थोडक्यात, मराठी स्वराज्य ते साम्राज्य यांना जोडणारे ते दुवा होते.

अशा परिस्थितीत छत्रपतींचे भरभक्कम मध्यवर्ती स्थान मराठा मंडळाच्या दृष्टीने आवश्यक होते. शाहूंच्या मृत्यूमुळे हे स्थान खिळखिळे झाले.

छ. शाहू महाराजांचे वेगळेपण अजून एका गोष्टीमधून स्पष्ट होते. त्यांच्या मुत्सद्दी पणाची दाद द्यावी; अशी गोष्ट म्हणजे त्यांनी पेशवे व इतर मराठे सरदार यांच्यात सत्तासंघर्ष होता. परंतु त्यांनी तो पराकोटीला जाऊ दिला नाही. म्हणूनच मराठा राज्याचा विस्तार होऊ शकला. शाहूंचा सर्वात मोठा गुण म्हणजे त्यांचा सौम्य स्वभाव व संघटनाचातुर्य या गुणांच्या आधारेच त्यांनी मराठा राजमंडळातील बलिष्ठ सरदारांना एका सूत्रात बांधून त्यांच्याकडून महत्त्वाच्या कामगीऱ्या करवून घेतल्या. गुणग्राहकता या गुणाच्या जोरावर शाहू महाराजांनी स्वत:भोवती गुणी माणसांचे कडेच तयार केले. शाहू महाराजांना 'पुण्यश्लोक' म्हणतात ते त्यांच्या दयाळू स्वभावामुळेच शाहू महाराजांच्या कर्तृत्त्वाचे मूल्यमापन करताना सरदेसाई गो.स. लिहितात,

"Shahu succeeded in achieving brilliant results through a mild persuasive policy by rigid justice and good will towards."

छ. शाहू महाराज यांचे राजकीय कर्तृत्त्व फार मोठे आहे. छ. शाहूं महाराजांच्या काळातच मराठी साम्राज्याचा विस्तार झाला. छ. शाहू महाराज यांच्या काळात मराठ्यांस मिळालेल्या स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखीच्या सनदा (ता. २४ मार्च १७१९) तसेच निजामावरील नियंत्रण, वारणेचा तह (एप्रिल १७३१), गोवेकरावरील विजय, उत्तर भारतात निर्माण होत असलेली मराठी सत्तेची नवीन केंद्रे, गुजरात, माळवा, कर्नाटक, बुंदेलखंड व उत्तर प्रदेश होय. हे करतांना छत्रपती पद मिळविण्यास आलेल्या अडचणी व त्यावर मात करून छत्रपती पद मिळवून सातारा येथे निर्माण केलेली मराठी साम्राज्यांची राजधानी व प्रारंभिक विजय व राज्यकारभार यांचा आढावा घेतला असता शाहू महाराजांच्या कर्तृत्वाचा आढावा आपल्या लक्षात येतो. त्यांचे राजकीय कर्तृत्व व मुत्सद्देगीरी लक्षात येते.

छ. शाहू महाराज यांचे सामाजिक व सांस्कृतिक कार्य उल्लेखनीय आहे. कला, साहित्य, धर्म व संस्कृती विषयी असणाऱ्या कार्यावर प्रकाश टाकला असता त्यांचे या क्षेत्रातील योगदान समजते. सातारा जिल्ह्याच्या गॅझेटिअर मधील उल्लेखानुसार "सातारा शहराच्या सौंदर्यात छ. शाहू महाराजांनी भर घातली. नवीन पेठा वसवल्या. करंजे येथे

बागा लावल्या, विविध प्रकारची फळझाडे व फुलझाडे येथे लावली.'' छत्रपती शाहू महाराज यांनी कवी, संगीतकार, ज्योतिष विद्वान, कलाकार यांना सदैव आश्रय दिला व मदत केली. सांस्कृतिक क्षेत्रातही छ. शाहू महाराजांनी एक वेगळा ठसा उमटविला होता.

छ. शाहू महाराजांचे संस्कारमय वय हे मुघलांच्या सानिध्यात गेल्याने शिकारीचा शौक, छंद बाळगणे, पशुपक्ष्यांची आवड, संगीत, नृत्य, बागबगीचा यांची आवड या अन्यथा मराठी राजकुलात फारशा न दिसणाऱ्या गोष्टी शाहूंच्या जीवनात असल्या तरी त्यांचे खाजगी जीवन मात्र शुद्ध आणि पवित्र होते.

छ. शाहू महाराजांच्या कारकिर्दीचा सातत्याने विचार केला तर ती भरभराटीची गेली असे म्हणता येईल. कोणतीच व्यक्ती संपूर्ण तथा निर्दोष असू शकत नाही. शाहूंचा स्वभाव मराठ्यांना महागात पडला असे चित्र निर्माण केले जाते. त्यांच्या सनातनी वृत्तीचा ठसा त्यांच्या राजकारणावर पडला होता व 'जुने मोडू नये आणि नवे करू नये' या तत्त्वांचा सातत्याने पुरस्कार केल्याने त्यांचे प्रशासन धडाडीचे अथवा प्रागत झाले नाही, असा ठपका ठेवण्यात येतो. असे जरी असले तरी त्या परिस्थितीत शाहूंनी दाखविलेली मुत्सद्दी वृत्ती, संयम, योग्य माणसांवर योग्य काम या धोरणामुळे मराठ्यांच्या राज्याची भरभराट झालेली आपणास दिसून येते. सरदेसाई म्हणतात त्याप्रमाणे अठराव्या शतकाच्या पुर्वार्धात मराठी राज्यात छ. शाहू महाराजांनी नवा जोम उत्पन्न केला आणि सर्व हिंदुस्थानभर मराठ्यांच्या नावाचा दरारा बसविला. हा पराक्रम काही लहान नव्हे, हे अगदी योग्य आहे. शाहूंच्या निधनानंतर मात्र शिवाजी महाराजांचा वारसा चालविण्याची परंपरा संपली असेच म्हणावे लागेल.

थोडक्यात छ. शाहू महाराज यांचे संपूर्ण जीवन हे संघर्ष, सेवा व समर्पण या भावनेने भरलेले होते. मोगली सत्तेवर वर्चस्व प्रस्थापित करून त्यांनी मराठ्यांना उत्तर भारतात नवीन कार्यक्षेत्र निर्माण करून दिले. छ.शाहू महाराजांनी नेहमीच सामुदायीक हीत जोपासण्याचा प्रयत्न केला. त्यांनी वेळोवेळी आपल्या मुत्सद्दीपणाचा परिचय दिलेला आहे. त्यांनी मराठी सत्तेचा विस्तार केला व त्यासाठी प्रथम त्यांनी मराठी सरदारांना एका सूत्रात गुंफण्याचा प्रयत्न केला. छ. शाहू हिंदू धर्माभिमानी होते, परंतु व्यवहारात त्यांनी सर्वधर्म समभाव कटाक्षाने पाळला. छ. शाहू महाराजांनी सरदारांना जेवढे स्वातंत्र्य दिले तेवढेच त्यांच्यावर वचकदेखील ठेवले. माणसांची ओळख करण्याचं कसब त्यांच्याजवळ

असल्यामुळे योग्य माणसांवर योग्य जबाबदारी त्यांनी टाकली व व्यक्तीच्या कर्तृत्वाला न्याय देण्याचा प्रयत्न केला.

छ. शाहूंनी केवळ राजकीयच नव्हे तर तत्कालीन समाजजीवनात, कला व संस्कृतीतही महत्त्वाचे योगदान घडविले. तसेच राजकारणाबरोबर सामाजिक व धार्मिक क्षेत्रातही मोलाची कामगिरी केली. मराठी सत्तेला सर्व क्षेत्रात त्यांनी यश मिळवून देण्याचा प्रयत्न केला. छ. शाहू महाराजांच्या उद्यापूर्वीची परिस्थिती अभ्यासली असता त्यांनी किती कठीण परिस्थितीत आपले कर्तृत्त्व दाखविले हे लक्षात येते.

छ. शाहू महाराजांनी तत्कालीन मराठी राज्यांच्या कल्याणासाठी प्रयत्न केले. व खऱ्या अर्थाने छ. शिवाजी महाराजांचा वारसा चालविला व स्वराज्याचे साम्राज्यात रुपांतर केले. मराठी सत्तेला यशोशिखरावर नेणारे ते शेवटचे छत्रपती होत.

## १.२ राजकीय परिस्थिती:-

१७ व्या शतकात भारतात सर्वात प्रबळ अशी केंद्रीय सत्ता होती, ती म्हणजे मोगल सत्ता म्हणून अस्तित्वात होती. मोगल सत्तेचे केंद्र दिल्ली येथे होते. शहाजहाननंतर दिल्लीच्या तख्तावर औरंगजेब बादशहा म्हणून विराजमान झाले होते. याचा राजकीय प्रभाव मराठ्यांच्या इतिहासावर झाला. जवळ-जवळ २५ वर्ष औरंगजेब दक्षिण भारतामध्ये होता. स्वाभाविकच याचा मराठ्यांच्या राज्यावर परिणाम झाला.

### १.२.१ राष्ट्रीय परिस्थिती :-

#### १.२.१.१ औरंगजेब -

औरंगजेबाचा इतिहास हा हिंदुस्थानच्या इतिहासातील जवळ-जवळ ६० वर्षाचा इतिहास आहे. त्याच्या स्वत:च्या कारकीर्दीमध्ये (इ.स. १६५८-१७०७) सतराव्या शतकाच्या उत्तरार्धाचा अंतर्भाव होतो. आपल्या देशाच्या इतिहासामध्ये हा कालखंड सर्वात महत्त्वाचा कालखंड मानला जातो. या कालखंडात औरंगजेबाच्या नेतृत्वाखाली मोगल साम्राज्याचा जास्तीत जास्त विस्तार घडून आला आणि हिंदुस्थानच्या इतिहासात ब्रिटीश सत्तेच्या उदयापर्यंत कधीही अस्तित्वात न आलेले एक विशाल व एकसंघ साम्राज्य प्रस्थापित झाले. औरंगजेब ज्यावेळी दिल्लीच्या गादीवर बसला, त्यावेळी मोगल साम्राज्याने वैभवाचा व सत्तेचा कळस गाठलेला होता.

पहिला आलमगीर म्हणून दिल्लीच्या तख्तावर बसलेला मोहिउद्दीन मोहम्मद औरंगजेब हा मुमताजमहल आणि शहाजहान यांचा सहावा मुलगा, त्याचा जन्म पंधरा जिंगदा (Zigada) १०२७ हिजरी (ता. २४ ऑक्टोबर १६१८) या तारखेला रात्री दोहद या ठिकाणी झाला.[१]

ता. १३ डिसेंबर १६३४ रोजी त्याची १० हजारी मनसबदार म्हणून नेमणूक या पदावर झाली आणि मोगल दरबारातील प्रतिष्ठित उमरावांत त्याला स्थान प्राप्त झाले.[२] औरंगजेबाला पुढे दक्षिणेची सुभेदारी मिळाली. विशेषत:शहाजहान व औरंगजेब हे दोघेही दक्षिणेचा अनुभव घेऊन राज्यकारभारास लायक झाले. औरंगजेबाचे बहुतेक आयुष्य दक्षिणेत गेले. दक्षिण देश काबीज करणे हे त्याने आपल्या आयुष्याचे महत्त्वाचे कर्तव्य मानले होते, पण दुर्दैवाने ते तडीस गेले नाही, त्यात केवळ त्याच्या जीवनाचाच नाही तर संपूर्ण मोगल सत्तेचा जवळजवळ ऱ्हास झाला होता.

शहाजहान एकाएकी आजारी पडला. शहाजहानच्या मुलामध्ये बादशाहीसाठी वारसा युद्धास सुरुवात झाली. यामध्ये औरंगजेबाचा विजय झाला. त्याने आपल्या सर्व भावांना ठार मारले व वडील शहाजहान यांना आग्रा येथे कैदेत ठेवले. ता. २१ जुलै १६५८ रोजी त्याने 'आलमगीर गाजी' अशी पदवी धारण करुन स्वत:ला बादशहा म्हणून राज्यभिषेक करुन घेतला.[३]

राज्यभिषेकानंतर औरंगजेबाची पहिली काही वर्षे शांततेत गेली. इराण, बुखारा, अरबस्तान, अबिसीनिया येथील राजांकडून त्याच्या अभिनंदनार्थ मोठ्या थाटाने वकील आले, त्या सर्वांचा उत्तम सत्कार करुन औरंगजेबाने त्यास आपल्या वैभवाने दिपून सोडले.[४] म्हणजे औरंगजेब राजा म्हणून इतर परदेशी राजांनीसुद्धा मान्य केले होते. परदेशी राजांनी आपले वकील हे औरंगजेबाच्या दरबारात पाठविले होते.

औरंगजेबाने राज्य प्राप्त केल्यावर आपल्या डोळ्यांसमोर तीन उद्देश कायमचे ठेवले. पहिला उद्देश म्हणजे अकबरापासून बिघडलेली दरबारची निती सुधारणे, दुसरा उद्देश म्हणजे आतापर्यंत मुस्लिमधर्माची जी पिछेहाट झाली ते बंद करुन जास्तीत जास्त काफर हिंदूंचे धर्मांतर करणे आणि तिसरा उद्देश म्हणजे आपल्या पूर्वजांपासून तडीस गेले नाही ते दक्षिण विजय मिळविणे, यांचे कालमापनावरुन पहिला भाग इ.स. १६५८

पासून इ.स. १६६४, दुसरा भाग इ.स. १६६५ पासून इ.स. १६८१ व तिसरा भाग इ.स. १६८१ पासून इ.स.१७०७ पर्यंतचा म्हणजे औरंगजेबाच्या शेवटपर्यंतचा होय.

औरंगजेबाला दक्षिणेमध्ये सर्वात जास्त विरोध म्हणजे मराठी साम्राज्याचा होता, विशेषत: शिवाजी महाराजांचा. शिवाजी महाराजांनी मोगल सत्तेला सर्व स्तरातून विरोध केला. शिवाजी महाराजांनी जेव्हा सुरतेची लूट केली तेव्हा मोगली सत्तेला खूप मोठा हादरा बसला होता. औरंगजेबाने मराठ्यांच्या बंदोबस्तास मिर्झा राजे जयसिंगास दक्षिणेस पाठविले. त्याने मराठ्यांची कोंडी करून तह करावयास लावला. शिवाजी महाराज व मिर्झा राजे जयसिंग यांच्यात पुरंदराचा तह होऊन, शिवाजी महाराज आग्रा येथे औरंगजेबाच्या भेटीसाठी गेले. पण औरंगजेबाने विश्वासघात करुन त्यांना कैदेत ठेवले. पुढे शिवाजी महाराजांनी कैदेतून पलायन करून परत स्वराज्य बळकट केले. या व्यतिरिक्त दक्षिणेमध्ये मुस्लिम राज्ये होती. उदा. विजापुरची आदिलशाही, गोवळकोंड्याची कुतुबशाही यांचा सुद्धा औरंगजेबाला पराभव करावयाचा होता. कारण ती शिया पंथीय होती.

सुरुवातीस औरंगजेबाने आपला मुलगा शहाआलम यास २०ते ४० हजार सैन्य देऊन दक्षिणेत रवाना केले. याला तोंड देण्यासाठी शिवाजी महाराजांनी पूर्ण तयारी केली होती. पण पुढे थोड्याच दिवसात ता. ३ एप्रिल १६८० रोजी रायगडी शिवाजी महाराजांनी देह ठेविला ही बातमी बादशहास समजताच त्याने इ.स. १६८० च्या पावसाळ्यात काफिरी सत्तेचा नाश करण्यासाठी स्वत: दक्षिणेत स्वारीवर जाण्याचे ठरविले. दख्खनच्या मोहिमेवर येण्यापूर्वी बादशहाने आपला एक अधिकारी अब्बू महमद याच्याकरवी दख्खनच्या प्रदेशाची, भूभागाची संपूर्ण माहिती करुन घेतली होती.[५]

दक्षिणेत येण्याचे दुसरे कारण म्हणजे महंमद अकबराने (औरंगजेबाचा मुलगा) दक्षिण हिंदुस्थानात मराठ्यांच्या राजाचा आश्रय घेतल्यामुळे ओरंगजेबाला दक्षिणेकडे येणे भाग पडले. त्याच्या हयातीची २६ वर्षे नियतीने दक्षिणेची म्हणून लिहिली होती आणि हा कालावधी त्याने तंबूत राहून बादशाही खजिना, फौज आणि राज्याची बसलेली घडी यांचा व्यय करण्यात, एवढेच नव्हे तर कधीही न संपणारा आणि यशाचे माप पदरात न पाडणारा असा लढा देऊन स्वत:चे बलिदान करण्यात घालविला.[६] म्हणजे औरंगजेबाचे

महत्त्वाचे उद्देश मराठ्यांच्या साम्राज्याचा ऱ्हास करणे होता. तसेच स्वत:च्या धर्माचा जास्तीत जास्त प्रसार करणे होता.

औरंगजेबाच्या कारकिर्दीचे दोन भाग पाडता येतील ता. २१ जुलै १६५८ रोजी औरंगजेबाने दिल्लीस राज्यरोहण केले आणि ता. २० फेब्रुवारी १७०७ रोजी तो अहमदनगर येथे मरण पावला. म्हणजे त्याच्या कारकिर्दीची जवळ जवळ ५० वर्षे होतात. या पैकी २५ वर्षाचा पहिला भाग उत्तर हिंदुस्थानचा कारभार आणि इ.स. १६८२ पासून पुढील २५ वर्षे दक्षिण हिंदुस्थानचा कारभार असे दोन ठळक विभाग पडतात.

इ.स. १६८२मध्ये औरंगजेब दक्षिणेत आला. त्याचे पाय परत दिल्लीस लागले नाहीत. पंचवीस वर्षे त्याने दक्षिणेत काढली. आपण आपल्या बापाची जी अवस्था केली, तशीच अवस्था आपली मुले करतील अशी धास्ती औरंगजेबाच्या पोटात नेहमी असल्यामुळे कदाचित दिल्लीस परत न जाण्याचा त्याने अगोदरच निश्चय केला असावा. बऱ्हाणपुरास येऊन उतरल्याबरोबर त्याने सर्व हिंदूकडून जिझिया कर वसूल करण्याचे सक्त हुकूम दिले. लोकांनी वाटेल तेवढी नाखुषी दाखविली, पण तिचा उपयोग न होता कर वसुल होऊ लागला. एकट्या बऱ्हाणपुरात सव्वीस हजार रुपये गोळा झाले; असा आधार मिळतो.[७] औरंगजेब दक्षिणेत आल्यावर तात्काळ त्याने प्रथम जिझिया कर सुरु केला हे दिसते.

औरंगजेब दक्षिणेत आला त्यानंतर त्याने मराठ्यांचे एकेक किल्ले घेण्यास सुरुवात केली. पुढे औरंगजेबाने इ.स.१६८६ मध्ये विजापूरचे राज्य खालसा केले. इ.स.१६८७ ला गोवळकोंड्यांचे राज्य औरंगजेबाच्या ताब्यात आले. दोन्ही राज्ये जिंकल्यानंतर औरंगजेबाने आपली नजर छ. संभाजीकडे फिरविली. त्यातच दुर्दैवाने इ.स. १६८९ ला छ. संभाजी महाराज पकडले गेले व त्यांचा क्रुरपणे वध करण्यात आला.

इ.स. १६८९ हे साल मराठ्यांच्या इतिहासातील काळे वर्ष होय. छत्रपती संभाजी महाराज पकडले, त्यांचा वध केला. राणी येसूबाई आणि शाहू राजे यांना कैद केले गेले. राजाराम महाराज देशोधडीस लागले आणि जवळजवळ सर्व मराठी मुलूख जिंकला हे पाहून औरंगजेबास असे वाटले की, छ. शिवाजी महाराजांचे -मराठ्यांचे राष्ट्र नष्ट झाले.

आता फक्त छत्रपती घराण्यातील शेवटचा दूवा राजाराम यांना पकडून ठार केले की दक्षिणेची मोहिम संपली. परंतु दक्षिणेची मोहिम संपली नाही. तीने खुद्द औरंगजेबालाच संपविले.[८]

छ. राजारामाचा अचानक मृत्यू झाला. पुढे ताराबाईने हा मराठ्यांचा लढा सुरू ठेवला. औरंगजेब मराठ्यांचे एक-एक किल्ले जिंकत जात होता. मराठे औरंगजेब परत फिरला की तो किल्ला पुन्हा जिंकून घेत असत. औरंगजेबाला वाटले की, ''मराठी सत्ता नष्ट होण्याची चिन्हे दिसेनात. तेव्हा या दृष्ट जमातीचे निवासस्थान म्हणजे किल्ले, ते जिंकून घ्यावे आणि या कुटिल जमातींची पाळेमुळे खणून काढावी.''[९] या इराद्याने औरंगजेब बादशहाने मराठ्यांची खरी ताकत ही किल्ले आहेत हे समजून ते जिंकण्यास तो निघाला.

औरंगबजेबाने मराठ्यांचे अनेक किल्ले जिंकले. काही फितुरीने तर काही पैसे वगैरे देवून. काही किल्ल्याला औरंगजेब वेढा घालून बसला म्हणजे मराठे छापे घालून त्याची रसद तोडीत असत. त्यामुळे सामान्यत: त्याच्या छावणीत दुष्काळच असे. सैन्याला पगार महिने- महिने मिळत नसे. त्यात पुन्हा किल्ला ताब्यात घेताना किल्लेदाराला पन्नास हजारांपासून दोन लाखांपर्यंत लाच देणे भाग पडे. खाफीखान म्हणतो, ''शहाजहान बादशहाने साठवलेला सगळा खजिना बादशहाने या मोहिमेत ओतला.'' मनुची तर पुढे जाऊन म्हणतो की, ''एवढ्याने भागले नाही म्हणून औरंगजेबाने अकबर, जहांगीर व नूरजहान यांचे साठवलेले खजिने बाहेर काढले व ते वापरले आणि तरीही सैन्याला पगार वेळेवर मिळत नसे.''[१०] सर्वच बाबतीत बादशहाला अपयश येत होते. तरीही त्याने जिद्द सोडली नाही. औरंगजेबाला दक्षिणेत येऊन बरीच वर्षे झाली होती. तरीही तो उत्तरेत जाण्याचा विचार करीत नव्हता. याबाबत मनुची म्हणतो की, ''बादशहाला दक्षिणेच्या युद्धाविषयी पश्चाताप होत असून तो दिल्लीला जाण्यास उत्सुक आहे; तथापि तो जाऊ शकत नाही, याचे कारण तो उत्तरेकडे गेला की, मराठे सर्व दक्षिण जिंकून उत्तरेतील साम्राज्याचेही लचके तोडतील अशी त्याला भीती वाटते.''[११]

औरंगजेब जेव्हा दक्षिणेत आला तेव्हा काही उमराव व शिपाई बादशहा सोबत दक्षिणेत लष्करासोबत आले होते. त्यांना गेली कित्येक वर्षे आपल्या घरादारांचे दर्शन

झाले नव्हते. भीमसेन सक्सेना म्हणतो, ''लष्करात परिस्थिती सर्व प्रकारे विचित्र झाली आणि अनवस्था प्रसंग ओढवला. बादशहा गादीवर आल्यापासून तो एखाद्या शहरात राहिला आहे असे कधीच झाले नाही. सारख्या मोहिमाच मोहिमा चालू झाल्या. त्यामुळे सरदार, सैनिकांना एकाकी जीवन कंठावे लागले. त्यामुळे ते बेजार झाले. त्यांनी आपली बायकामाणसे लष्करात बोलावून घेतली आणि लष्करातच त्यांनी आपला संसार थाटला. तेथेच त्यांना मुले-बाळे झाली. ती लष्करातच मरण पावली. दगडामातीच्या घराची तोंडे काही त्यांच्या दृष्टीस पडली नाहीत. त्यांना हेच वाटे की जगात उत्तम निवासस्थान म्हणजे तंबू होत.''[१२] म्हणजेच औरंगजेबाच्या लष्करातील उमराव व सैनिक यांच्या मोठ्या प्रमाणात हाल होत होते. अनेक माणसे मरण पावली होती तसेच घोडी, बैले, उंट, हत्ती मोठ्या प्रमाणात मृत्यू पावले होते.

औरंगजेब जवळ-जवळ २६ वर्षे दक्षिणेत स्वत: राहून मोहिमा चालवत होता. पण मराठ्यांमध्ये या २६ वर्षांत तीन वेळेस नेतृत्व बद्दल झाला. छ. संभाजी महाराज, छ. राजाराम महाराज व महाराणी ताराबाई असे तीन नेतृत्त्व निर्माण झाले होते. या तिघांनीही औरंगजेबापुढे हाय खाल्ली नाही. प्रत्येकाने आपापल्या जिद्दीने औरंगजेबाशी लढा दिला आणि औरंगजेबाला कुठल्याच मोहिमेवर यश येऊ दिले नाही. मराठ्यांनी आपले स्वातंत्र्य युद्ध शेवट पर्यंत चालू ठेवले.

अशातच औरंगजेबाची अहमदनगरकडे माघार चालू असताना त्याची मुलगी आणि अंत:पुरातील इतर स्त्रिया यांनी त्याच्यापाशी पुढीलप्रमाणे अर्ज केला, ''दिल्ली सोडून आपल्याला तीस वर्ष झाली आहेत. या काळात आम्हाला सतत फिरावे लागत आहे. आम्हाला अनेक कष्ट पडले आहेत. आता आम्ही म्हाताऱ्या झालो आहोत. आता आम्हाला आगऱ्याच्या किल्ल्यास परतण्याची कृपा करुन परवानगी द्यावी. यामुळे आपल्या (औरंगजेबाच्या) मृत्यूनंतर आमच्या नशिबी येणारी कैद आणि विटंबना ही टळतील.'' यावर औरंगजेबाने पुढील उत्तर दिले, ''माझ्या मृत्यूच्या दोन वर्षापूर्वी तुमच्या सुरक्षिततेसंबंधी सर्व काही करण्यात येईल अशी व्यवस्था मी करुन ठेविली आहे.''[१३] औरंगजेबाच्या जनानखान्यातील स्त्रियासुद्धा परत जाण्यास सांगत होत्या. त्या सुद्धा या

युद्धाला कंटाळल्या होत्या. या सर्व गोष्टीमुळे औरंगजेब खूपच दु:खी झाला व आजारी पडला त्यातच त्याचा ता. २० फेब्रुवारी १७०७ रोजी अहमदनगर येथे मृत्यू झाला.

औरंगजेबाच्या अपयशाबद्दल डॉ. जयसिंगराव पवार, 'आपल्या महाराणी ताराबाई' या पुस्तकात म्हणतात, ''मराठ्यांना आपण जिंकू शकणार नाही हे स्पष्ट दिसत असतानाही हाती घेतलेली मोहिम शेवटच्या क्षणापर्यंत चालविणारा औरंगजेब, असे औरंगजेबाच्या व्यक्तिमत्त्वाचे बहुविध दर्शन आपणाला या संदर्भात होते. एवढे गुण असूनही लष्करी सेनानी म्हणून त्याचे नेतृत्त्व कमी पडले. सेनानीच्या ठिकाणी केवळ वैयक्तिक पराक्रम असून चालत नाही. प्रतिपक्षाचे बळ कशात आहे, हे ओळखून डावपेचाने त्यास पेचात आणणारी बुद्धिमत्ता, राजकीय परिस्थितीचे निरीक्षण करुन अनुकूल व प्रतिकूल शक्तींचे मूल्यमापन करण्याची सारासार विचारशक्ती, केवळ तलवारीच्या जोरावर प्रदेश जिंकता येत नाहीत, त्यासाठी प्रजेची मने काबीज करावी लागतात हे समजण्यासाठी अक्कलहुशारी हे गुण यशस्वी सेनानीजवळ असावे लागतात. ते औरंगजेबाजवळ नव्हते.''[१४]

### १.२.२ प्रादेशिक परिस्थिती :-

मोगलाकडे केंद्रीय सत्ता होती. त्यांनी पूर्ण भारतभर आपली सत्ता प्रस्थापित केली होती. तेव्हा भारतात काही प्रदेशामध्ये छोटी छोटी राज्य अस्तित्वात येत होती. त्यात प्रमुख म्हणजे महाराष्ट्रातील मराठी सत्ता होय. इथे अनेक मराठा सरदारांना व मुत्सद्यांना वाव मिळाला.

चौदाव्या शतकातील ज्ञानेश्वर, जनार्दन स्वामी, एकनाथ व दासोपंत इत्यादींच्या कामगिरीने महाराष्ट्राच्या भ्रांत मनाला स्थिरता प्राप्त झाली. पंधराव्या शतकांत गुरुचरित्र, सोळाव्या शतकांत एकनाथी भागवत आणि भावार्थ रामायण हे ग्रंथ महत्त्व पावले. कोकणपट्टीतील पोर्तुगीजांच्या उच्छादामुळे नवीन संकटाची भर पडली. तरीही शाह्यांच्या आपआपसातील लढाया, त्यांच्या दरबारी दक्षिणी, परदेशी शिया व सुन्नी या भेदांनी सत्तास्पर्धात भर घातली. त्यामुळे मराठा सरदारांना व मुत्सद्यांना डोके वर काढण्यास चांगली संधी मिळाली. मोरे, मोहिते, घोरपडे, घाटगे, जाधव, भोसले अशी अनेक मराठा घराणी पुढे आली.

- **शिवाजी महाराजांचे वंशज:-**

भोसले वंशाच्या पूर्ववृत्ताबाबतीत सभासदाने त्याच्या सभासद बखरीमध्ये शहाजी महाराजे हे सिसोदिया वंशाचे असे नामनिर्देशित केले आहे. या विषयी ते पुढे म्हणतात की, सर्व दरबारातील लोकांनीदेखील हे मान्य केले होते. सभासदाने दक्षिणेतील आणि उत्तरेतील विद्वानांना व राजपूतांना हे मान्य होते, असे स्पष्ट करताना मिर्झा राजे जयसिंग यांच्या तोंडी पुढील वाक्य घातले आहे-

> "तुम्ही सिसोदे रजपूत
> आम्ही तुम्ही एकाचे एक आहोत."[१५]

सरदेसाई म्हणतात, "शहाजीचा जन्म भोसले कुलांत झाला. हे भोसले घराणे चित्तोड येथील सुर्यवंशी सिसोदे राजपुतांपासून उगम पावले. अर्थात हे जातित: उच्चवर्गीय क्षत्रिय होत. यादव, पवार, मोरे, सिंदे, साळुंके वगैरे अनेक राजपूत घराणी उत्तर हिंदुस्थानातून केव्हा तरी दक्षिणेत येऊन राहू लागली.[१६]

शिवाजी महाराजांचा जन्म ज्या भोसले कुळात झाला त्या कुळाची पूर्वपीठिका सांगणारे फार जुणे असे पुराव्याचे कागद आज आपणास उपलब्ध नाहीत. तथापि शहाजी 'आम्ही रजपूत' असे सांगतो, भारतकार हे घराणे 'सूर्यवंशी' आहे असे म्हणतो; जयराम व गागाभट्ट यांनी या घराण्याचा संबंध सिसोद्यांशी असल्याचे लिहिले आहे आणि सभासदाने तर 'राजियांचे वंशाचा शोध करिता राजे शुद्ध क्षत्रिय, शिसोदे उत्तरेहुन दक्षिणेस एक घराणे आले हेच राजियांचे घराणे असे शोधिले.'[१७]

यावरुन भोसल्यांचे रजपुतत्त्व म्हणजे क्षत्रियत्त्व, शिसोदिया वंशत्त्व हे त्याकाळी म्हणजे शहाजींच्या काळी दक्षिणेतील व उत्तरेतील विद्वानांना व रजपुतांना मान्य होते. तसेच ते मूळचे उत्तरेचे होते नंतर ते दक्षिणेत आले होते. शहाजीचे उपनाव भोसले, वंश शिसोदे, वर्ग क्षत्रिय उर्फ रजपूत, गोत्र-कौशिक, मूळ पुरुष वलिपास हा शब्द अवनी पार्श्व अपभ्रंश-अर्थ पृथ्वी पतीत श्रेष्ठ राजेश्वर अशी ग्वाही शहाजीचा समकालीन प्रत्यक्ष साक्षीदार जयराम पिंड्ये देतो. भोसले हे शहाण्णव कुळीचे मराठे क्षत्रिय होते यात काही शंका नाही. तरी सुद्धा राज्याभिषेकाच्या वेळी पुन्हा एकदा त्यांच्या क्षत्रियत्वाबद्दल खात्री करुन घेण्यात आली.

### १.२.२.१ मालोजी राजेः-

बाबाजी व रेवाऊ यांना दोन मुले झाली ती म्हणजे मालोजी व विठोजी होय. मालोजीचा जन्म इ.स. १५५२ मध्ये झाला.[१८] पुढे त्यांनी वेरुळ येथे काही काळ शेती केल्यानंतर पुढे शेती सोडून तलवार हातामध्ये घेतली.

मालोजी वयात आल्यावर त्यांनी लष्करी कवायतीचे शिक्षण घेतले. मालोजी नोकरीच्या निमित्ताने वनगोजीकडे गेले असता वनगोजीने मालोजी व विठोजी यांना स्वारीवर पाठविले. कोल्हापूरच्या रंकाळा तलावाजवळ, मालोजी यांनी आदिलशाहीच्या सैन्याशी सामना दिला व पराभव केला. निजामशहाने या केलेल्या यशस्वी कामगिरीबद्दल, ''मालोजीस आपल्याकडे शिलेदारी दिली, ''राजा'' ही पदवी, पंचहजारी मनसब व सैन्याच्या खर्चासाठी पुणे, सुपे, चाकण चौऱ्यांशी व इंदापूरची देशमुखी व कुटुंब ठेवण्यासाठी शिवनेरीचा किल्ला इ.स. १५९० च्या सुमारास बहुमानपूर्वक दिला.''[१९] पुढे लखुजीच्या मध्यस्थीनेच वनगोजीने आपली कन्या दिपाबाई मालोजीला देऊन भोसल्यांशी नाते संबंध जोडले. जाधव घराण्याला मालोजीच्या कुटुंबाविषयी चांगलीच आपुलकी होती. मालोजी हा होतकरु पराक्रमी आणि सर्वगुणसंपन्न बरोबरीच्या घराण्यातला तसेच उच्च कुळातला होता असे दिसते.

मालोजी व विठोजी राजे हे घृष्णेश्वराचे निःस्सीम भक्त होते. याचा एकमेव अपवाद म्हणजे मंत्री दत्तो त्रिमल वाकोसनीसकृत ९१ कलमी बखर या बखरीत वेरूळच्या देवालयासंबंधी पुढील उल्लेख येतो.

''याऊपर (मालोजीराजे यांनी) सेतातील द्रव्य होते ते काढून धर्म केला. श्रीवेरुळचे देवालय बांधिले. शिवालय तीर्थ विस्तीर्ण बांधिले.''[२०]

या उल्लेखावरुन घृष्णेश्वराचे उदध्वस्त झालेले देवालय मालोजी राजांनी पुन्हा बांधले.

''मोलोजी राजांचा मृत्यू ता. ३ जुलै १६०६ च्या सुमारास इंदापूरच्या लढाईत झाल्याचा उल्लेख आढळतो आणि त्यानंतर ता. २ ऑगस्ट १६०६ मध्ये पित्याचा सरंजाम हा शहाजीला मिळाल्याचे सिद्ध होते.''[२१]

मालोजी राजांनी प्रभावळ जमवून जनांचा नायक बनविण्याचा प्रयत्न केला. मालोजी राजे हे स्वकर्तृत्वाने पुढे आले. त्याचप्रमाणे त्यांनी आपल्या वतनाचा विस्तार करुन आपले वैभव वाढविले. धनसंचय केला. या धनाचा उपयोग त्यांनी जनकल्याणासाठी केला. मालोजी विषयी शिवभारतात कवी परमानंद यांनी दिलेली हकिकत ती अशी. मालोजी हा एक मोठा फौजबंद सरदार होता. त्यांच्या परिसरातील लोक सुखी असून त्याच्या धार्मिक प्रवृत्तीचा अनेक लोकांना लाभ मिळत असे. शंभू महादेवाचा तो भक्त होता. त्याने शिखर सिंगणापूर येथे देवतांच्या स्मरणार्थ तलाव बांधला. म्हणजे मालोजी राजे हे धार्मिक होते व त्यांनी जनसामान्यांसाठी कार्य केले.

### १.२.२.२ शहाजी महाराजः-

मालोजीला मुलगा होत नाही म्हणून त्यांच्या पत्नीने नगरच्या शाहशरीफ पिरास नवस केला व त्यांना ता. १८ मार्च १५९४ रोजी मुलगा झाला. त्याचे नांव शहाजी असे ठेवण्यात आले.[२२] शहाजी महाराज लहान असतानाच मालोजीच्या (वडिलांच्या) मृत्यूमुळे पोरके झाले. त्याचा सांभाळ त्याच्या चुलत्याने म्हणजे विठोजीने केले. वयात येताच निजामशहाने पुणे-सुपे प्रातांची जहागिरी देऊन त्यांना सरदारकी बहाल केली आणि शहाजीनेही इमाने इतबारे त्याची चाकरी केली.

शहाजी व जिजाबाई यांचे लग्न मार्गशीर्ष शु. ११५ श. १५२० स. १६०५ च्या डिसेंबरमध्ये मोठ्या थाटाने पार पडले.[२३] या लग्नाच्या वेळेस मालोजी राजे होते व त्यांना निजामशाहीतून पंच हजारी मनसब मिळाली होती.

मराठ्यांचा उदय झाला तो मलिक अंबरच्या काळात. मलिक अंबरने मोगलांशी लढा देण्याची तयारी इ.स. १६१८ मध्ये केली. मोगलांशी झुंज देण्यासाठी गनिमी काव्याने लढणाऱ्या मराठ्यांचे लष्कर उभारण्याची मलिक अंबरास जरुरी वाटली. इ.स. १६१८ ते १६२६ या मलिक अंबर मोगल धुमश्चक्रीत जाधव, काटे, शहाजी भोसले, उदाराम वगैरे मराठे सरदारांना अनुभव मिळून त्यांचा उदय झाला.

प्रथम निझामशाहीत चाकरी करुन शहाजी राजांना पुढे मलिक अंबरच्या जाचामुळे आदिलशाहीत जावे लागले. तेथे ही इब्राहिमखान आदिलशहाच्या मृत्यूनंतर घडलेल्या घडामोडीमुळे त्यांना पुन्हा निझामशाहीचा आश्रय घ्यावा लागला. पण येथेही मुर्तझाा

निझामशहाच्या लहरी स्वभावामुळे जाधवरावांचा खून झाल्यावर त्यांना स्वत:च्या जिवाचे भय वाटून मोगलांना जाऊन मिळावे लागले. परंतु पुढे मोगलांचा आणि फत्तेखानाचा तह घडून आल्यामुळे मोगलांना त्यांचे मूल्य कवडीइतकेसुद्धा वाटेनासे झालेले पाहून शहाजीराजांना वैतागाने मोगलांच्या चाकरीलाही रामराम ठोकावा लागला. ह्या सर्व घडामोडींचा विलक्षण परिणाम होऊनच की काय त्यांनी नवीन निझामशाहीची स्थापना करण्याचा विलक्षण धाडसी प्रयत्न केला व तो काही काळपर्यंत यशस्वीपण ठरला.[२४]

विजापूर सुलतानाकडून इ.स. १६३९ मध्ये शहाजी राजांना बंगलोरची जहागीर मिळाली ते शहर त्यांनी आपली राजधानी केली व स्वत:जवळ बाळगलेल्या १५-२० हजार फौजेची राहण्याची सोय त्या शहरात केली. त्यासाठी अधिकारी, व्यवस्थापक, कारकून यांचा फौजफाटा तयार केला. त्यांच्या वस्त्या केल्या. महाराष्ट्रांतून जे लोक एकनिष्ठ राहून सेवा करण्यासाठी कर्नाटकात आले त्यांनाही अन्न, वस्त्र व राहण्यास जागा दिल्या. अशा रीतीने शहाजी राजे यांनी बंगलोरास आपले बस्तान नीट बसविले आणि ते एखाद्या स्वतंत्र राजाप्रमाणे थाटाने राहू लागले.[२५] ह्याच दक्षिण प्रदेशाचा म्हणजे बंगलोरचा पुढे मराठ्यांना उपयोग झाला.

शहाजी महाराज कर्नाटकात गेल्यानंतर कधी त्याने इस्लामी सुलतानाप्रमाणे हिंदू संस्थानिकांचे उच्चाटन केले नाही, हिंदू राजांना ते जिवंत ठेवण्याचा प्रयत्न करीत होते असे राईस म्हणतो. एकंदरीत शहाजी राजांच्या उदार धोरणाची व स्वकीयांबद्दल त्यांना असलेल्या ममत्वाची प्रचिती येते. शहाजी राजे इस्लामी सत्तेत असले तरीही त्यांचा स्वदेश आणि स्वधर्म याविषयी त्यांच्या मनात प्रखर अभिमान जागृत होता. तसेच त्याच्यांपदरी विविध प्रांतातील सुमारे ७५ कवी व पंडित लोक होते.

शहाजी महाराजाच्या जीवनात अनेक दु:खद घटना घडल्या होत्या त्यामधील एक म्हणजे त्यांना विश्वासघाताने केलेली कैद शहाजी महाराजाच्या दोन्ही मुलांनी स्वपराक्रमाने म्हणजे संभाजी व शिवाजी महाराजांनी शहाजी महाराजाची गौरव युक्त सुटका केली.

शहाजी महाराज बेदनूरहून परत येत असता आसपासच्या बखैडेखारे ठाण्यांचा बंदोबस्त करण्यासाठी तुंगभद्रातीरी बसवासट्टणजवळ होद्देगीरी जि. शिमोगा या गावी

त्यांनी मुक्काम केला. या ठिकाणी अनेक श्वापदे उठली. राजास शिकार करावयाची इच्छा होऊन घोड्यावर स्वार होऊन हरणांचे पाठीस लागले. ईश्वरेछत्र, त्या योगे घोड्याचा पाय भंडाळीत अडकून, घोडा व राजे एकावच्छेदे पडले, ते गतप्राण झाले (शनिवार, माघ शु.५, शके १५८४, ता. २३-१-१६६४)[२६]

शहाजी महाराजांबद्दल सरदेसाई म्हणतात, "तत्कालीन ऐतिहासिक व्यक्तीत राष्ट्रीय स्वत्त्व दिमाखाने मिळविणारा शहाजी शिवाय दुसरा एकही हिंदू सत्ताधीश दक्षिणेत आढळत नाही. म्हणून शिवाजीला जन्म देऊन त्याचे ठिकाणी स्वातंत्र्याचे वारे उत्पन्न करण्याचे श्रेय त्याला अवश्य मिळते. या दृष्टीने शिवाजीला जर 'राज्य-संस्थापक' म्हणावयाचे तर शहाजीला 'राज्य-संकल्पक' असे पद देण्यास हरकत नाही."[२७]

राधामाधव विलास चंपू-प्रस्तावनेत इतिहासाचार्य राजवाडे शहाजीराजांचे कर्तृत्त्व शिवाजी राजांच्या राष्ट्रकार्यात कसे सहाय्यभूत झाले हे सागंत आहेत. ते लिहितात, "महाराष्ट्रात स्वराज्य स्थापनेचे श्रेय शिवाजीस मिळाले हे खरे! पण मूळ कल्पना व योजना शहाजीची होती त्या श्रेयाचा वाटेकरी शहाजीस करणे इतिहासास प्राप्त आहे! पिंगळे, आंग्रे, दादाजी, पानसंबळ, रोझेकर, जेधे, बांदल हे सर्व मुत्सद्दी सरदार शहाजीची जहागीर शहाजीचा! तोफा, हत्ती, घोडे व जागजागी गडकोटांतून साठविलेला सरंजाम, त्याचा जोरावर शिवाजीने आपली भव्य इमारत रचली. आकाशातून पडला आणि द्यावयाला लागला अशातला काही प्रकार शिवाजीचा नव्हता. बापाच्या खांद्यावर उभा राहून शिवाजी प्रथम उच्चासनस्थ झाला. तात्पर्य दरबारी मुत्सदी लष्करी सरदार, लढाऊ सामान आदी मराठ्यांचे साहाय्य व शहाजींच्या नावाचा दरारा आणि दिमाख या देणग्या शिवाजीला शहाजीकडून मिळाल्या एवज स्वराज्याचा प्रारंभ शहाजी राजांनी केला."[२८]

शहाजी राजांनी स्वराज्याचा पाया घातला व शिवाजीने तो पूर्ण केला, असे म्हणावे लागते. शहाजी महाराजांच्या राजकीय जीवनात जे काही चढऊतार आले, त्यामध्ये त्यांना एका मुसलमानी सत्तेपासून दुसऱ्या सत्तेकडे जाणे क्रमप्राप्तच होते. प्रत्येक ठिकाणी त्यांचे गौरवाने स्वागत केल्याचे दिसून येते. शहाजी महाराजांनी स्वधर्म कधी सोडला नाही. शहाजी महाराज कर्नाटकात राज्य करु लागल्यानंतर मुसलमानांच्या हातून

हिंदू देवालयांचा नाश होणे, स्त्रियांवरील अत्याचार, सावकाराकडून शेतकऱ्यांची पिळवणूक हे प्रकार बंद पाडले होते. शहाजी महाराजांवर त्यांच्या सैन्याचाही लोभ होता. वरील सर्व गोष्टीचा फायदा शिवाजी महाराजांना झाला होता. कारण त्याचे वडील हे एक आदर्श राज्यकर्ते होते.

### **१.२.२.३ छत्रपती शिवाजी महाराजः-**

शिवाजी महाराजाच्या जन्मापूर्वी त्यांचे वडील शहाजी महाराज मोगलांविरूद्ध लढण्यासाठी परमुलखात गेले होते. शहाजीचे व्याही (संभाजीचे सासरे) जुन्नर जवळील शिवनेरी किल्ल्याचे किल्लेदार होते. त्यांच्याजवळ जिजाबाईला ठेवून आश्रयाचे व संरक्षणाचे चांगले स्थान शहाजीने निवडले होते. तेथेच शिवाजींचा जन्म झाला. शिवाजी महाराजांच्या जन्माच्या तारखाविषयी खूप मतभेद आहेत. वेगवेगळ्या इतिहासकारांनी वेगवेगळ्या तारखा दिलेल्या आहेत. त्यांतील काही शिवाजी महाराजाच्या जन्माच्या तारखा पुढील प्रमाणे.

जेधे शकावलीतील बऱ्याचशा नोंदी विश्वसनीय समजल्या जातात. यात शिवजन्मीतीथींची नोंदपुढील प्रमाणे आहे.

"शके १५५१ शुक्ल नाम संवत्सरे फाल्गुन वद्य तृतिया शुक्रवार नक्षत्र हस्ता घडी १८ प. ३१ गंड पळे ७ ते दिवशी राजश्री शिवाजी राजे शिवनेरीला उपजले कलम".[२९]

श्रीराजा शिवछत्रपती मेहेंदळे खंड-१ यामध्ये "शहाजी व जिजाबाई यांचा मुलगा शिवाजी यांचा जन्म शिवनेरी किल्ल्यावर १९ फेब्रुवारी १६३० रोजी झाला."[३०] असा उल्लेख आहे.

जास्तीत जास्त इतिहासकारांनी शिवजन्म तिथी ही फाल्गुण वद्य तृतिया शके १५५१ (ता. १९ फेब्रुवारी, १६३०) रोजी शिवनेरी येथे जन्म झाला, हे मान्य केले आहे.

शिवाजीची पहिली सहा-सात वर्षे हे शिवनेरी, पेमगिरी, माहुली इत्यादी ठिकाणी गेली. शिवाजी महाराजाचे खरे शिक्षण हे मातोश्री जिजाबाईंच्या हाताखाली झाले. शिवाजी महाराजांना जन्मापासून जवळ-जवळ अखेरपर्यंत आईचाच सहवास लाभला.

वडील फक्त अधून-मधून भेटत होते. त्यामुळे त्यांच्यात एक असाधारण मातृभक्ती निर्माण झाली होती. जिजाबाई अत्यंत बुद्धिमान, प्रेमळ, कनवाळू व धाडसी असल्यामुळे त्यांनी शिवाजीचे शिक्षण आपल्या देखरेखी खाली घडविले.

बालशिवाजीचा पालक आणि शहाजींच्या जहागिरीचा व्यवस्थापक दादोजी कोंडदेव याचा शिवाजीवर आई इतकाच प्रभाव होता. म्हणून आई एवढेच स्थान त्यांचे आहे. शिवाजी शहाजीजवळ राहत, तर त्याने शिवाजीच्या कोवळ्या वयात ज्या काळजीने व ममतेने त्यांचे लालन-पालन केले असते, त्याच काळजीने व ममतेने शिवाजीचे दादोजीने बिनतक्रार लालन-पालन केले व शिवाजी आपल्या आयुष्याचे थोरकर्तव्य सिद्धीस नेण्याला समर्थ होईल अशा रीतीने त्यास वाढविले. [३१] पुण्यास असताना दादोजीने शिवाजीचे लग्न निंबाळकरांच्या सईबाई यांच्याशी आणि शहाजीच्या बोलवण्यावरून तो जिजाबाई व शिवाजी यास घेऊन इ.स. १६४० च्या सुमारास बंगलोरला गेला.

बेंगलोरच्या वास्तव्यामध्ये शहाजी महाराजांनी शिवाजींना वेगवेगळे प्रशिक्षण देऊन इ.स. १६४२ च्या अखेरीस शिवाजी राजास त्यांच्या मातोश्री जिजाबाई व दादोजी कोंडदेव यांसह पुण्याच्या जहागिरीत त्यांची रवानगी केली. हा पुण्याचा जहागिरदार जणू स्वतंत्र राजा असे समजून शहाजीराजांनी त्यांच्याबरोबर पेशवे, मुजूमदार, डबीर, सबनीस असेही स्वतंत्र अधिकारी करून पाठविले. तसेच बरोबर हत्ती, घोडे, पायदळ व विपुल द्रव्य दिले.[३२] म्हणजे शहाजी महाराजांनी शिवाजीस स्वराज्य स्थापनेसाठी प्रोत्साहन व मार्गदर्शन केले असे दिसते.

शिवाजी महाराज बेंगलोरहून येवून पुण्यामध्ये लाल महलामध्ये राहू-लागले कारण पुणे हे शहाजी महाराजाची जहागीर होती. पुढे शिवाजी महाराजांनी मावळे जमविण्यास सुरूवात केली व नंतर राजांनी शस्त्रांची जमवाजमव करण्यास सुरूवात केली त्यानंतर राजांनी निश्चय करून इ.स. १६४६ मध्ये विजापूरच्या किल्लेदाराला थकवून तोरणा किल्ला हस्तगत केला. या किल्ल्यात दोन लाख होन भरेल, एवढा सरकारी खजीना त्यांच्या हाती पडला.[३३] शिवाजी महाराजांनी तोरणा किल्ला घेऊन स्वराज्याचे तोरण बांधले. शिवाजीने स्वराज्य स्थापनेचा निश्चय वयाच्या पंधराव्या ते सोळाव्या

वर्षापासून सुरू केले. पुढे त्यानी कोढांणा, मुंरूबदेव (रायगड) व पुरंदर हे किल्ले जिंकून घेतले.

पुढील सहा-सात वर्षात शिवाजीनी विजापूर सरकारला त्रास दिला नाही. तसेच अदिलाशाही पेक्षा मोगल बादशाहांना दुखविणे अत्यंत धोक्याचे आहे याचीही जाणीव त्यांना होती. यामुळे आपल्या ताब्यातील मुलूखाची व्यवस्था व डागडुजी करण्यात त्यांनी हा काळ घालविला. शिवाजी महाराजांनी जावळीचा सरदार चंद्रराव मोरे आपल्याला न जुमानणारा बंडखोर यास ताब्यात घेऊन जवळपासच्या सर्व प्रदेशावर वचक बसविण्याचा निर्णय घेतला, कारण जावळीचा हा प्रदेश, देश व कोकणच्या अन्य प्रदेशापेक्षा अगदी भिन्न होता. या प्रदेशात अनेक दरी-खोरी असून हा डोंगरी प्रदेश संरक्षणाच्या दृष्टीने अगदी अभेद्य असा होता.[३४] त्यामुळे शिवाजी महाराजांनी जावळीवर आक्रमण करून चंद्रराव मोरेचा पराभव केला.

मोरेचा छ. शिवाजी महाराजांनी पराभव केल्याने विजापूर दरबार चिंतित झाला. त्यांनी छ. शिवाजी महाराजांना शासन करण्याची जबाबदारी अफगाण सरदार अफझल खानावर सोपविली. परमानंद लिहितात,''बडे साहेबिनीने त्यास कानमंत्र दिला की शिवाजीराजांचा पराभव करून त्यास ठार मारावे. अफझल खानाने ही कामगिरी मोठ्या उत्साहाने स्वीकारली.''[३५] इ.स. सप्टें. १६५९ ला तो निघाला. छ. शिवाजीचे यावेळी वास्तव्य पुण्यास होते व त्यास छ. शिवाजीचे विरोधक फौजेनिशी येऊन मिळत होते. छ. शिवाजींनी त्यास उघड्या मैदाना ऐवजी पहाडी मुलूखाच्या कोडिंत पकडण्याचा डाव टाकला. तर खान छत्रपतींना उघड्यावर लढविण्याचा प्रयत्न करू लागला.

अखेर खानाने सामोपचाराचे आमीष दाखवून भेटीस बोलावून छ. शिवाजीचा घात करण्याचा कट रचला. छ. शिवाजींनीही आपण घाबरलो हे दाखवून खानास जशास तसे धडा शिकविण्याचे ठरविले. भेटीचा दिवस गुरूवार ता. १० नोव्हें. १६५९ ठरला.[३६] या भेटीत खानाने दगाबाजी केल्याने छ. शिवाजी महाराजांनी त्यास मारून त्यांच्या सैन्यास स्वराज्यातून हुसकावून लावले.

गर्गे स. सा. लिहितात, ''अफझलखानाचा वध ही मराठ्यांच्या इतिहासामध्ये अत्यंत महत्वाची गोष्ट ठरलेली आहे, ह्या प्रसंगाने मराठ्यांची खरी अस्मिता जागृत

झाली. छ. शिवाजींना आपल्या बळाची जाणीव झाली. त्यांचा आत्मविश्वास वाढून पुढे त्यांनी सातारा, सांगली प्रांत व पन्हाळा किल्ल्यावर ताबा मिळविला.''[३७]

अफझल खानच्या वधानंतर निजामशहाने सिद्दी जोहर यास छ. शिवाजीला पकडण्यासाठी पाठविले. राजे यावेळी पन्हाळ्यास होते. सिद्दी जोहरने पन्हाळ्यास वेढा दिला. छ. शिवाजीने शरण येण्याचे कबूल केले. परंतु अचानक राजेंनी ता. १२ जुलै १६६० रोजी पोर्णिमेच्या दिवशी बरोबर सुमारे सहाशे हत्यारबंद पायदळ शिपाई गड्यांसह गुपचूप जोहर यास पत्ता न लागता विशाल गडास जाण्याचे ठरविले.[३८] त्याप्रमाने छ. शिवाजीमहाराज विशालगडाकडे निघून गेले.

इकडे मोगल बादशहा औरंगजेबाने शाहिस्तेखानास शिवाजी यास शासन करण्यासाठी दक्षिणेच्या सुभेदारीवर ता. ५ जून १६५९ ला नेमणूक केली.[३९] सर्व प्रथम तो चाकणवर ताबा घेण्यास निघाला. प्रचंड हानीनंतर चाकण शेवटी शाहिस्तेखानास मिळाले. पुढे शाहिस्तेखानाने खुल्या मैदानात लढण्याच्या इराद्याने पुण्यास महाराज़ाच्या लाल महालामध्ये मुक्काम ठोकला. तेव्हा शिवाजी महाराजांनी शाहिस्तेखानवर अचानक हल्ला करून त्यांची बोटे कापली व त्यास अद्दल घडविली. तेव्हा शाहिस्तेखानाची बदली बादशहाने बंगाल सुभ्यावर केली व छ. शिवाजी महाराजांचा डाव यशस्वी झाला.

शिवाजी महाराजाने पुढे आपले लक्ष कोकणाकडे देवून सिद्दीस तह करावयास लावून, दंडाराजपूरी घेतला. नंतर मोगलाचे नाक असलेल्या सुरतेवर इ.स. १६६४ ला धाड घालून सुरतेची लुट केली. याबाबत कानेटकर म्हणतात, ''औरंगजेबाने आपल्या राज्यात जिझिया कर सक्तीने वसूल करायला सुरूवात केली. त्याची प्रतिक्रिया म्हणून सहा ते दहा जानेवारीपर्यंत शिवाजी राजांनी आणखी एक प्रचंड धाडस केले ते म्हणजे सुरतेची लुट, चार दिवस शिवाजीराजांनी सुरत शहर लुटले आणि कमीत कमी एक कोटीची दौलत मिळविली. एक तर सुरत हे मोगलांचे ठाणे होते आणि तिथे शिवाजींशी शत्रुत्त्व करणाऱ्या फिरंगी वखार वाल्यांनी आपली ठाणी उभी केली होती, त्यावर वचक निर्माण करायचे होते.''[४०] अशी दोन महत्वाची कारणे सुरत लुटीच्या मागे होते.

मोगल बादशहा औरंगजेबाने छ. शिवाजी राजाचे परिपत्य करण्यासाठी आपला खास सरदार मिर्झा राजा जयसिंग यास शिवाजी राजांवर चालून जाण्यासाठी आज्ञा दिली.

या अनुभवी सरदाराने छ. शिवाजीस कोंडीत पकडून तह करावयास लावला या तहास पुरंदरचा तह म्हणतात. (ता. १२ जून १६६५)[४१] या तहाने छ. शिवाजी महाराजाकडे १२ किल्ले व एक लाख होनाचा मुलूख राहिला बाकीचे सर्व किल्ले व प्रदेश मिर्झा राजे जयसिंगाला द्यावे लागले.

या तहान्वये मिर्झा राजा जयसिंगाने छ. शिवाजी महाराजांना बादशहास भेटण्यासाठी आग्रा येथे पाठविले. राजे ता. ११ मे १६६६ ला आपला मुलगा संभाजीस घेऊन आग्य्रास पोहचले, आग्रा येथील बादशहाच्या दरबारातील अपमानाने छ. शिवाजी महाराजांना राग येवून ते बादशहाच्या दरबारातून निघून गेले. यामुळे बादशहासही राग येऊन त्यांनी छ. शिवाजींना आग्रा येथे नजर कैदेत ठेवून मारण्याचा गुप्त प्रयत्न आखला. इकडे छत्रपतींनीही नजर कैदेतून पलायनाचा व्युह रचला व त्यांनी मिठाईच्या पेठाराद्वारे बाहेर पडून वेषांतर करून निघाले. प्रथम त्यांनी लहानग्या संभाजीस मथुरेवर ठेवण्याची तजवीज केली.[४२] छ. शिवाजी महाराज स्वराज्यात आले.

शिवाजी महाराजाची पलायनाची बातमी कळताच औरंगजेबास दु:ख व आश्चर्य वाटले. ह्या घटनेमुळे छ. शिवाजीची किर्ती सर्व देशात पसरली व त्यांचे नाव सर्वतोमुखी झाले. आग्य्राच्या सुटकेनंतर त्यांनी पुन्हा मोगलांशी संघर्ष करून आपला प्रदेश परत मिळविला व पुढे राज्याभिषेक करण्याचे ठरविले. कारण राज्याभिषेक होण्यापूर्वीच शिवाजी महाराजांनी फार मोठे पराक्रम गाजविले होते. आदिलशाही व कुतूबशाही यांच्यावर महाराजांचा प्रभाव वाढला होता, तसेच त्यांनी मोगलांना शह दिला होता. पोर्तुगीज आणि इंग्रज यांच्या सारख्या पाश्चात्यांनी महाराज्यांच्या मैत्रीची अपेक्षा करावी एवढे महत्त्वही महाराजांना प्राप्त झाले होते. तसेच हिंदुची स्वतंत्र हिंदुपदपातशाही निर्माण करावी असे त्यांना वाटत होते.

महाराजांस राज्याभिषेक होणार ह्या वर्तिने (वार्तेने) स्वराज्यामध्ये उत्साह संचारला. राज्याभिषेकासाठी महाराजांनी बत्तीस मण सोन्याचे राजसिंहासन तयार केले. ज्येष्ठ शु. ४ (=२९ मे) स राजश्रींची मुंज झाली. नंतर षष्ठीस समंत्रिक विवाह केला. लुप्तविधीबद्दल प्रायश्चित्ते पुण्याहवाचन, होम, शांति वगैरे झाली. ब्राह्मण भोजणांचे मुक्तद्वार सारखे चालुच होते. 'शके १५९६ आनंद संवत्सर ज्येष्ठ शु. १२ शुक्रवार

(=ता.५.६.१६७४) रोजी तीन घटका रात्र तेव्हा राजे सिंहासनी बैसले.[४३] व राज्याभिषेक पूर्ण झाला हा राज्यभिषेक गागाभट्टांनी केला.

शिवाजी महाराजांनी नूतन राज्याची खूण म्हणून 'राज्याभिषेक शक' नावाची स्वतंत्र कालगणना सुरू केली. 'क्षत्रिय कुलावंतास सिंहासनाधीश्वर महाराज छत्रपती' अशी उपपदे स्विकारून त्याने आपल्या राज्यभिषेकाची सांगता जाहीर केली.[४४] राज्याभिषेकाच्या वेळी त्यांनी विशिष्ट राजचिन्हे तयार केली व आपल्या अष्टमंडळाची निर्मिती केली.

राज्याभिषेकाविषयी गर्गे स.मा. म्हणतात, ''महाराष्ट्राच्या इतिहासात ता. ६ जून १६७४ रोजी एक महान घटना घडली. त्या दिवशी रायगड किल्ल्यावर शिवाजी महाराजांचा राज्याभिषेक झाला. महाराष्ट्रात महाराजांनी एक नवा राजवंश स्थापन केला. एका नव्या युगाचा आरंभ त्या घटनेने प्रत्यक्षात आणला. भारतात एका शककर्त्याचा उदय झाला. नवे नाणे प्रचारात आले. नवी कालगणना सुरू झाली. 'महाराष्ट्राच्या शेकडो वर्षाच्या इतिहासाला कलाटणी देणारी घटना'' असे या राज्यभिषेकाचे समर्पक वर्णन केले.

राज्याभिषेक समारंभ अत्यंत थाटामाटात झालेला मातुश्री जिजाबाईंनी डोळे भरून पाहिला. त्या मनाने तृप्त आणि कृतार्थ झाल्या आणि त्यानंतर अवघ्या बाराच दिवसांनी (ता. १७ जून १६७४) त्यांचे निधन झाले. त्यामुळे शिवाजी महाराजांना वाटले की गागाभट्टाने केलेल्या मंत्र-तंत्रात काही चुका तर राहून गेल्या नाहीत ना असे वाटून २४ सप्टेंबर रोजी राजगडावर त्यांनी दुसरा एक राज्यभिषेक 'निश्चलपुरी' नावाच्या एका तांत्रिक योग्याकडून करवून घेतले.[४५]

राज्यभिषेकानंतर शिवाजी महाराजांनी दक्षिण दिग्वीजय करण्याचे ठरविले. त्याप्रमाणे त्यांनी ता. ६ ऑक्टोंबर १६७६ या विजयादशमी दिनी महाराजांनी दक्षिण दिग्वीजय यार्थ आरंभ केला. बरोबर २५ हजार घोडेस्वार फौज घेतली, बाळाजी आवजी, दत्ताजीपंत, वाकनीस, सुर्याजी मालुसरे, नेताजी पालकर असे अनेक मातब्बर सरदार बरोबर घेतले होते.[४६] राजांनी पुढे हैद्राबाद, जिंजीचा किल्ला, वेल्लोर, कर्नाटक

जिंकून घेतले . महाराजांनी कर्नाटकात जिंकलेल्या किल्ल्यांची डागडूजी व जिंकलेल्या प्रांताचा बंदोबस्त करून राजे इ.स. १६७८ मध्ये रायगडास परत आले.

दक्षिण दिग्विजय झाल्यानंतर लवकरच शिवाजी महाराजांचा मृत्यू झाला. छ. शिवाजी महाराज अल्पशा आजाराने स्वर्गवासी झाले. (ता.३ एप्रिल १६८०), इंग्रज या बाबतीत आपल्या पत्रात म्हणतात की, ''राजाराम महाराजांच्या लग्नानंतर महाराज अकल्पितपणे आजारी पडले व हा आजार अल्पावकाशात विकोपास गेला. याला इंग्रज या आजाराचे नाव 'Bloody Flut' (रक्तातिसार) असे देतात.[४७]

एकंदरीत छत्रपती शिवाजी महाराजांनी महाराष्ट्रात केलेली स्वराज्य स्थापना ही हिंदुस्थानच्या इतिहासात महान घटना होती. तसेच त्यांनी राज्यक्रांतीचे कार्य केले. तत्कालीन मराठी समाजातही क्रांती घडवून् आणण्याचे अनेक प्रयत्न केले. केवळ प्रशासन, लष्कर, आरमार, दुर्ग, व्यापार, उद्योग इत्यादी क्षेत्रात शिवाजी महाराजांनी महाराष्ट्रात नवे युग सुरू केले. तसेच धर्म व भाषा यासारख्या सामाजिक क्षेत्रांतही नवे पायंडे पाडले.

कै. फिरोजशहा मेहता म्हणतात, ''शिवाजी आणि टिळक ही नावे जोपर्यंत महाराष्ट्रीय तरूणांच्या हृदयात आहेत तोपर्यंत महाराष्ट्रच काही कर्तृत्त्व दाखवू शकेल.''[४८]

सरकार म्हणतात, "Shivaji real greatness lay in his charact and practical ability, rather than in originality of conception or length of political vision"[४९]

शिवदिग्वीजयकार म्हणतात,

''रविसुत शनि ऐसे नाम ते वासराला।
गणिततिथी सुपर्णा चैत्र मासी दिनाला।
अवतरण शिवाने पुर्ण केले नृपाने।
शतमितिशत सोळा युग्म रौद्राभिमाने।''[५०]

### १.२.२.४ छत्रपती संभाजी महाराजः-

शिवाजी महाराजांची ज्येष्ठ राणी सईबाई तिच्या पोटी ता.१४ मे १६५७ रोजी संभाजी राजांचा पुरंदर येथे जन्म झाला. नुकत्याच निवर्तलेल्या आपल्या ज्येष्ठ पुत्राचे नाव

जिजाबाईंनी आपल्या नातवास ठेवले.[५१] संभाजीराजे दोन-सव्वादोन वर्षाचे असतानाच सईबाई आजारी होत्या. त्यांतच त्यांचा मृत्यु झाला. तेव्हा स्वाभाविकच संभाजीराजाचे पालनपोषण हे सर्व जिजाबाईने केले.

संभाजी राजास, धनुर्विद्या, संगीत, पुराणेतिहास व काव्यालंकार शिकवण्यासाठी केशव पंडितांची नेमणूक केली. ह्या केशव पंडिताकडून संभाजीराजे यांनी रामायण पुराण श्रवण केले.[५२] म्हणजेच शिवाजी महाराजांनी मराठी राज्याच्या या पहिल्या युवराजास, आपल्या वारसास विद्या, कला, प्रशासन, युद्धनीती, लष्करी व राजनीती अशा सर्व क्षेत्रात निपूण बनविण्याचे प्रशिक्षण देण्यास सुरूवात केली. संभाजी राजाचे केशव पंडित व दुसरे म्हणजे उमाजी पंडित हे गुरू होते.

साधारण इ.स. १६६५ च्या दरम्यान संभाजी राज्याचा विवाह पिलाजी शिर्के यांची कन्या राजसबाई बरोबर मोठ्या समारंभाने साजरा झाला. वधूचे नाव येसुबाई असे ठेवण्यात आले. वयाच्या नऊ ते दहा वर्षात ते मुघलांचा मन्सबदार झाले होते.[५३] संभाजी राजांनी पुढे शिवाजी महाराजांनी दिलेले सर्व कार्य पूर्ण करू लागले.

संभाजीराजास राज्यकारभाराचा अनुभव यावा यासाठी त्यांना वयाच्या चौदाव्या-पंधराव्या वर्षीच जबाबदारीची कार्ये सांगितली जाऊ लागली. वयाच्या सतराव्या वर्षी महाराजांनी त्या सोबत मोठी फौज देऊन खानदेशाच्या मुलुखगिरीवर पाठविले होते, यावेळी हिंदुस्थानात असणारा फ्रेंच प्रवासी अॅबे कॅरे हा संभाजीविषयी लिहितो, ''हा युवराज लहान आहे तरी धैर्यशील व आपल्या बापाच्या कीर्तीस साजेल असाच शूर वीर आहे. शिवाजी राजांसारख्या युद्धकुशल पित्याच्या बरोबर राहून तो युद्धकलेत तरबेज झालेला असून चांगल्या वयोवृद्ध सेनापतीचीही बरोबरी करील इतका तो तयार होता.''[५४]

शिवाजी महाराजाच्या राज्याभिषेकाच्या वेळी संभाजीराजांचा युवराजभिषेक झाला. ते अभिषिक्त युवराज, राजपुत्र झाले. याबाबत शिवदे म्हणतात, ''भोसले घराण्यातील आतापर्यंतचे सर्व पुत्र सरदारपुत्र होते. जहागीरदार पुत्र होते.... संभाजीराजे हे पहिले 'अभिषिक्त युवराज' झाले... 'राजपुत्र' झाले.''[५५] म्हणजे यापूर्वीचे सर्व सरदार पुत्र होते, संभाजी हे पहिले युवराज झाले. राज्याभिषेकाच्या वेळी संभाजी राजांना सिंहासनाच्या

पायरीवर बसविले होते. तो पित्याच्या पश्चात वारस म्हणून गादीवर येणार असे गृहित धरून त्यांना इंग्रजांनी नजराणा दिला.

सोयराबाईस राजाराम मुलगा झाला होता. तेव्हा राज्यभिषेकाच्या वेळी संभाजीस युवराज पद दिले होते, तेव्हा सोयराबाईस वाटे की आपल्या मुलास युवराज पद द्यावे, तेव्हा पासून गृहकलहास सुरूवात झाली. राज्याभिषेकानंतर शिवाजी महाराज कर्नाटकाच्या स्वारीवर निघाले तेव्हा संभाजी सोबत होते, पुढे त्यांना श्रृंगारपुरात ठेवले.

दरम्यान राजपरिवारातील या गृहकलहाच्या वार्ता दक्षिणेचा मोगल सुभेदार दिलेरखान याच्या छावणीपर्यंत पोहोचल्या होत्या. त्याने संभाजीराजांशी संधान बांधून त्यास आपल्या बाजूवर ओढले. ता. १३ डिसेंबर १६७८ रोजी संभाजी राजे सज्जन गडावरून दुर्जनगडावर दिलेरखानाला भेटले. पुढे दिलेरने संभाजीराजासह भूपाळगडावर हल्ला चढविला आणि अनंत अत्याचार केले.[५६] ही गोष्ट छ. शिवाजी महाराजांना समजली तेव्हा ते बहुचिंतीत झाले. संभाजी राजे दिलेरबरोबर विजापूरच्या मोहिमेत सामील झाले होते. छ. शिवाजी राजांचे संभाजी राजांना स्वराज्याकडे परत आणण्याचे प्रयत्न चालूच होते. संभाजी राजांना पश्चाताप झाला व ते स्वराज्यात परत आले. पन्हाळ्यास पितापुत्रांची भेट झाली.

छ. शिवाजी महाराजांच्या ता. ३ एप्रिल १६८० या दिवशी झालेल्या अकाली निधनानंतर अण्णाजी दत्तो, मोरोपंत इ. प्रधानांनी सोयराबाईच्या सांगण्यावरून १२ एप्रिल रोजी राजारामाचे मंचकारोहण केले आणि संभाजीला कैद करण्यासाठी त्यांनी पन्हाळगडाकडे कुच केले. दरम्यान महाराजांच्या निधनाची वार्ता संभाजींना समजली आणि त्यांनी पन्हाळागडावरून राज्याची सर्व सुत्रे आपल्याकडे घेऊन स्वत:ला राजा म्हणून घोषित केले. सेनापती हंबीररावाने अण्णाजी दत्तो, मोरोपंत प्रधानांना कैद करून संभाजीसमोर हजर केले. १८ जूनला संभाजीराजे पन्हाळ्यावरून रायगडास आले आणि २० जुलैला त्यांनी आपले मंचकारोहणही केले.[५७]

यावेळी अण्णाजी दत्तो, मोरोपंत, बाळाजी आवाजी इ. अधिकाऱ्यांची त्यांनी मुक्तता केली एवढेच नव्हे, तर त्या सर्वांना माफी करून पूर्वीच्या पदावर परत त्यांची नेमणूक केली. संभाजींच्या या वागणुकीबद्दल सुरतकर इंग्रज ता. १८/१०/१६८० च्या

पत्रात लिहितात, "Whose Present proceedings seene to speak him to be of a contracy spirit and temper to his father by a much more moderate and human Government"[५८] म्हणजे संभाजीच्या चालू कारभारावरून तो वडिलांपेक्षा निराळ्यावृत्तीचा व स्वभावाचा म्हणजे अधिक मवाळ आणि दयाळू दिसतो.

संभाजी राजाचा विधियुक्त राज्यभिषेक शके १६०२ माघ शुद्ध सप्तमी म्हणजे ता. १६ जानेवारी, १६८१ ला रायगडावर पार पडला.

औरंगजेब पुत्र शहजादा अकबर आपल्या बापाशी विद्रोह करून महाराष्ट्रात संभाजीराजांच्या आश्रयास आला. अकबर हा दुर्गादास राठोडासह इ.स. मे १६८१ या दिवशी नर्मादा ओलांडून महाराष्ट्रात आला. संभाजीने त्यांना आणि त्याचा सहाय्यक मित्र दुर्गादास राठोड या दोघांना महाडजवळ पाली येथे ठेवले.[५९] संभाजी राजाने औरंगजेब सारख्या बादशहाला न जुमानता त्याने अकबरास आश्रय दिला. औरंगजेबाने मराठ्यांच्या राज्यावर चौफेर हल्लाकरण्याची जय्यत योजना आखली व तो दक्षिणेत निघाला.

राज्यकारभार हाती घेतला तेव्हा संभाजी महाराजांपुढे तीन प्रमुख शत्रु उभे होते, आणि या तिन्हीचा संबंध सागरी किनाऱ्याशी होता. जंजिऱ्याचा सिद्दी, गोव्याचे पोर्तुगीज आणि मुंबईचे इंग्रज या तिन्ही नाविक शक्तींनी पश्चिम किनारा आपल्या ताब्यात घेतला होता व ते राजकारण करत होते.[६०] आरंभी संभाजीने सिद्दीवर वचक बसविला. पोर्तुगीजांशी युद्ध करून गोवा ताब्यात घेतले, इंग्रजांनी संभाजी महाराजांशी धुर्तपणाने प्रत्यक्ष लढाई करण्याचे टाळले कारण संभाजी राजाचा कोकण पट्टीतील पराक्रम पाहून इंग्रजांनी काहीशी माघारही घेतली होती.

औरंगजेबाने इ.स. १६८६ मध्ये विजापूरचे राज्य जिंकले व इ.स. १६८७ मध्ये गोवळकोंड्याची कुतुबशाही घेतली. तेव्हा तो आपले सर्व बळ संभाजीराजांना नामोहरण करण्यासाठी वापरण्यास मोकळा झाला. संभाजी राजांनी प्रत्येक ठिकाणी औरंगजेबाला शह दिला व औरंगजेबाच्या बऱ्याच सरदारांचा पराभव केला.

ता. १ फेब्रुवारी १६८९ रोजी कवी कलश व संभाजी महाराज खेळण्याहून राजगडाला जात असताना त्यांनी वाटेत संगमेश्वरास मुक्काम केला.[६१] ही बातमी औरंगजेबाचा सरदार मुकर्रबखानाला ही वार्ता हेरांकडून समजली. मुकर्रबखान एकाएकी

संगमेश्वरावर चालून आला. मुकर्रबखानाला लढा देण्यासाठी संभाजी महाराजांकडे असलेल्या ३०० मराठे सैन्यांनी लढण्यास सुरूवात केली. पण त्यांचा निभाव लागला नाही. संभाजी महाराज, कवि कलश व त्यांच्या पंचवीस माणसास कैद केले. या वेळी औरंगजेब अकलूज येथे होता. या बातमीने त्याला अतिशय आनंद झाला.

बेंद्रे याबाबतीत म्हणतात की, ''अकल्पित व अकस्मितपणे कैद झालेल्या संभाजी राजांस पातशहासमोर उभे करीताच औरंगजेबाला आपल्या साऱ्या आयुष्यात इतका फजित करणारा शत्रु भेटला नव्हता, त्या शत्रु संकटाचे निरसन ईश्वराने केलेले पाहून पातशहाला हायसे वाटले आणि त्याने तात्काळ ईश्वराची प्रार्थना केली असा बादशहावर कधीच प्रसंग आला नव्हता.''[६२] यावरुन संभाजीराजांच्या थोर राजकारणाच्या परिणामांच्या तीव्रतेचे प्रदर्शन होते.

औरंगजेबाने संभाजीचे खूप हाल केले त्यांची धींड काढली पण संभाजी राजाने आपला बाणेदारपणा सोडला नाही. ता. १५ फेब्रुवारी १६८९ च्या रात्री संभाजीचे डोळे काढले. दुसऱ्या दिवशी कलुशाची जीभ उपसण्यात आली. धर्मशास्त्री व अमीर, उमरावानी त्यांना पिडणाऱ्या, नगरे उदध्वस्त करणाऱ्या संभाजीला ठार मारावे असा सल्ला दिला. त्याचेही तेच मत होते. त्याप्रमाणे कोरेगाव येथे ता. ११ मार्च १६८९ रोजी तलवारीने संभाजी आणि कवी कलश यांना ठार करण्यात आले.[६३]

संभाजी महाराजांनी आपल्या ८ ते ९ वर्षाच्या कालखंडामध्ये एक तसू भरही जमीन जावू दिली नाही. त्याने औरंगजेबासारख्या प्रबळ बादशहाला शह दिला. त्याने सिद्दी, पोर्तूगीज तसेच इंग्रजांचा प्रदेश जिंकून घेतला. संभाजी महाराजांचा अत्यंत दु:खद शेवट झाला. त्यांच्या या बलीदानामुळे त्या अद्‌भूत आणि रोमांचकारी आयुष्याचा कळस झाला.

संभाजी महाराजांच्या योग्यतेबद्दल काही इतिहासकारांनी पुढील उद्‌गार काढले आहेत.

डॉ. खोबरेकर म्हणतात, ''संभाजी राजाने आपले प्राण पणावर लावून नऊ वर्षेपर्यंत स्वराज्य सुरक्षित ठेवले आणि औरंगजेबाची आक्रमणे हाणून पाडली हे

संभाजीचे खरे व्यक्तिमत्त्व आहे. आणि यामुळेच मराठ्यांचा हा लाडका राजा, शिवपुत्र संभाजी, मराठ्यांच्या इतिहासात अमर झाला आहे.[६४]

शत्रुच्या कैदेत सापडूनही संभाजीराजांचा बाणेदारपणा धैर्य अभिमान, करारीपणा, निर्भयता आणि तेज यत्किंचितही कमी झालेले नव्हते. शत्रू शत्रूच वाटू नये, त्याच्याशी राज्याचा विक्रा करूनही आपण विलास भोगीत राहावे असे संभाजी राजांकडून घडले नाही. अपमानित जीवन जगण्यापेक्षा, मरण पत्करणाऱ्या संभाजी राजांवर विलासाचा पगडा किती क्षणिक असावा हे सहज लक्षात येण्यासारखे आहे. तसे नसते तर मोगलांचे अधिपत्य पत्करून संभाजी राजे विलासी जीवन जगले नसते का? आपल्या जीवंतपणी त्यांनी केलेल्या कृत्यांनी मराठी स्वराज्यासाठी जी अपरंपार हानी झाली ती त्यांनी आपल्या दिव्य मरणाने भरून काढली. त्यांच्या मृत्यूमुळे मराठे पुन्हा चवताळून उठले.''[६५]

### १.२.२.५ छत्रपती राजाराम महाराजः-

श्री छत्रपती शिवाजी महाराजांना दोन पुत्र होते, पहिले छत्रपती संभाजी महाराज आणि दुसरा मुलगा राजाराम. राजारामचा जन्म मातोश्री सोयराबाई साहेब यांचे पोटी ता.२४ फेब्रुवारी १६७० रोजी झाला. जेध शकावलीत फाल्गुन शुद्ध २५, शके १५९१ (ता. २४ फेब्रुवारी १६७०) अशी नोंद आहे.[६६] छ. राजाराम महाराज हे शांत स्वभावाचे असून छत्रपतीतील योग्य अशी सर्व लक्षणे त्यांच्यात होती.

आजी जिजाबाई ह्या राजाराम महाराजांच्या वयाच्या पाचव्या वर्षी निवर्तल्यामुळे राजाराम महाराजास संभाजी महाराजांसारखी त्यांच्याकडून शिकवणूक मिळाली नाही. मात्र ते संभाजी राजांच्या पत्नी येसुबाई साहेबांजवळ वाढले आणि त्यांचाच त्यांना लळा लागला. राजाराम महाराजांचे पहिले लग्न प्रतापराव गुजरांच्या मुलीशी झाले व दुसरे लग्न ताराबाईशी झाले.

शिवाजी महाराजांच्या आकस्मित निधनानंतर संभाजी महाराजांचे हक्क डावलून आपला मुलगा राजाराम यास गादी मिळावी अशी खटपट सोयराबाईंची चालू होती. त्यास यश आले. पण शिवाजी महाराजाचे सरसेनापती हंबीरराव मोहिते यांच्या मदतीने संभाजी राजाने सोयराबाईला यशस्वी होऊ दिले नाही. पुढे संभाजी राजेच छत्रपती झाले.

संभाजी महाराज मुघल सैन्यांकडून पकडले गेल्याची बातमी रायगडावर येऊन धडकली, तेव्हा रायगडावर राज्य कारभाराची नवी व्यवस्था करण्यात आली. या वेळी राजाराम किल्ल्यात नजरकैदेत होते. त्यांना रायगडाचा किल्लेदार चांगोजी काटकर व येसाजी कंक यांनी माघी अमावस्येस (ता. ९ फेब्रुवारी १६८९) बाहेर आणुन फाल्गुन शुद्ध तृतीयेस मंचकी बैसविले. त्यावेळेस संभाजी महाराज हयात होते. त्यांचा वध ता. ११ मार्च १६८९ रोजी झाला. मानाजी मोरे व वरकड जे संभाजी महाराजांनी धरिले होते ते सोडीले व त्यांचा कार्यभाग त्यांसी देऊन राजाराम महाराज राज्य करू लागले.[६७]

राजाराम महाराजाचा पुढे राज्यभिषेक झाला. त्यांच्यापुढे सर्वात महत्त्वाचा शत्रू म्हणजे औरंगजेब होता. औरंगजेबाला लढा देण्यासाठी त्यांनी मोगलांचे ज्यांशी यावेळी शत्रुत्त्व उत्पन्न झाले, त्यांच्याशी सलोख्याचे संबंध ठेवण्याचे मुत्सद्देगिरीने ठरविले. याच वेळेस मोगल सेनानी झुल्फिकरखानाने रायगडास ता. २५ मार्च १६८९ रोजी वेढा घातला. मोगलांनी घातलेल्या वेढ्यात राजाराम, राणी येसूबाई व राजकुमार शाहु होते. तसेच इतर मंडळी होती. या कठीण परिस्थितीतून मार्ग काढण्यासाठी येसूबाई, राजाराम, मंत्री व सरदार यांच्यात बैठक झाली. त्यात राणी येसूबाईने असा सल्ला दिला की, छ. राजाराम व त्यांच्या मंत्र्यांनी रायगडावरून निसटून बाहेरच्या मुलूखात मोगलांविरूद्ध युद्धाची दुसरी आघाडी उघडावी व शाहूंनी रायगडावर राहावे अशी सल्लामसलत झाली. शेवटी राजाराम महाराजाने ता. ५ एप्रिल १६८९ रोजी छ. राजाराम व त्यांचे मंत्री रामचंद्र अमात्य, प्रल्हाद निराजी, शंकराजी नारायण आणि इतर मुत्सद्दी रायगडाहून निसटून प्रतापगडावर गेले.[६८]

प्रतापगडावर फार काळ न थांबता राजाराम महाराज पन्हाळ्यास आले. तेथून त्यांनी सर्व मराठे किल्लेदारास हुशार राहून मोगलांचा पाडाव करण्यासाठी आपल्या सहीची पत्रे पाठविली. राजाराम महाराज ज्या गडावर जात तिकडे मोगली फौजा त्यांना पकडण्यास धावत असत. स्वराज्यातील इतर गडासही वेढे पडले होते.

विजयादशमीनंतर पन्हाळ्यास मोगल सैन्याने वेढा दिला. तेव्हा राजाराम महाराजांनी सरदार मंडळीशी विचार करून शंकराजी नारायण सचिवाकडे कोरीगडा भोवतालचा भाग सोपविला, तसेच महाराष्ट्रातील स्वराज्याचा कारभार रामचंद्रपंताकडे

सोपविला. (रामचंद्र यांना 'हुकूमत पन्हा' किताब दिला) आणि राजाराम महाराजांनी ता. १५ नोव्हेंबर १६८९ रोजी पन्हाळगड सोडून जिंजीस निघाले. ते जिंजीस ता. २६ नोव्हेंबर १६८९ ला पोहचले. प्रल्हाद निराजी व खंडो बल्लाळ यांनी जिवाची बाजी लावून राजाराम महाराज व त्यांच्या बरोबरचा लवाजमा जिंजीस आणला. जिंजी येथे राजधानी करून सर्व लोक सावधतेने राहू लागले. थोडी स्थिर स्थावर होताच मराठ्यांचे राज्य कायम आहे याची जाणीव सर्वत्र राहण्यासाठी राजाराम अष्टप्रधानांच्या नेमणुका केल्या. स्वत: छत्रपती पद व राजचिन्हे धारण केले. राज्यभिषेक केला नाही.[६९] राजाराम महाराजांचे एकूण राज्यभिषेकेनंतरचे जीवन हे फक्त धावपळीत गेले. ते ज्या ज्या गडावर जात होते तेथे तेथे मोगल सैनिक वेढा घालत होते. त्याचे जीवन हे धावपळीचे झाले होते.

जिंजीमध्ये मराठ्यांनी कर्नाटकांतील राजधानी निर्माण केली. कर वसूल करणे, नव्या अधिकाऱ्यांच्या नेमणुका करणे, ठाणी व किल्ले यांचा बंदोबस्त राखणे, नवे लष्कर उभारणे, मोगलांशी लढण्यासाठी कर्नाटकांतील हिंदू नायकांचे सहकार्य मिळविणे आणि राज्यकारभार आणि मोगलांशी युद्ध करण्यासाठी पैसा मिळविणे यासारखी कार्ये आता जिंजीमध्ये सुरू झाली.[७०] कारण राजाराम महाराजांजवळ द्रव्यसंग्रह नव्हता. तसेच त्यांनी मोगलांकडे असलेल्या हिंदू सरदारांना स्वराज्य रक्षणासाठी आपल्याकडे येण्याचे आवाहन केले. तर इकडे औरंगजेबाने मराठे सरदारांना आपल्याकडे आणण्याचा प्रयत्न करताना मराठे सरदारांना फितविण्यासाठी वतनदारी व मनसबदारी देण्याचे सुरू केले व तो यशस्वी सुद्धा ठरला. तेव्हा राजारामांनी औरंगजेबाचे शस्त्र वापरले व त्यांनी सुद्धा वतनदारी देण्यास सुरूवात केली. ज्या शिवाजी महाराजांनी वतनदारी बंद केली होती, ती छ. राजारामापुढे पर्याय नव्हता, म्हणून त्यांनी सुरु केली होती असे दिसते.

जिंजीला असताना संताजीने व धनाजीने या काळात केलेली कामगिरी राजाराम महाराजांचे आसन जिंजीस स्थिर राहण्यास उपयुक्त ठरली. यादोघांनीही मोगल सैन्याशी जे निकराचे सामने दिले ते फारसी इतिहासकारांना नमूद करून ठेवावे लागले आहेत. त्यांनी या दोन शूर सेनांनी विरूद्ध कितीही तुच्छतेने लिहिले तरी शेवटी त्यांच्या लढ्यांपुढे मोगलांची जी प्रचंड हानी होत होती ती त्यांना निवेदन करावीच लागली आहे. या बाबतीत पगडी संताजीबद्दल म्हणतात की, ''ज्याला ज्याला म्हणून संताजीशी मुकाबला करण्याचा

व लढण्याचा प्रसंग आला त्याच्या नशिबी खालीलपैकी एक परिणाम ठेवलेलाच असे. एक तर तो मारला जाई किंवा जखमी होऊन कैदेत सापडे किंवा त्याचा पराभव होई आणि त्याचे सैन्य व बाजार बुणगे गारद होत असत. त्याचा मुकाबला करण्यास एकही सरदार तयार होत नसे.''[७१] संताजी व धनाजीने जे मराठ्यांच्या स्वातंत्र्य युद्धामध्ये जे कार्य केले ते अजरामर ठरले.

औरंगजेबाने झुल्फिकारखानाला आपल्या शूर व मुत्सद्दी सरदारासह कर्नाटकातील जिंजीस वेढा घालण्यास पाठविले. त्याने कर्नाटकात येऊन जिंजीच्या भक्कम किल्ल्यास वेढा घातला. (१६९०). वेढा जवळ जवळ सात वर्षे चालू होता. शेवटी राजाराम महाराज ता. २६ डिसेंबर १६९७ रोजी जिंजीच्या किल्ल्यातून बाहेर पडले. प्रथम त्यांनी कर्नाटकातील वेल्लोरच्या किल्ल्यात मुक्काम केला. तेथे लौकरच ताराबाई, राजसबाई, शिवाजीराजे (ताराबाईचा मुलगा) व सोयराबाई येऊन पोहोचल्या. त्यांच्या संरक्षणासाठी महाराष्ट्रातून रामचंद्रपंतांनी पाच हजार सैन्य पाठविले होते. महाराजांनी आपल्या कबिल्यासह इ.स. फेब्रुवारी १६९८ मध्ये वेल्लोर सोडले व कोपल, भुदरगड मार्गे प्रवास करुन ते मार्चच्या शेवटच्या आठवड्यात पन्हाळ्याला पोहचले.[७२] तेथून नंतर विशाळगडावर गेले.

काही महिने विशालगडास काढून राजारामाने आपली गादी सातारा किल्ल्यावर आणली. विशालगड अगदी एका बाजूस आणि बादशहाच्या हालचालीवर नजर ठेवण्यास सातारा किल्ले सोयीचे आहे असे सल्लागारांच्या विचाराने त्याने ठरविले. राजाराम हाती येत नाही व मराठे आपणास दाद देत नाहीत हे पाहून बादशहा अत्यंत व्याकुळ झाला. त्याची समजूत झाली की आपले सेनानायक मनापासून उद्योग करीत नाहीत कुचराई करतात, तेंव्हा आता स्वतःच युद्धाची सूत्रे आपल्या हाती घेण्याचे ठरविले[७३] व त्याने प्रथम मावळातील किल्ले घेण्याचा निश्चय केला.

इ.स. १६९९ च्या आरंभी राजारामाने आपल्या सर्व किल्ल्यांची पाहणी करण्याकरिता कोकणाचा दौरा केला. पुढे त्याने खांदेश आणि वऱ्हाड यांच्यावर सर्वदूर हल्ले करण्याचे ठरविले.

या एकूण धावपळीमध्ये राजाराम महाराज सिंहगड येथे आले व तेथे अल्पकाळ ज्वर येऊन आणि छातीच्या विकाराने रक्ताच्या गुळण्या होऊन त्याच आजारांत त्यांचा फाल्गुन व.९ ता. २-३-१७०० रोजी मृत्यू झाला. मृत्यूसमयी त्याचे दोन मुले व दोन्ही स्त्रिया पन्हाळगडावर होत्या. एक अंबिकाबाई विशाळगडावर होती ती सती गेली.[७४]

संभाजी राजाच्या मृत्यूनंतर मराठ्याचे राज्य पुढे राजाराम महाराजांनी चालू ठेवले. त्यांनी औरंगजेबाला यशस्वी लढा दिला. त्यांना सत्तेचे लोभ नव्हते. त्यांनी हे राज्य शाहूचेच आहे असे समजून त्यांनी राज्यभिषेक केले नव्हते, त्यांचा स्वभाव हा नि:स्वार्थी, निगर्वी व बाणेदार होता. मंचकारोहणानंतरचे जीवन हे त्यांचे धावपळीत गेले. एका किल्ल्याहून दुसऱ्या किल्ल्यावर अशा धावपळीत सुद्धा त्यांनी मराठी राज्याचे रक्षण केले.

रियासतकार सरदेसाईंनी राजारामाच्या कारकीर्दीचे वर्णन अतिशय योग्य शब्दात केलेले आहे ते म्हणतात, ''राजारामाची कारकीर्द म्हणजे कर्ती माणसे निपजविण्याची खाण, स्वराष्ट्राभिमान शिकविण्याची उत्तम शाळा व पराक्रम आणि कीर्ती गाजविण्याची उत्तम रंगभूमी असे म्हटले असता वावगे होणार नाही.''[७५]

कुलकर्णी अ. रा. याबाबत म्हणतात, ''छ. राजारामांचा कालखंड मराठ्यांच्या इतिहासात ''निर्णायक कालखंड'' त्या काळात स्वराज्याचे नेते छ. राजाराम महाराज हे महाराष्ट्राला सदैव आदर्श ठरतील असे होते! मराठ्यांच्या इतिहासातील महापुरुषांतच त्यांची गणना करावी लागेल!''[७६]

### १.२.२.६ महाराणी ताराबाई:-

महाराणी ताराबाई या स्वातंत्र्यवीराच्या कन्या होत्या. स्वातंत्र्यप्रेमाचा व शौर्याचा वारसा पित्याकडून त्यांना मिळाला होता. त्यांच्या माहेरची शौर्यशाली परंपरा त्यांच्या पाठीमागे उभी होती. ताराबाईचा जन्म सुमारे इ.स. १६७५ साली झाला. त्यांच्या जन्मापासून ते लग्नापर्यंत साधारण दहा वर्षाचा कालखंड हा लष्करी धामधुमीचा व राजकीय उलाढालीचा होता. इ.स. १६८४-८५ च्या सुमारास राजाराम-ताराबाई यांचा विवाह झाला.[७७]

राजाराम महाराजाच्या मृत्यूनंतर राज्यकारभार चालविण्याची जबाबदारी ताराबाईवर येऊन पडली. आपल्या पतीच्या हयातीतच ह्या स्त्रीने राज्यकारभार व लष्करी मोहिमांत भाग घ्यावयास सुरुवात केली.

ताराबाईने आपला मुलगा शिवाजी राजांचा राज्यभिषेक सोहळा विशाळगडावर इ.स. १७०१ मध्ये पार पडला असावा. खुद ताराबाई ता.२८ नोव्हेंबर, १७०३ च्या एका सनदेत म्हणतात, ''त्या उपरी विशालगडी स्वामी सिंहासनारुढ जहालियाउपरी स्वामी निमित्य व स्वामीच्या राज्यनिमित्य बहुतच श्रमसाहास करीत आहा.''[७८] म्हणजे शिवाजींचा राज्यभिषेक झाला होता, असे दिसते.

ताराबाई यांनी सर्व कारभार आपल्याकडे घेतल्याचे व त्या स्वत: राज्यकारभार पाहू लागल्याचे अनेक उल्लेख तत्कालीन कागदपत्रावरुन दिसतात. केवळ दैनंदिन राज्यकारभारच ताराबाई पाहत होत्या असे नसून सैन्याचे नेतृत्व, मोहिमांची आखणी व अंमलबजाणीही त्या करीत होत्या, याबाबत खाफीखान म्हणतो, ''रामराजाची बायको ताराबाई हिने आपल्या तीन वर्षाच्या मुलाला राजारामाच्या जागी बसविल्या. तिने सगळा कारभार आपल्या हाती घेतला. सरदारांच्या नेमणुका, त्यांच्या बदल्या, राज्याचा कारभार, बादशाही मुलुखावरील हल्ले या सर्व गोष्टी तिच्या तंत्राने चालू लागल्या. तिने आपल्या सरदारांची मने आपल्याकडे ओढून घेतली. तिने आपल्या सैन्याची योजना अशी केली की, दक्षिणेचे सहा सुभे, सिरोज, मंदसोर, आणि माळव्याच्या सरहद्दीपर्यंत मराठ्यांनी धामधूम उडविली. बादशहाने आपली हयात मोहिमा करणे आणि किल्ले घेणे यात घालविली. तिच्याविरुद्ध तो शेवटपर्यंत लढत राहिला पण काफरांचे बळ व बंड ही दिवसेंदिवस वाढतच गेली.''[७९]

इ.स. १७०० ते १७०७ हा कालखंड मराठ्यांच्या इतिहासामध्ये खूप महत्त्वाचा आहे. या कालखंडामध्ये मराठ्यांचा छत्रपती फक्त तीन वर्षाचा होता. यावेळेस ताराबाईने सर्व गोष्टींना लढा देण्यास सुरुवात केली. रानडे याबाबत म्हणतात, ''स्वातंत्र्य युद्धात लढून ते यशस्वी करणाऱ्या देशभक्तांच्या बाजूस अशी कोणतीच अनुकूलता नव्हती. वैयक्तिक चारित्र्य आणि शौर्य यांचे आपल्या देशबांधवांना अनिवार्य आकर्षण उत्पन्न करणारा शिवाजी सारखा एकही नेता या देशभक्तांजवळ नव्हता. औरंगजेबाच्या

पुढाकाराखाली आलेल्या आणि साम्राज्याचे सर्व पाठबळ असलेल्या तमाम बादशाही फौजांशी या देश भक्तांना लढावे लागले.[८०]

औरंगजेबाने सातारा, पन्हाळा, विशालगड तसेच पुढे सिंहगड, राजगड आणि तोरणा काबीज केला. मोगल बादशहा मराठ्यांचे एक-एक किल्ले घेत होता, तर मराठ्यांनी औरंगजेब परत फिरला की परत तो किल्ला जिंकून घेत असत. याबाबत मनुची म्हणतो, ''मराठे कावेबाज आहेत. बऱ्याच वेळा मोगलांना ते किल्ला घेऊ देतात. मोगलांकडून त्या किल्ल्यात साधनसामग्रीची चांगली व्यवस्था होईपर्यंत थांबतात आणि मग मोगलांनी किल्ला काबीज करताना दाखविलेल्या तत्परतेपेक्षा अधिक तत्परतेने तो त्यांजकडून हस्तगत करतात. मराठ्याचे सर्व किल्ले जिंकून घ्यायची मनातली महत्त्वाकांक्षा बादशहाने सोडली नाही तर त्याला जेवढी वर्षे तो जगला आहे तेवढीच वर्षे आणखी जगायला हवे.''[८१]

ताराबाई ही एक स्त्री म्हणून ती प्रत्यक्ष रणांगणावर जाऊन कधी लढू शकली नाही पण किल्ल्यावर ऐषआरामात बसून नुसते हुकूम फर्मावण्याचे कामही केले नाही. या धामधुमीच्या काळात ताराबाई प्रत्येक किल्ल्यावर स्वत: जाऊन तेथील तरतूद पाहून, बादशहाच्या हालचाली लक्षात घेऊन, आपले युद्ध धोरण ठरवित होती. तसेच तिने राज्यकारभार व्यवस्थित चालविण्यासाठी अष्ट प्रधानांच्या नेमणूका केल्या.

मराठ्यांच्या स्वातंत्र्य युद्धामध्ये अनेक सरदाराने, सेनापतीनी महत्वाचे कार्य केले आहे. धनाजी जाधवाने प्रत्येक आघाडीवर औरंगजेबाच्या सरदाराचा पराभव केला. इ.स. १७०४ मधील स्थितीबद्दल मनुची म्हणतो, ''मराठ्यांचे सेनापती आणि त्यांची सैन्ये ही आजकाल मोठ्या आत्मविश्वासपूर्वक संचार करतात. याचे एकच कारण म्हणजे त्यांनी मोगल सेनापतींना वाकविले आणि त्यांच्यात दहशत निर्माण केली. सध्या मराठा सैन्याजवळ तोफा, बंदुका, धनुष्यबाण, अग्निबान व सामानसुमान वाहून नेण्याकरिता हत्ती उंट, इत्यादी आहेत. इतकेच नव्हे तर तंबूही त्यांच्या जवळ आहेत. थोडक्यात मोगल सैन्याजवळ जी जी शस्त्रास्त्रे आणि जे जे शस्त्रास्त्र व साहित्य होते, ते सर्व आता मराठ्यांजवळही आहेत आणि मोगल सैन्याच्या जशा हालचाली होत तशाच आता मराठा सैन्याच्याही हालचाली होत आहेत.''[८२]

औरंगजेबाला खूप दु:ख वाटत होते त्याला वाटत होते की, आपण का या मराठ्यांच्या युद्धात पडलो, जर आपण परत दिल्लीकडे गेलो तर मराठे परत आपले राज्य जिंकून घेतील असे त्याला वाटत होते. यातच त्याचा मृत्यू झाला. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर एक-दोन महिन्यांच्या आत मराठ्यांनी मोगलांकडून सिंहगड, पुरंदर, पन्हाळगड, विशाळगड, सातारा व परळी हे किल्ले जिंकले.

मराठ्यांच्या स्वातंत्र्य युद्धामध्ये ताराबाईने खूप कर्तबगारी दाखविली. तसेच या स्वातंत्र्य युद्धामध्ये अनेक कर्तबगार पुरुषाला जन्म दिला. स्वातंत्र्य युद्धाचे प्रमुख वैशिष्ट्ये म्हणजे मराठ्यांची युद्धपद्धती, मराठ्यांचा गनिमी कावा मोगलांना कधीच समजला नाही. ताराबाई ही साधारण पंचवीस वर्षाची एक तरुण विधवा राणी मुरब्बी औरंगजेबासारख्या सम्राटाशी लष्करी संघर्ष करावयास उभी राहते आणि सतत सात वर्षे संघर्ष करुन पराजित होत नाही. यावरुन तिची कर्तबगारी सिद्ध होते.

ताराबाईच्या कर्तबगारीबद्दल तत्कालीन मराठी कवी गोविंदने वर्णन केले,

"दिल्ली झाली दीनवाणी। दिल्लीशाचे गेले पाणी।
ताराबाई रामराणी । भद्रकाली कोपली।।
ताराबाईच्या बखते। दिल्लीपतीची तखते।
रवचो लागली तेवि मने। कुराणेही खंडली।।
रामराणी भद्रकाली । रणरंगी क्रुद्ध झाली।
प्रलयाची वेळ आली।मुगल हो सांभाळा।।"[८३]

डॉ. सोवणी म्हणतात, "सात वर्षात तिने जो रणसंचार केला, सर्व सरदारांची एकजूट केली प्रतिनिधी, अमात्य, यांसारख्या मुत्सद्दी मंडळींना कार्यान्वित करुन मराठी समशेर अखंडपणे तळपत ठेवली आणि राज्य तारले त्या तिच्या कर्तबगारीस आणि पराक्रमास उभ्या मराठी इतिहासात तोड मिळणार नाही."[८४]

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर कैदेत असलेल्या शाहूस आज्जमशहाने सोडून दिले.शाहू व ताराबाई यांच्या यादवी युद्धामध्ये छ. शाहू महाराजांचा विजय झाला. याचा आपण पुढील प्रकरणात विस्ताराने अभ्यास करणार आहोत.

इ.स. १६३० ते इ.स.१७०७ या कालखंडामधील सामाजिक, आर्थिक, धार्मिक व सांस्कृतीक परिस्थिती कशी होती याचा अभ्यास येथे आपण करणार आहोत. शिवाजी महाराजापासून ते ताराबाई यांच्या कालखंडामध्ये समाजिक स्थिती, आर्थिक व्यवहार व धार्मिक व सांस्कृतीक परिस्थिती कशी होती. तसेच औरंगजेबाच्या आक्रमणानंतर यामध्ये काय बदल झाले म्हणजेच एकंदरीत महाराष्ट्रावर त्याचा काय परिणाम झाला होता. याची सविस्तर चर्चा पुढीलप्रमाणे करता येईल.

## १.३ सामाजिक परिस्थिती:-

साधारणत: महाराष्ट्रामध्ये वेगवेगळ्या जाती-पंथाचे लोक राहत होते. पण या कालखंडामध्ये जात हे महत्त्वाचे अंग होते. त्या काळात एखाद्या व्यक्तीवर असलेला जाती संस्थेचा पगडा हा कुटुंब संस्थेच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा होता. अशाप्रकारे कुटुंब हे संघटित समाजाचे प्रमुख माध्यम होते. त्या काळातील कुटुंबपद्धती ही एकत्र कुटुंब पद्धती होती आणि ती म्हणजे प्राचीन काळापासून हिंदू समाजात चालत आलेली पद्धत होती असे म्हणता येईल. जातीयतेमुळे उपजातीतील विवाहदेखील निषिद्ध मानले जात होते. जातीबाह्य वर्तन केले तर जाती बहिष्कृत करणे किंवा आपल्या जातीकडून सरकारकडून ती व्यक्ती शिक्षेस पात्र होत असे. इतके कठोर जातीचे नियम होते.

महाराष्ट्रात सतीची चाल फार मोठ्या प्रमाणात होती. ब्राह्मण,मराठा आणि तत्सम लढवय्या जमातीत ही प्रथा प्रामुख्याने होती. आपल्याला असे दिसून येते की, केवळ पत्नीच नव्हे तर रखेल आणि दासीदेखील आपल्या मालकाच्या चितेवर स्वत:ला जाळून घेत.[८५] मात्र ही प्रथा जास्त प्रचारात नव्हती. समाजामध्ये हुंडा पद्धती अस्तित्वात होती. पण ती उच्च वर्गातच प्रचलित होती. असे आढळून येते की, काही जातीत मुलीच्या बापाला मुलाकडून चांगल्या प्रकारची रक्कम मिळत असे. म्हणजेच लग्नासाठी मुलींची खरेदी केली जाई.

या काळात समाजामध्ये अंधश्रद्धा अस्तित्वात होती, त्यामध्ये लोकांची समजूत होती की ग्रामदेवता ही कॉलरा, देवी, प्लेग यासारखे रोग सूड घेण्यासाठी आणतात असे मानले जाई. रोग टाळण्यासाठी गावकरी योग्यवेळी प्राणी आणि इतर देणगी देऊन त्यांची वैशिष्ट्यपूर्ण पुजा वेळोवेळी करीत. देवीच्या रोगाची देवता कडक लक्ष्मी हिची आराधना

करण्यासाठी तिच्या करता जत्रा भरवून प्रार्थना करण्यात आल्याचे पूरावे दाखल आहेत.[८६] महाराष्ट्रातील ग्रामदेवता एकंदरीत बहिरोबा किंवा भैरव, मारुती, म्हसोबा, खंडोबा, दुर्गा, भवानी, शिव आणि इतर. तसेच लोकप्रिय देवामध्ये महाराष्ट्रातील पंढरपूरचा विठोबा, तुळजापूराची भवानी, जेजूरीचा खंडोबा आणि कोल्हापूरची महालक्ष्मी या प्रमुख आहेत. विशेष म्हणजे त्यांची ब्राम्हणांपासून ते अस्पृश्यतापर्यंत सर्वच लोक प्रार्थना करतात.

महाराष्ट्रामध्ये प्रत्येक गावांना महत्व होते व त्या गावाचा प्रमुख हा पाटील असे. तसेच गावात अलुतेदारी व बलुतेदारी प्रथा होती, त्याप्रमाणे लोक वागत असत. तसेच बेठबिगारी अस्तित्वात होती. गावचा पाटील हा महार, वाजंत्री आणि कारागीर यांच्याकडून विनामूल्य काम करुन घेत असे. त्यास बेठबिगार म्हणत असत. कोकणात कुलकर्णी पदाच्या हक्काच्या सनदेत खाजगी कामासाठी बेठबिगारीचा समावेश असे. बेठबिगार म्हणजे जबरदस्तीने करुन घेतलेले काम ही सरंजामशाहीतील पद्धत अस्तित्वात होती. शारीरिक श्रमाच्या स्वरुपात किंवा श्रमाऐवंजी नगद रकमेच्या स्वरुपात ही बेठबिगारी करून घेतली जात असत व आपल्या जमिनी तशाच न करता ठेवत असत.[८७] म्हणजे समाजामध्ये उच्च लोकांकडून खालच्या लोकांची पिळवणूक होत असे.

छ. शिवाजी महाराजांनी आपली सैन्य भरती केवळ मराठ्यांतूनच केली असे नाही तर त्यांनी समाजातील प्रत्येक जातीतील लोकांची भरती केली. उदा. मेंढपाळ, गुजराथी, धनगर, शेतकरी, कातकरी, रामोशी, मोलमजूरी करणारे या वर्गातून केली. त्यांच्यामध्ये लढण्याची इर्षा उत्पन्न केली. शस्त्रे वापरण्याचे शिक्षण दिले.

याबाबत जयसिंगराव पवार म्हणतात,"छ. शिवाजी महाराजांनी प्रत्येक जातीत असणाऱ्या गुणांचा उपयोग त्यांनी राज्याच्या कामी करुन घेतला. स्वराज्य बांधनीच्या व रक्षणाच्या कामी सर्व जाती जमातींना जुंपत असता, महाराजांनी माणूस कोणत्या जातीचा आहे हे न पाहता तो कोणत्या गुणांचा आहे ते पाहीले त्यामुळे शुद्र समजल्या गेलेल्या समाजातील पराक्रमी व्यक्तींना लष्करात व आरमारत अधिकाराच्या जागा मिळाल्या"[८८]

या काळामध्ये ग्रामीण वस्त्या अस्तित्वात होत्या. त्या प्रशासकीयदृष्ट्या स्वायत्त आणि आर्थिकदृष्ट्या स्वयंपूर्ण होत्या. गावकऱ्यांची एकजूट आणि संघटीतपणे गावाचे

प्रशासन पाहण्याची त्यांची पद्धत प्रशंसनीय होती. त्या समाजाचे घटक म्हणजेच गावकरी हे विविध सामाजिक गटांमधील आणि विविध स्तरांमधील लोक होते. ते सर्वजण गावातील प्रशासन एकत्रपणे आणि सुसंबद्धपणे पाहत असत. प्रत्येक गाव हे एकमेकांपासून दूर-दूर अंतरावर वसलेले असे. त्यामुळे गावकऱ्यांत संघटीतपणाची व गावांतील सर्वजण एक असल्याची भावना साहजिकच दृढ होत असे.

छ. संभाजी महाराजाच्या कालखंडामध्ये सुद्धा त्यांनी राज्यकारभार तसेच प्रत्येक गोष्ट छ. शिवाजी महाराजांप्रमाणेच पुढे सुरु ठेवली. समाजामध्ये हस्तक्षेप केला नाही. त्यांनी प्रत्येकांना समान वागणूक, समान न्याय दिला. या बाबत सदरेदसाई म्हणतात, ''राज्यकारभाराचे व न्याय निवाड्याचे संभाजीचे कित्येक कागद उपलब्ध आहेत. त्यावरुन निष्पक्षपाती न्यायदेण्याची त्यांची आवड व प्रजाहिताची कळकळ व्यक्त होते. 'साहेबी आपणास बोलावून आणून वाजपूस करुन, कवि कलश व सरकारहून सदरेस बसोन मनसुफी केली.'[८९] असे उल्लेख खूप आहेत. वडिलाच्या वेळची इनामे व उत्पन्न त्यांनी बहुधा अविच्छन्न चालू ठेवली.

ताराबाई सुद्धा दैनंदिन राज्यकारभारावर किती बारकाईने नजर ठेवीत असे, याविषयी अनेक पत्रे प्रसिद्ध झालेली आहेत. त्यावरुन समाजातील मठाधिपती, वतनदार यासारख्या प्रतिष्ठित मंडळीपासून ते बेलदारांसारख्या सामान्यातील सामान्य माणसावरील अन्यायाची दाद त्यांच्या राजवटीत लागू होती. ही गोष्ट विशेष नमूद करुन ठेवण्यासारखी आहे.

या कालखंडात समाजात वतनाला व्यापक अर्थ होता. जे लोक गावातील कायमचे रहिवासी होते, त्यांना सारामुक्त जमीन होती. ज्यांना सरकारी व गावातील कामे करावी लागत होती, ज्यांना आपल्या जातीनुसारच व्यवसाय करता येत होते व जातीनुरुप हक्क व मानपान आणि सामाजिक दर्जा प्राप्त होत होता अशा व्यवस्थेला वतनदारी म्हणत असत.[९०] मराठी कालखंडामध्ये प्रत्येक व्यक्तीला आपल्या जातीनुसार काम करावे लागत असे त्यांना त्यांच्या जातीच्या बाहेरचे काम करता येत नव्हते त्यावर बंधने होते.

या कालखंडामध्ये समाजात अनेक जाती अस्तित्वात होत्या. त्यांना त्यांच्या नियमानुसारच वागावे लागत होते. जातीच्या बाहेर त्यांना विवाह करण्याचा अधिकार

नव्हता. या काळात गावाला प्रमुख स्थान होते. गावाचा प्रमुख पाटील असे. गाव पातळीवर अनेक सामाजिक कार्य पार पाडले जात होते. समाजामध्ये ग्राम देवता अस्तित्वात होत्या. छ. शिवाजी महाराज, छ. संभाजी महाराज, छ. राजाराम महाराज व महाराणी ताराबाई यांनी समाजाला मान्य असेच कार्य केले आहे. विशेष म्हणजे या कालखंडामध्ये सतीची प्रथा अस्तित्त्वात होती. एकंदरीत या कालखंडातील समाज हा वेगवेगळ्या बंधनात अडकला होता.

## १.४ आर्थिक परिस्थिती:-

या कालखंडामध्ये मनुष्याचे महत्त्वाचे साधन म्हणजे शेती होते. जास्तीत जास्त लोकांचे जीवन हे शेतीवरच अवलंबून होते. उत्पन्नाचे साधन म्हणजेच शेती होती. शेतीचे उत्पन्न जास्तीत जास्त मिळण्याकरिता छ. शिवाजी महाराजांनी जो मुलूख स्वराज्यात आणला, त्यातील शेतजमिनीची पाहणी व मोजमाप नव्याने करण्याची कामगिरी अण्णाजी दत्तो या मंत्र्यावर सोपविली. शेतकऱ्याकडून शेतसारा धान्याच्या रुपाने वसूल करीत असत. एकूण उत्पन्नाच्या ३३% शेतसारा द्यावा लागे. त्याशिवाय स्वराज्याच्या उत्पन्नाच्या आणखी काही बाबी होत्या कर, जकात, अबकारी उत्पन्न, गुन्हेगारी, अपराध्यांना दंड, जंगलातील मालाचे उत्पन्न ह्या उत्पन्नाच्या मुख्य बाबी होत्या.[११] म्हणजे छ. शिवाजी महाराजाच्या अगोदर ज्या बहामनी सत्ता होत्या. त्याचा हेतू फक्त राज्य चालवायचे हा होता. गावे वसाहतीस आणणे किंवा शेतीस वगैरे उत्तेजन देणे हा हेतू नव्हता असे दिसते.

तत्कालीन कागदपत्रावरुन शेतकऱ्यांचा उल्लेख कुणबी, मुजारी, रय व रयत असा केलेला आढळतो. स्वराज्यामध्ये ज्या ज्या जागी झाडी असेल ती झाडी तोडून खत माती घालून पेरणी योग्य करण्यास त्यास उत्तेजन दिले. नदीच्या पाण्यामुळे अदृश्य स्वरुपात आणण्यासाठी पाण्याला बांध बंदिस्ती घालून त्या जमिनीला अनेक वर्षे मेहनत मशागत करण्यास सवलती दिल्या. खेडूतांनी गाव बसवावे याकरिता त्यांना गुरेढोरे, बैल पुरविले, इत्यादी अनेक कामे मराठा कालखंडातील छत्रपतीने केले.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या ताब्यात जो मुलूख आला त्यातील गावे वसाहतीस आणून त्यात शेतीची व्यवस्था करणे हे मुख्य काम होते. ह्या कामाची मुख्य अंगे तीन

१) नापिकी जमीन पिकाऊ करणे, २) पिकांचे व गावकरी आणि शेतकरी ह्यांचे रक्षण करणे व ३) राज्यांतील सर्व जमिनीचे मोजमाप करुन सारा आकारणी करणे. या तिन्ही गोष्टीस त्यावेळी लावणी, संचयी व उगवणी आणि थकबंदी, टकबंदी आणि जमाबंदी ही नावे होती. सामान्यत: प्रत्येक वर्षी जमीन झाडा दस्त दरवर्षी ठरत असे. त्यानुसार महसूल ठरविला जात होता. या मराठेशाहीतील जमीन महसूल पद्धतीवर प्रसिद्ध मेजर जेर्विस म्हणतो, ''शिवाजीने जशी जमीन महसूल उत्पन्नाच्या बटाईच्या ५० टक्के ठरविली. तरी प्रत्यक्षात त्याने तेवढा महसूल वसूल केला नाही. प्रत्यक्ष ताब्यात असलेल्या किंवा मालकीच्या जमिनी बिघ्याप्रमाणे कमी मोजल्या जात आणि जमीन महसुलाची आकारणी बेताने केली जाई. वसुली पैशात न करता वस्तुंच्या स्वरुपात करावी असे शिवाजीचे आदेश होते.''[१२]

गावात लोकोपयोगी कामे करुन लोकांच्या गरजा भागविणारे सेवा उपलब्ध करणारे अनेक गावकरी असत. त्यांना बलुतेदार म्हणत असत. त्यांच्या सेवांबद्दल त्यांना अन्नधान्याच्या स्वरुपात वार्षिक मोबदला दिला जात असे. ज्या योगे त्यांच्याशी जीवनावश्यक गरजा भागविल्या जात. या मोबदल्यास ''बलूते'' असे म्हणतात.[१३] गावात अनेक प्रकारचे कारागीर असत. त्यांच्याकडून दैनंदिन वस्तु बनवून घेतले जात उदा. शेतीची अवजारे, घरकामाच्या वस्तू इत्यादी. मराठे कालखंडामध्ये उच्च प्रतीचे कारागीर होते. त्यांचा व्यवसाय हा भरभराटीला आला होता. त्याचे काम हे कापड बनविणे, शेले पागोटे व अलंकार अशा अनेक प्रकारचे वेगवेगळे कारागीर होते. याच काळात कोकण प्रदेशात मीठ, जहाज बांधणी, सुकी मासळी, आंबे, काजूच्या बिया, सागवानी लाकूड, नारळ व काथ्याचे दोरखंड वगैरे धंदे करणारे लोक आढळतात.

शिवकाळात महाराष्ट्रातील अंतर्गत व्यापार पूर्णत: स्थिरस्थावर अवस्थेत होता. शिवाजी महाराजांच्या काळापासून अस्तित्त्वात असलेले उद्योगधंदे व व्यापार कोणताही खंड न पडता पुढेही म्हणजेच पेशवे काळांत चालू होते. मराठे काळात इतर राज्याच्या राज्यांशी व्यापार चालत होता.

छ. शिवाजी महाराज व छ. संभाजी महाराजांच्या कारकीर्दीत इंग्रज व्यापाऱ्यांशी तह होऊन इंग्रजांनी आयात-निर्यात केलेल्या मालावर जकात आकारली जाई. इंग्रजांच्या

मालावर जकात घेण्याची जी नीती शिवाजी महाराजांपासून चालत आली तीच संभाजी, राजाराम व ताराबाईच्या कारकीर्दीत सुरु होती. याच वेळेस इंग्रज वखारवाले हिंदुस्थानात गुलाम विकत घेऊन त्यांची विक्री करत असत. छ. शिवाजी महाराजांनी प्रत्येक गुलामामागे दोन ते तीन पागोडे कर म्हणून घेण्याची प्रथा पाडली होती. संभाजी महाराजांनी हा गुलामावरील कर २ ते ३ पागोड्यापासून १२ पागोड्यापर्यंत वाढविला त्यामुळे सरकारी उत्पन्नात भर पडून गुलामाच्या व्यापाराला आळा बसला.[१४] ही प्रथा पुढे चालू राहिली. जो गुलामाचा अनिष्ठ असा व्यापार इंग्रजांनी सुरु केला तो बंद करण्याचा प्रयत्न केला.

मराठेकालीन मुख्य-मुख्य गावांत आठवड्यातून एकदा बाजार भरत असे आणि त्यामध्ये कापड, नारळ, लोणी, विड्याची पाने, सुपाऱ्या, फळे भाज्या, मांस आणि इतर अनेक वस्तुंची खरेदी-विक्री होई. या बाजारात धान्याचीही मुबलक विक्री होई. आजू-बाजूच्या गावातील मनुष्य हा त्या गावात जाऊन आपणाला पाहिजे त्या वस्तु खरेदी करत असत.

शिवाजी महाराजांच्या काळी महाराष्ट्रातील व्यापारी केंद्रे भरभराटीस आली होती. त्यापैकी कल्याण, भिवंडी, राजापूर, दाभोळ, वेंगुर्ला व पेन ही एकदम भरभराटीला आलेली उद्योगधंदे असलेली व्यापारीकेंद्रे होती. तसेच परदेशी व आंतरदेशीय व्यापार करणारी उत्तम बंदरे होती.

कानेटकर शिवाजी महाराजाच्या आर्थिक धोरणाबद्दल म्हणतात, ''त्यांनी आपल्या राज्यातल्या प्रजेवर कधीही डोईजड कर लादले नाहीत. जमिनींचा 'कस' पाहून आणि तिचे मोजमाप करून त्यांचा सारा भरण्याची पद्धत अमलात आणली. राज्यभिषेकाचा खर्च त्यांनी वतनदाराकडून वसूल करून घेतला. इतकेच नव्हे तर संपूर्ण खर्च त्यांनी मोगल मुलखातील खजिने आणि व्यापारी लुटून मिळवला. सुरत त्यांनी दोनदा लुटले. पण ही लुट सरकारी खजिने, फिरंगी व्यापारी आणि मोगल व्यापारी यांची होती. बादशहाने काशीचे विश्वनाथ मंदिर फोडावे आणि हिंदूवर जिजिया कर लादला. त्यांची प्रतिक्रिया म्हणून सूरतेची ही लुट होती.''[१५] शिवाजी महाराज शेतकऱ्यांना दुष्काळ, पूर,

जिवनोपयोगी वस्तुंचा तुटवडा इत्यादी नैसर्गीक आपत्तीमध्ये आणि सैन्याच्या हालचाली मुळे झालेले नुकसान लक्षात घेऊन भरपाई देऊन साहाय्य करीत असत.

इ.स. १६३० ते इ.स.१७०७ या काळात एकंदरीत आर्थिक परिस्थिती ही वेगवेगळ्या घटकांवर अवलंबून होती. सर्वात महत्त्वाचे आर्थिक क्षेत्र हे शेतीवर अवलंबून होते. शेती हेच महत्त्वाचे उत्पादनाचे साधन होते. तसेच वेगवेगळे व्यवसाय, उद्योगधंदे अस्तित्वात होते. अंतर्गत व इतर देशांशी सुद्धा व्यापार चालत होता. त्यासाठी अनेक व्यापारी केंद्रे उदयास आली होती.

## १.५ धार्मिक व सांस्कृतिक परिस्थिती:-

या काळात समाजातील प्रत्येक मनुष्याचा देवावर विश्वास होता. प्रत्येकजन वेगवेगळ्या देवतांना मानित असत. पुढे मुसलमानी अंमलात हिंदुंची बाटवा-बाटवी केली जाई. गाईचा वध करणे, ब्राह्मणांची विटंबना करणे, हिंदू देवतांच्या मूर्ती लहर आल्यास फोडून टाकणे इत्यादी प्रकार कुठे न कुठे चालू असे.

समाजातील हिंदू व मुस्लिम यांच्यातील साधुसंतांची आराधना आणि सन्मान सर्व समाज करीत असत. त्यांना अलौकिक शक्ती असल्याने त्यांचा आदर करण्यात येत असे. ते चारित्र्याचे प्रतीक असे. ईश्वराने त्यांना काही खास शक्ती बहाल केल्या आहेत, असा विश्वास आहे. संतांना गुरु मानीत आणि हिंदू व मुस्लिम संतांच्या वारसांना मान दिला जाई व मंदिरे, मशीद, मठ किंवा समाधी यांच्या धारणेसाठी त्यांना धर्मदाय निधी देत.

औरंगजेबाच्या कारकीर्दीत हिंदूंच्या वाट्याला जे जीवन आलेले होते ते जीवन म्हणजे अज्ञान-अंधकाराचे, ज्यात हिंदूना धर्माचे आत्मिक समाधान मिळणार नाही असे. ज्यात सामाजिक देवाण घेवाण, संघटना आणि उत्सव यांची संधी नाकारण्यात आलेली होती. संपत्तीचा संग्रह करण्याची ज्यात हिंदूंना मुभा नव्हती. अशा प्रकारचे जीवन नव्हते. थोडक्यात, जीवन समृद्ध करण्याकरिता ज्या ज्या नैसर्गिक गोष्टी आवश्यक असतात आणि जीवनात ज्यामुळे सर्वांनाच सहजपणे आत्मविश्वास प्राप्त होते त्या सर्व गोष्टी औरंगजेबाने हिंदूंना सहजपणे नाकरलेल्या होत्या.[१६]

वारकरी पंथ किंवा वारकरी संप्रदाय हा महाराष्ट्रात या कालखंडामध्ये मोठ्या प्रमाणात अस्तित्वात होता. वारकरी संप्रदायानुसार पंढरपूरच्या विठोबारायाची केवळ भक्ती हे तत्त्व सर्वमान्य होते. दरवर्षी पंढरपूरला वारकरी लोक जत्रांना जातात. प्रत्येक एकादशीला उपवास, विठोबाची पुजा, वर्षातून एकदा पंढरपूरच्या विठोबाचे दर्शन लोक करतात. या वार्षिक यात्रेला वारी म्हणतात. म्हणून वारकरी याचा अर्थ वारंवार पंढरपूरला जातो तो. महाराष्ट्रातील माणसांच्या मनांत एकत्वाची भावना जोपासण्यासाठी ह्या इष्टदेवता म्हणून करण्यात येणाऱ्या विठ्ठलभक्तीने महत्त्वाची भूमिका बजावली आहे.

छ.शिवाजी महाराजांना हिंदूचे धार्मिक नेते, हिंदूचा राजा या दृष्टीने पाहणारा एक विचार प्रवाह आहे. शिवाजी महाराजांचे खाजगी जीवन धार्मिक होते. हिंदू धर्मावर त्यांची निष्ठा होती, धर्म ही त्यांच्यासाठी सर्वांच्या कल्याणाची जबाबदारी घेणारी नैतिक, उदात्त व पवित्र संकल्पना होती. शिवाजी महाराजांनी मुसलमानांना औदार्याने वागविले. बहुसंख्याकांचा मानभंग करुन त्यांचे हक्क त्याने हिरावले नाहीत. न्याय, औदार्य महाराजांच्या भूमिकेत होते, डोक्यावर चढवून घेण्याची त्यांची भूमिका नव्हती. शिवाजी महाराजांवर लहानपणी धार्मिक संस्कार झाल्याने सर्व धर्मातील हिंदू-मुसलमान साधुसंताबद्दल सारखेच प्रेम वाटत असे. यावरुन त्यांचा धर्मविषयक दृष्टिकोन किती उदार होता हीच गोष्ट दिसून येते. महाराजांनी आपल्या लष्करात सिद्दी हिलालखान याची जेष्ठ सरदार म्हणून निवड केली. १०० घोडदळाचा सरदार म्हणून जहागिरीच्या रक्षणाची जबाबदारी त्यांच्याकडे सोपविली.[१७] यावरुन त्यांच्या दृष्टिकोनाची कल्पना येते. हिंदू-मुसलमानाचा प्रश्न सोडविण्याचा आणखी एक मार्ग म्हणजे दोघांचीही संकुचित दृष्टी, पतित परावर्तन हा मार्गही शिवाजीने अवलंबिला. बजाजी निंबाळकर व नेताजी पालकर हे सुंता झालेले व मुसलमान म्हणून दहापाच वर्षे राहिलेले मराठे त्यांना आईच्या संमतीने परत हिंदू धर्मामध्ये आणले.

राज्यांतील देवदेवतांविषयी आणि साधू पुरुषांच्या मठादी स्थानांविषयी छ. घराण्याला नेहमीच भक्ती व श्रद्धा वाटत आली होती. छत्रपती शिवाजी महाराज, छ. संभाजी महाराज व छ. राजाराम महाराज यांनी देवदेवतांना व मठांना इनामे व अभयपत्रे दिली होती. ताराबाईंनीही राज्याचे हे पुर्वापार धोरण चालू ठेवले होते. धार्मिक

स्थानांना इनामे देणे, जुनी इनामे निर्वेध चालू ठेवण्याविषयी अधिकाऱ्यांना ताकीदपत्रे पाठविणे, मंदिराचा जीर्णोद्धार करणे इत्यादी धार्मिक बाबी ताराबाईच्या कारभारविषयक कागदपत्रांतून स्पष्ट दिसून येतात.

तुळजापूरची भवानी देवी ही छत्रपती शिवाजी महाराजांची अराध्यदेवता होती. महाराजांची व त्यांच्यानंतर दोन्ही पुत्रांची तिच्यावर भक्ती होती. ताराबाईंनीही भक्तीची व श्रद्धेची परंपरा पुढे चालू ठेवली. त्यांनी देवीसाठी मौजे आलनापूर हा गाव इनाम दिला. ता. ८ ऑक्टोबर १७०० रोजी प्रांत पराडेच्या देशाधिकाऱ्यास लिहिलेल्या पत्रात त्या म्हणतात, ''श्री तुकाई तुळजापूर हे मूळपीठ बहुत जागृत स्वामीचे कुलदैवत येथील पुजा उत्साह ताम्राचे धामधुर्माकरिता चालत नाही. म्हणोन श्रीचे पुजकांनी येऊन विदीत केले. त्यावरुन मनास आणिता हे राज्य श्रीच्या पदाचे तेथील पुजा उत्साह यथासांग चालिला पाहिजे. या करिता स्वामींनी श्रीच्या पूजा उत्साहनिर्मित्ये मौजे आलनापूर ...हा गाव कुळबाब कुळकानू देखील हल्लीपट्टी व पेस्तरपट्टी ...खेरीज हक्कदार व इनामदार करुन दिला आहे. तर मौजे मजकूर श्रीचे स्वाधीन करुन तेथील उत्पन्न श्रीस प्रविष्ठ करुन इनाम सुरक्षित चालवणे. साल दरसाल तापे सनदेचा उपूर न करणे.''[१८] यावरुन समजते की देव-धर्मासाठी प्रत्येक राजाने तसेच ताराबाईने देवासाठी ईनामे, दिले.

सततच्या युद्धजन्य वातावरणातही पोवाडे गाणारे, कीर्तनकार, गोंधळी, तमासगीर जनतेची करमणूक करीत. पोवाडे हे शूरवीरांचे गुणगान करीत. लावण्या सामाजिक चालीरीतीचे दर्शन घडवीत. पोवाडे गाणाऱ्यास लोकाश्रय लाभला होता. शिवकालीन प्रसंगावर दत्ताजी जाधव, अफझलखानाचा वध, तानाजीची मर्दुमकी, बाजी पासलकर यांच्या प्रसंगाचे पोवाडे उपलब्ध आहेत. शिवाजी महाराजांच्या शौर्याचा उल्लेख करुन तुळशीदास म्हणतो, ''शूर मर्दाचा पोवाडा शूर मर्दाने ऐकावा शिवरायाच्या राज्यात ऐसा उमराव होणे नाही.''[१९] यावरुन प्रत्यक्ष महाराज गुणीजनांचे योग्य ते मूल्यमापन करुन त्यांचा गौरव करीत असे दिसून येते.

शिवाजी महाराजाने हिंदूच्या प्राचीन संस्कृतीचे रक्षण करणे आणि हिंदूच्या स्वतंत्र राष्ट्राचे पुनरुत्थान करणे हे त्यांचे ध्येय होते. तेच धोरण पुढील राजांनी अवलंबिले व आपल्या संस्कृतीचे रक्षण केले.

## १.६ संशोधनाची आवश्यकता:-

मानवाला इतर प्राणीमात्रांच्या तुलनेत जास्त बुद्धी, दृष्टी, निर्मात्याने दिली आहे. या बुद्धीच्या कसोटीवर मानव आपल्या जीवनात नवनवे बदल घडवून आणण्याचा प्रयत्न करतो. 'ज्ञानासाठी शोध' या अर्थानेच संशोधन हा शब्द सर्व सामान्य व्यवहाराकरिता प्रचलित आहे. वेबस्टरच्या मते, "संशोधन ही अत्यंत काळजीपर्वूक आणि टिकात्मक स्वरुपाची चौकशी असून त्याद्वारे तथ्ये आणि तत्त्वे शोधून काढली जातात. काही तरी निश्चित ज्ञान प्राप्त करण्यासाठी यात जाणीवपूर्वक तपास केला जातो."[१००]

संशोधनाचा मूळ उद्देश जुन्या संकल्पना, जुनी संस्कृती, जूने विचार व तत्कालीन परिस्थिती यांचा अभ्यास करुन त्यावर पुनर्विचार करुन त्यांच्या योग्य-अयोग्यतेचा परामर्श घेणे. त्यामध्ये होऊन गेलेल्या थोर व्यक्तिंच्या कार्य कर्तृत्वाचा आढावा घेऊन त्यांची प्रेरणा भावी पिढीला घेता यावी. या थोर व्यक्तिंनी केलेले कार्य हे आदर्श म्हणून समाजासमोर यावे. थोरांच्या चरित्रापासून मिळणारी शिकवण आणि प्रेरणा ही बहुमोल असते; त्यामुळे इतिहास संशोधनास अत्यंत महत्त्व आहे.

मराठ्यांच्या इतिहास लिखानाच्या पद्धतीत राजकीय घडामोडीवर अधिक भर दिलेला दिसतो. बाकीच्या इतर बाजू म्हणजे विशेषत: सामाजिक, आर्थिक, धार्मिक याबद्दल जास्त लिखाण केलेले आढळत नाही. त्याच काळात छ. शाहू महाराजांच्या कार्याचा उल्लेख क्वचितच आढळतो. त्यांच्यावर जे लिखाण झाले ते त्रोटक स्वरूपात आहे. छत्रपती शाहू यांच्या राष्ट्रकार्याकडे इतिहासकारांचे काही प्रमाणात दुर्लक्ष झालेले दिसते.

छ. संभाजी महाराज व महाराणी येसूबाई यांच्या पोटी जन्माला आलेले भोसले घराण्यातील छ. शाहू लहानपणापासून नियतीचे बळी ठरले. ते लहान असतानाच त्यांचे वडील छ. संभाजी महाराजांचा वध झाला. नंतर त्यांचा व मातोश्री येसूबाई यांना कैद झाली. त्यांचे तारुण्यापर्यंतचे आयुष्य औरंगजेबासारख्या कडव्या बादशहाच्या कैदेत गेले. कैदेतून सुटका झाल्यानंतर त्यांना स्वकीयांकडून विरोध झाला. अशा अनेक अडचणींवर मात करून शाहू महाराजांनी छत्रपतीपद मिळविले व पुढे स्वराज्याचे साम्राज्यात रुपांतर करणाऱ्या त्यांच्या काळातील अनेक राजकीय घटनांचे साक्षीदार व आपल्या कर्तृत्वाने

वेगळा ठसा उमटविणारे पुण्यश्लोक शाहू महाराज यांच्या आयुष्याचा ओझरता आढावा घेण्याचा हा लहानसा प्रयत्न केला आहे.

आतापर्यंतच्या इतिहासामध्ये संशोधकाने छत्रपती शाहू यांना दुय्यम प्रकारची भूमिका दिली. त्यांना छत्रपती शिवाजी महाराज, संभाजी महाराज, राजाराम महाराज, ताराबाई तसेच पेशवे यांच्या छायेतच ठेवले. छ. शाहू महाराज हे महत्त्वाकांक्षी व मुत्सद्दी होते. उत्तम राज्यचालक होते पण त्यांनी त्यास विकृत स्वरुप आपल्या आयुष्यात कधीही येऊ दिले नाही.

यावरुन आतापर्यंतच्या इतिहासात त्यांना जे दुय्यम स्थान देण्यात आले. तरी त्यांची प्रतिमा झळाळून उठल्याशिवाय राहत नाही. आज त्या परिस्थितीचा विचार केल्यास इतर संशोधक / इतिहासकार यांनी अपुरे ठेवलेले कार्य पूर्ण करावे आणि छ. शाहू महाराज यांचे आजवर लपलेले कर्तृत्व उजेडात आणावे अगत्याचे वाटले म्हणून या संशोधनाची आवश्यकता वाटली.

### १.७ संशोधन पद्धती:-

आतापर्यंत झालेल्या संशोधनातून व मांडणीतून शाहू महाराजांच्या व्यक्तीमत्त्वाचे काही पैलू प्रकाशात आले आहेत. मराठा कालखंडातील ही प्रभावी परंतु उपेक्षित राहिलेले छ. शाहू महाराजांचे कार्य आहे. त्यामुळे आजपर्यंत छ. शाहू महाराज स्वतंत्र संशोधनाचा विषय झालेले नाही. परंतु अनेक कागदपत्रे चाळत असताना मराठ्यांच्या इतिहासातील छ. शाहू महाराजांचे स्थान जर या संशोधनाने निश्चित करण्यात आले तर ते संपूर्ण महाराष्ट्राला उपयुक्त ठरेल. छ. शाहू महाराजांच्या आयुष्यातील प्रत्येक घटनांमधून जर इतिहास समोर आणता आला तर हे संशोधन केल्याचे समाधान मिळेल.

शाहू महाराजांच्या कालखंडाचा अभ्यास करताना जी साधने आपण वापरणार आहोत त्याचे गट आपणास खालील प्रमाणे करावे लागतील.

१) समकालीन अस्सल कागदपत्रे

२) उत्तरकालीन कागदपत्रे

३) बखरी, कैफियती, शकावल्या इ.

४) मोगल पत्रे व इतिहास ग्रंथ

५) पोर्तुगीज, डच व इंग्लिश कागदपत्रे

६) इमारती व वास्तु, समाधीस्थाने

या साधनांची चिकित्सा करताना-

१) समकालीन अस्सल कागदपत्रे व त्यांना जुळणारी इतर साधने यांना प्राथमिकता देणे.

२) बखरी व संस्कृत काव्यांचा कस तपासून पाहणे.

३) बखरीच्या बाबतीत शाहू महाराजांचे विधाने तपासून घेणे.

४) शाहू महाराजांबद्दलच्या गैरसमजाचा अभ्यास करणे.

यावरुन सिद्ध होणारे चरित्र संगतवार मांडणे. शाहू महाराजांचे विरोधक, मोगल, डच, इंग्रज यांची कागदपत्रे ही मराठी राज्याबद्दल कोणता दृष्टिकोन ठेवतात याची पाहणी करणे आवश्यक आहे.

### १.७.१ प्रकाशित सामुग्रीचा आढावाः-

शाहू महाराजांच्या विषयी रियासतकार सरदेसाई गो.स., जदुनाथ सरकार, प्रा. खरे ग. ह., दिघे दि. गो., ग्रॅट डफ, डॉ. शिवदे, हेरबाडकर, रानडे म. गो., कडके रा. त. यांनी ग्रंथ प्रकाशित केलेले आहे त्यांचा आढावा घेण्यात आलेला आहे.

### १.७.२ कागदपत्रांचे विश्लेषणः-

मराठ्यांच्या इतिहासाबाबत राजवाडे वि. का., खरे य. वा., ओतूरकर रा. वि., सरदेसाई गो. स., पारसनिस द. व. यांनी जी कागदपत्रे संकलित व प्रकाशित केली आहेत. त्यांचे विश्लेषण करण्यात आले आहे. मोगल, राजपूत, जाट व इंग्रज यांच्या कागदपत्राच्या आधारे शाहू महाराजांच्या कामगिरीवर प्रकाश टाकण्यात आलेला आहे.

### १.७.३ वाङ्मयीन साधनेः-

शाहू महाराजांच्या समकालीन लोकांच्या केलेल्या इतिहासकारांच्या रचना त्या आधारे त्यांच्या कलात्मक व सांस्कृतिक दृष्टीवर प्रकाश टाकण्यात आलेला आहे.

### १.७.४ ऐतिहासिक संशोधन पद्धतीः-

हा अभ्यास करताना ऐतिहासिक संशोधन पद्धतीचा उपयोग करण्यात आला आहे. ऐतिहासिक दस्ताऐवज, पत्रव्यवहार आणि कागदपत्रांचे अंतर्गत व बाह्य परीक्षण करुन त्यांची शास्त्रीय पडताळणी करण्यात आली. जेथे वाद विषय असतील तेथे विविध

इतिहासकारांच्या मतांमध्ये समन्वय साधण्यावर अधिक भर देण्यात आला. कागदपत्रातून प्रकट होणारे संदर्भ लक्षात घेऊन नवा प्रकाश टाकण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे.

### १.७.५ वर्णनात्मक आराखडा:-

ऐतिहासिक अभ्यासात व्यक्तीच्या कामगिरीचे मूल्यमापन करताना वर्णनात्मक आराखडा अत्यंत महत्त्वाचा ठरतो. कारण घटना व प्रसंगाची मांडणी करताना कागदपत्रातून व्यक्त होणारी मते हुबेहूब मांडावी लागतात व ती काळजीपूर्वक अभ्यासावी लागतात. त्यांच्या बाबतीत नव्याने प्रकाश टाकण्यात आला आहे.

- **प्राथमिक साधने:-**

१) छत्रपती शाहूने खंडेरावास लिहिलेले आज्ञा पत्र (ता. १४ ऑक्टो. १७२८)-

"श्री राजा शाहू छत्रपतींनी सेनापती राजश्री खंडेराव यास आज्ञा केली, राजेश्री देवजी सोमवंशी हिंदूराव हे स्वामीचे सेवक आहेत. त्यांचे कार्य तुम्हासही माहीत आहे. ऐशास रनुलेकडे संरजाम स्वामींनी करार करु दिल्याप्रमाणे कारभार चालवत आहे. तरी तुम्ही त्यांच्या कारभारात हस्तक्षेप करु नये. त्यांची सेवा ही महत्वपूर्ण आहे."[१०१]

चांगल्या लोकांच्या कारभारात छत्रपती शाहू हे हस्तक्षेप करत नसत असे वरील पत्राच्या मथळ्यावरून दिसून येते.

२) गोविंद गोपाळ दगोजी यंगोजी यांना शाहूने लिहिलेले पत्र :-

या पत्रात वडू बुद्रुक येथे संभाजीचा मृतदेह टाकण्यात आला होता. या ठिकाणी येसूबाईने नजर कैदेत असतांना वृंदावन बांधण्याची आज्ञा केली होती. त्या वृंदावनाची पूजा अर्चा नित्य चालू राहण्यासंबंधी या पत्रात लिहिलेले आहे.[१०२]

३) छत्रपती शाहूंचे मोकासा बदल करण्याविषयीचे पत्र (ता. १५ डिसें. १७१६)-

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम संवत्सरे पौष्य शुद्ध द्वादसी भृगुवासरी क्षेत्रीय कुलांवतस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी देशमुख व देशपाडिये त।। पेडगांव प्रांत कडेवलीत यासी आज्ञा केली औसीजे त।। माा पैकी देहाये पैशजीच्या मुकासिया कडून दूर करुन हाली राजश्री सेखोजी थोरात दिनकरराव याजकडे जमावास मुकासे दिल्हे आसेत.[१०३]

ही सर्व पत्रे शाहू महाराजांच्या इतिहासासंबंधी प्राथमिक साधने म्हणून आपणास उपयोगी पडतात. या पत्रावरुन त्यांचे व्यक्तिमत्त्व त्यांची येसूबाईनी सोडवून आणण्याचे केलेले प्रयत्न तसेच सामाजिक व राजकीय कार्य दिसून येते.

- **दुय्यम साधनेः-**

मध्ययुगाच्या इतिहासाचा मागोवा घेताना बखरींचा आधार घेणे हे आवश्यक ठरते. दुय्यम साधनात बखरींना महत्त्व प्राप्त झाले आहे. कारण या काळातील इतिहास हा सविस्तर रीतीने लिहून काढलेला दिसत नाही. त्यामुळे बखरी या बहुतांश ऐकीव पुराव्यावर लिहिला गेलेला आहे. त्यात अस्सलपणा बरोबरच थोड्याफार प्रमाणात ऐकीव गप्पा, दंतकथा किंवा भावनीकता आलेली आहे. मात्र यातील काही घटना या इतिहास समजून घेण्याच्यादृष्टीने आवश्यक ठरतात.

- **बखरीः-**

बखरी मधून मराठ्यांच्या राजकारणाचे वेधक दर्शन आपणास घडते. गनिमी काव्यासारख्या युद्धपद्धती, मराठ्यांचे राजकारण, या सर्वांचा ठसा बखरीमध्ये उमटलेला आहे. बखरी या समकालीन व्यक्तींनी लिहिलेल्या असल्यामुळे जास्त विश्वासार्ह आहेत. त्यामुळे दुय्यम साधन म्हणून बखरींचा संदर्भ घेणे आवश्यक आहे.

- **दिग्विजय बखरः-**

या बखरीत काशिपंत व विसाजीपंत यांच्या जवळ मथुरेत संभाजीला ठेवले होते असे वर्णन आहे- त्याचा परिणाम शाहूंच्या कार्यावर पडलेला दिसून येतो. त्या प्रेरणेतूनच शाहूंनी आपले कार्य पार पाडले.[१०४]

- **श्रीमंत महाराज भोसले यांची बखरः-**

'रायरीच बखरीत' मरणापूर्वी शिवाजी महाराजांनी एक अधिकृत आज्ञापत्र प्रधानांसाठी मागे ठेवले होते याचाच उल्लेख शेउगावकर बखरीत केला आहे.[१०५]

- **मराठ्यांची बखरः-ग्रॅड डफ**

यामध्ये येसूबाई व शाहू यांची औरंगजेबाच्या मुलीशी मैत्री होती. औरंगजेब सुद्धा शाहूला प्रेमाने 'साहू' म्हणत असे. इ.स. १६८९ मध्ये रायगड घेतल्यानंतर मोगलांनी येसूबाई व शाहू यांना राजबंदी म्हणून ठेवले होते.[१०६]

- **सभासद बखरः-**

ही बखर इ.स. १६९४-९७ च्या दरम्यान लिहिली गेली. शिवाजी महाराजांच्या राजकारणाचा प्रत्यक्ष अनुभव कृष्णाजी अनंत सभासद यांना असल्यामुळे त्यांनी ही बखर लिहिली. सभासदांनी बखरीत म्हटले आहे की, येसूबाई शिवाय अन्य दुसरी विवाहीत स्त्री संभाजीस नव्हती. इतिहास समजण्यासाठी या बखरीचे महत्त्व आहे.[१०७]

- **फार्सी ग्रंथः-**

'तारीखे खाफीखान' या ग्रंथातील शिवाजी महाराजांसंबंधीचा भाग ग.ह. खरे यांनी प्रसिद्ध केला आहे. सेतू माधवराव पगडी यांनी १६८० ते१७०७ या कालखंडाचा अनुवाद केलेला आहे. खाफीखान म्हणतो शिवाजी महाराज आगऱ्याहून परत आले असताना संभाजीच्या मृत्यूची अफवा उठवण्यात आली होती.[१०८]

पाश्चात्याप्रमाणे आपल्याकडे मराठी माणसात दैनंदिन हकीकती लिहून ठेवण्याची पद्धत नव्हती. शकावल्यात दैनंदिन माहिती लिहून ठेवली आहे. शिवकालीन शकावल्यात 'जेधे शकावली' महत्त्वाची आहे. इ.स. १६१८ ते १६९७ या काळातील महत्त्वाच्या घटनांचा उल्लेख या शकावलीत सापडतात.

**संदर्भ :-**


१) जदुनाथ सरकार (अनुवाद), डॉ. श. गो. कोलारकर, औरंगजेब India under Aurangabad, डायमंड पब्लिकेशन, पुणे २००६ पृ.७.

२) डॉ. कुंटे भ. ग. (भाषांतकार), औरंगजेबाचा इतिहास ("A short history of Aurangeb), महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, १९७८, पृ.९५.

३) कित्ता, पृ.२१५.

४) सरदेसाई गोविंद सखाराम, मुसलमानी रियासत खंड-२, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९३/१९१५, पृ.२६८.

५) Sarkar J., History of Aurangjeb, Vol.-V, M.C. Sarkar & Sons., Culcutta, 1924, P. 197.

६) डॉ. कुंटे भं.ग., औरंगजेबाचा इतिहास, उपरोक्त, पृ.८९.

७) सरदेसाई गो.स., मुसलमानी रियासत, खंड-२, उपरोक्त, पृ. २९७,२९८.

८) प्रा. जयसिंगराव पवार, महाराणी ताराबाई, ताराराणी विद्यापीठ, कोल्हापूर, १९७५, पृ.४६.

९) पगडी सेतूमाधवराव (सपां.), मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (खाफीखानाचा साधन ग्रंथ), जोशी-लोखंडे प्रकाशन, पुणे, १९६२ पृ. ४१.

१०) कानेटकर वसंत, शिवशाहीचा शोध, परचुरे प्रकाशन मंदीर, मुंबई. १९९७, पृ. १९५.

११) Storia do Mogor mogul India, 1653-1704. By Niccolao Manucci. Venation, translated with introduction and notes by wiliam Irvine, London, 1907, IV P. 57.

१२) पगडी सेतु माधवराव (सपां.), मोगल आणि मराठे (तारीखे दिलल्कुशा भिमसेन सक्सेना), ढोकळ प्रकाशन, पुणे, १९६३, पृ. १६०.

१३) चौबळ ज. स., असे होते मोगल, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९७४, पृ. ३३३.

१४) जयसिंगराव पवार, महाराणी ताराबाई, उपरोक्त, पृ. ५०.

१५) राजवाडे वि. का., राधामाधव विलासचंपू, पृ.३७ .

१६) सरदेसाई गो. स., मराठी रियासत खंड-१ शहाजीराजे भोसले, शककर्ता शिवाजी, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८८/१९१०, पृ.३१.

१७) आपटे द. वि. आणि नरसिंह चिंतामन केळकर (संपा.), शिव-चरित्र-निबंधावली, अनुक्रम-२, श्री शिव-चरित्र, कार्यालय पुणे, शके १८५१, पृ.१.

१८) सरदेसाई गो. स., मराठी रियासत खंड -१, उपरोक्त पृ.३४.

१९) बेंद्रे वा.सी., मालोजी राजे आणि शहाजी महाराज, मुंबई, १९६७, पृ.१०६.

२०) वाकसकर वि.स. (संपा), श्रीशिवछत्रपतीची ९१कलमी बखर, श्रीलक्ष्मी नारायण प्रेस, मुंबई, १९३०.

२१) बाहेकर संतोष ए., सिंदखेडकर जाधव घराण्याचा चिकित्सक इतिहास, कसब प्रकाशन, जळगांव, २००१ पृ. ९३.

२२) वाकसकर वि.स. (संपा), श्रीशिवछत्रपतीची ९१कलमी बखर आणि भोसले घराण्याचे चरितावली, व्हीनस प्रकाशन, पुणे,१९६२, पृ. ३.

२३) सरदेसाई गो. स., मराठी रियासत खंड-१, उपरोक्त पृ. ३६.

२४) देशपांडे सुधाकर, मराठ्यांचा इतिहास (उदय-उत्कर्ष-अस्त), शारदा प्रकाशन नांदेड, १९७५, पृ.१२.

२५) डॉ. खोबरेकर वि. गो., महाराष्ट्राचा इतिहास-मराठा कालखंड (भाग-१), शिवकाळ (१६३०-१७०७), महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, २००६ पृ. १६.

२६) तत्रैव, पृ.१६३.

२७) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-१, उपरोक्त, पृ.११७.

२८) शेजवलकर त्र्यं. श., श्री शिवछत्रपती, संकल्पीत शिवचरित्राची प्रस्तावना, आराखडा व साधने मराठा मंदिर, १९६४, पृ. ४४०-४४१.

२९) आपटे द. वा. (संपा), शिवचरित्रप्रदीप, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १९२५, पृ. १६.

३०) मेहेदंळे गं. भा., श्री राजा शिवछत्रपती, खंड-१, पुणे, १९९६, पृ. ५९१.

३१) फाटक न. र. (अनु.), मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९६४, पृ. ३३.
३२) शिव चरित्र साहित्य, खंड-३ / ६३३.
३३) डॉ. कोलारकर श.गो. (अनु.), औरंगजेब, उपरोक्त, पृ. २०४.
३४) कुलकर्णी अ. रा., ग. ह. खरे (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड-१, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९८४, पृ.१३३.
३५) शिवभारत, अ, पृ. १७/३७.
३६) पटवर्धन व रावलिंनसन, सौर्स बुक ऑफ मराठा हिस्टरी, पृ.३१.
३७) गर्गे स. मा., करवीर रियासत, श्री. छत्रपती शहाजी म्युझियम ट्रस्ट, कोल्हापूर, २००३, पृ.५६.
३८) श्री शिवभारत, अध्याय २७, श्लोक १-१२, पृ.१९४.
३९) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-१, उपरोक्त, पृ.१८३.
४०) कानेटकर वसंत, शिवशाहीचा शोध, उपरोक्त, पृ.९९.
४१) गर्गे स. मा., करवीर रियासत, उपरोक्त, पृ. ९२.
४२) कित्ता, पृ.११०.
४३) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-१, उपरोक्त, पृ. २९४.
४४) कित्ता, पृ. २९७.
४५) कानेटकर वसंत, शिवशाहीचा शोध, उपरोक्त, पृ.१३२-१३३.
४६) सभासद कृ. अ., सभासद बखर, पुणे, १९२३, पृ. १०६.
४७) Kelkar N. C. and Apte D. V. (Ed.), English Records on Shivaji, Vol. II, Shivacharitra Karyalaya, Poona, 1931, P.311
४८) सोमनी स. वि., महाराष्ट्राचे मानकरी, शब्दवेध प्रकाशन, पुणे, १९९५, पृ.२८.
४९) Sarkar J., Shivaji and his Times, M.S. Sarkar and Sons, Culcatta, 1961, p. 388.
५०) नंदुरबारकर पांडूरंग रामचंद्र, दांडेकर कु. रा. (संपा.), शिवदिग्विजय बखर, बडोदा, शके. १८१७.

५१) डॉ. जयसिंगराव पवार, शिवछत्रपती एक मागोवा, सुमेरू प्रकाशन, डोबिंवली (पूर्व), २००५, पृ.११.

५२) शाहू रोजकीर्द, रू. १, पुडके नं. १५, क्र. ६४५. ६४७

५३) गोखले कमल, शिवपुत्र संभाजी, (साधार, विवेचनात्मक चरित्र), ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे, १९७१, पृ.-२८.

५४) डॉ. जयसिंगराव पवार (संपा.), छ. संभाजी महाराज स्मारक ग्रंथ (प्रस्तावना), कोल्हापूर, १९९०, पृ. २९.

५५) डॉ. शिवदे सदाशिव स., महाराज्ञी येसूबाई, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००४, पृ. ३६.

५६) कित्ता, पृ.४१.

५७) कानेटकर वसंत, शिवशाहीचा शोध, उपरोक्त, पृ. १५१.

५८) गोखले कमल, शिवपुत्र संभाजी, उपरोक्त, पृ.८६.

५९) कुलकर्णी अ. रा., मराठ्यांचा इतिहास, खंड-१, उपरोक्त, पृ.३८३.

६०) गर्गे स. मा., करवीर रियासत, उपरोक्त, पृ. १५.

६१) जोशी शं. ना. (संपा.), संभाजीकालीन पत्रसारसंग्रह, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १९४९, पृ. ११९.

६२) बेन्द्रे वा. सी., श्री छ. संभाजी महाराज याचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन, मुंबई, २००१, पृ. ७७८.

६३) कुलकर्णी अ. रा., मराठ्यांचा इतिहास, खंड-१, उपरोक्त, पृ. ४०८.

६४) डॉ. खोबरेकर वि. गो., महाराष्ट्राचा इतिहास, शिवकाल, मराठी खंड-१, उपरोक्त, पृ. ३१४.

६५) देशपांडे सुधाकर, मराठ्यांचा इतिहास (उदय-उत्कर्ष-अस्त), उपरोक्त, पृ. ६६.

६६) जेधे शकावली, शिवचरित्र प्रदिप, पुणे, १९२५, पृ. २४.

६७) सभासद कृ. अ., सभासद बखर, उपरोक्त, पृ. ३१६.

६८) कुलकर्णी अ. रा., मराठ्यांचा इतिहास, खंड-१, उपरोक्त, पृ.४१६.

६९) बेन्द्रे वा. सी., संपादित केशव पंडीतकृत जिंजीचा प्रवास, भारत इतिहास संशोधन मंडळ, स्वीय ग्रंथमाला, पुणे, १९३१, पृ. ३३०.

७०) Sarkar J., History of Aurangjeb, Vol. 5, Sarkar M.C. and Sons, Calcutta, 1928, P. 63.
७१) पगडी सेतुमाधवराव, मराठ्याचे स्वातंत्र्ययुद्ध, उपरोक्त, पृ.१६.
७२) कित्ता, पृ. ४७-४८.
७३) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-२, उग्रप्रकृती संभाजी, स्थिरबुद्धी राजाराम, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९/१९११, पृ. २३७.
७४) कित्ता, पृ. २३९.
७५) देशपांडे सुधाकर, मराठ्यांचा इतिहास (उदय-उत्कर्ष-अस्त), उपरोक्त, पृ.७६.
७६) कुलकर्णी अ. रा., मराठ्यांचा इतिहास, खंड-१, उपरोक्त, पृ.४४०.
७७) प्रा. जयसिंगराव पवार, महाराणी ताराबाई, उपरोक्त, पृ.१४-२०.
७८) अप्पासाहेब पवार (संपा.), ताराबाईन कागदपत्रे, खंड पहिला, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर, १९६९, पृ. १९९.
७९) पगडी सेतू माधवराव, मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (खाफीखानाचा साधन ग्रंथ), पुणे, १९६२, पृ.४९.
८०) फाटक न. र. (अनु.), मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष, उपरोक्त, पृ. १००.
८१) कानेटकर वसंत, शिवशाहीचा शोध, उपरोक्त, पृ. १९६.
८२) डॉ. कोलारकर (अनु.), औरंगजेब, उपरोक्त, पृ. ३७९.
८३) कुलकर्णी अ. रा., मराठ्यांचा इतिहास, खंड-१, उपरोक्त, पृ.४५०.
८४) डॉ. सोमनी म. वि., महाराष्ट्राचे मानकरी, उपरोक्त, पृ.५१.
८५) राजवाडे लेखसंग्रह, भाग -२१, ले.-२१५.
८६) कित्ता, ले.-२१५.
८७) शिवचरित्र साहित्य, खंड-९, पृ. ८६-८८.
८८) जयसिंगराव पवार, छ. शिवाजी महाराज, अरूधती प्रकाशन, कोल्हापूर, पृ.२६६.
८९) सरदेसाई गा. स., मराठी रियासत, खंड-२, उपरोक्त, पृ.११७.
९०) रोडे सोमनाथ (संपा.), मराठवाडा इतिहास परिषद, औरंगाबाद, निवडक शोधनिबंध, खंड-चौथा, १९९९, पृ.१३.

९१) डॉ. खोबरेकर वि. गो., महाराष्ट्राचा इतिहास मराठा कालखंड (भाग-१), उपरोक्त, पृ. ५७६.

९२) सभासद कृ. अ., सभासद बखर, उपरोक्त, पृ. २९.

९३) बावडा दप्तर १:९ भ. इ. सा., खंड-१६, पृ. २२.

९४) गोखले कमल, शिवपुत्र संभाजी, उपरोक्त, पृ. ३७७.

९५) कानेटकर वसंत, शिवशाहीचा शोध, उपरोक्त, पृ.२४१-२४२.

९६) डॉ. कोलारकर श. गो. (अनु.), औरंगजेब, उपरोक्त, पृ.५०१.

९७) रोडे सोमनाथ, निवडक निबंध, मराठवाडा इतिहास परिषद (खंड-पाचवा), डिसेंबर-२०००, पृ.७५.

९८) पारसनीस द. ब., व पु. वि. मावजी (संपा.), सनदा पत्रातील महिती, पुणे, १९१३, पृ.१८३.

९९) डॉ. खोबरेकर वि. गो., महाराष्ट्राचा इतिहास, मराठा कालखंड (भाग-१), उपरोक्त, पृ. ६६४-६६५.

१००) घाटोळे रा. ना., समाजशास्त्रीय संशोधन, तत्त्वे व पद्धती, श्री. मंगेश प्रकाशन, नागपूर, २००३.

१०१) Joshi P.M., Expansion of Maratha Power, Government Central Press, Bombay, (1707 -1761), 1957, P. 08

१०२) बेन्द्रे वा.सी., छ. संभाजी महाराज यांचे चरित्र, उपरोक्त, पृ. ६२०.

१०३) थोरात मा. भि. (संपा.), ऐतिहासिक सनदा व पत्रे, इतिहास संशोधन मंडळ, मुंबई, १९७३, पृ. ११.

१०४) दांडेकर ल.का., नंदुरबार पा.रा. (संपा.), शिवदिग्विजय बखर, बडोदा, शके १८१७, पृ. १८.

१०५) भावे वि.ल. (संपा.), रोडगावकर बखर.

१०६) Grand Duff, History of Maratha's Oxford University Press, London, 1921, P. 278.

१०७) साने का. ना. (संपा.), सभासद बख़र, पुणे, १९२३.

१०८) एशियांटीक सोसायटी ऑफ बंगाल (संपा.), तारीखे खाफीखान, १८७४.

प्रकरण दुसरे

# छत्रपती शाहू महाराज यांचे बालपण व त्यांच्या व्यक्तिमत्त्व विकासाचा इतिहास

२.१ छत्रपती शाहू महाराज यांचा जन्म व बालपण

२.२ छत्रपती शाहू महाराज व येसूबाई यांची कैद

२.३ छत्रपती शाहू यांचे बादशहाच्या कैदेतील जीवन कार्याची वाटचाल

२.४ छत्रपती शाहू महाराजांना सोडविण्यासाठी छत्रपती राजारामाने केलेले प्रयत्न व राजारामाचा मृत्यू (इ. स. १७००)

२.५ छत्रपती शाहू यांचे बादशहाच्या छावणीतील संस्कार, धर्मांतराचे प्रयत्न आणि शाहूंची लग्ने

२.५.१ औरंगजेबाचे शाहू महाराजांना धर्मांतरीत करण्याचे प्रयत्न

२.५.२ छत्रपती शाहू महाराजांची लग्ने

२.६ छत्रपती शाहू महाराजांवर पडलेला इतर मुत्सद्यांचा प्रभाव

२.६.१ छत्रपती शिवाजी महाराज

२.६.२ छत्रपती संभाजी महाराज

२.६.३ महाराणी येसूबाई

२.६.४ जोत्याजी केसरकर

२.६.५ रायभानजी भोसले

२.६.६ झीन्नत उन्नीसा (बादशाही बेगम)

२.६.७ झुल्फिकारखान उर्फ एतिकादखान

२.७ औरंगजेबापुढे शाहूचा प्रश्न व औरंगजेबाचा मृत्यू

२.७.१ औरंगजेबाचा मृत्यू (ता. २० फेब्रुवारी १७०७)

२.८ छत्रपती शाहू महाराजांची सुटका

## २.१ छ. शाहू महाराज यांचा जन्म व बालपण:-

शाहू हे संभाजी महाराज व येसूबाई यांचे अपत्य होय. संभाजी महाराजांना अगोदर भवानी नावाची कन्या होती. पुत्र प्राप्ती झाली नव्हती. त्यासाठी त्यांनी शिवयोग्यास उपाय विचारला असता त्यांनी पुत्रकामेष्टी यज्ञ करावयास सांगितला. संभाजी राजांनी पुत्रकामेष्टी यज्ञ केला, त्यांना कालीने दर्शन दिले. कालीने संभाजीराजांना दृष्टांत दिल्याची कल्पना करुन प्रत्यक्ष काली म्हणाली, ''मीच मानव देह धारण करुन तुझ्या पोटी पुत्र जन्मास येणार आहे.[१] या संबंधी काही श्लोक सरदेसाईने परमानंद काव्यम् अनुपुराण यामध्ये मांडले आहेत ते पुढील प्रमाणे-

अलं जपैश्च विविधैर्व्रतैराचरितैरपि
तपोभिर्विप्रचितैर्नियमैरपरैरपि (७३)
दानधर्मदयाभिश्च प्रारब्धैर्विप्रभौजनै:
प्रसन्नड्स्मि महाराज समापय महाव्रतम् (७४)
पुरुषं प्रतिपद्याहं भविष्यामि सुतस्तव
भूभारं संहरिष्यामि पालयिष्यामि भूसुरान् (७५)
रक्षयिष्यामि धेनूनां गणान् यवनहस्तत:
अनाथांस्तारयिष्यामि दु:ख पक्ड:दिवानिशम् (७६)
दुष्टान् समर्दयिष्यामि स्थापयिष्यामि देवता:
धर्म संवर्धयिष्यामि हर्षयिष्यामि सुन्दरी : (७८)
नूतनान् कल्पयिष्यामि कार्यभारधुरन्धरान्
आल्हादयिष्यामि धनैर्ग्राम्यान् कोक्ड:ण जान्नरान् (७९)
महाराष्ट्रोदभवान् मध्यरीत्याविष्णामि भूतले
आनन्दयिष्यामि वधूवृन्दं गोपतिर्यथा (८०)
स्वमतेनाचरिष्यामि राजधर्माननेकश:
स्वैरिणीनां जनपदे प्रदास्यामि महाभयम् (८१)
अपराधं जनकृतं क्षमिष्यामि गतस्मया
बहुकालं धरिष्यामि साम ताम्रदलाधिपै : (८२)

एकच्छत्र करिष्यामि साम्राज्यं जगतीतले
पापर्द्धि सच्चरिष्यामि सर्वकाले विशेषत: (८३)
अत: सुतार्थ राजेन्द्र चिन्तां मा कुरु कर्हिचित्
स्वल्पैरहोभिस्तनयवदनं द्रक्ष्यसि ध्रुवम् (८४)
तत: कतिपयाहोभिर्महाकालो मम प्रिय:
आकारयिष्यति मुदा त्वां स्वकीय स्थलं प्रति (८५)
इत्थं महावरं दत्त्वा वराय शिवसूनवे
अन्तर्हिता समभवन्महाकाली तदा क्षणात्(८६)[२]

वा. सी. बेन्द्रे म्हणतात की, ''छत्रपती संभाजी राजास ता. १६ जानेवारी १६८१ रोजी महाराज्याभिषेक झाला. त्यापूर्वी येसूबाईशीही समंत्रक विवाह पुन्हा करावा लागला. त्याच वेळी 'पुत्रकामेष्टी' ही संभाजी राजांनी केली. नंतर येसूबाईला ता. १५ जानेवारी १६८२ रोजी पुत्र झाला. नाव शिवाजी असे ठेवले. औरंगजेबाने त्यास शाहू म्हणण्यास परिपाठ पाडला.''[३] पण सरदेसाई असे सांगतात की, येसूबाईस दोन मुले झाल्याचा उल्लेख आहे. वडील मुलगी भवानीबाई हिचा जन्म ता. २८-१-१६७९ रोजी शृंगारपूर येथे आणि मुलगा शाहू याचा जन्म ता. १७-५-१६८२ रोजी गंगावली येथे झाल्यामुळे, (प्रवासात युद्धांती नवऱ्याबरोबर असावी असे दिसते.) शृंगारपूर संगमेश्वराजवळ असून ते सुर्व्यांचे गाव आहे. शिर्क्यांचे कुटऱ्यापासून ते जवळच असून बहुधा येसूबाई बाळंतपणासाठी आजोळी गेली असावी. गंगावली हे ठिकाण रायगडाचे आसमंतात माणगांवाजवळ आहे.[४] डॉ. शिवरे म्हणतात, ''येसूबाईंनी स्वराज्याच्या तिसऱ्या वारसास जन्म दिला. शके १६०४ दुंदुभी नाम संवत्सरात वैशाख वद्य ७ गुरुवारी शततारका नक्षत्र चरण ३, रासकुंभ ता. १८ मे १६८२ या दिवशी येसूबाई प्रसूत झाल्या. पुत्र जाहला, शिवाजी राजे नाव ठेवले''[५] हेरवाडकर म्हणतात, शिवाजी महाराज यांनी ''पुन: शिव नामें करुन (राजा) जन्म घेऊन उत्तर दिग्विजय करणें राहिला तो होईल.'' ऐसी समाप्त समयी आज्ञा केली. त्याअन्वये जन्म जाहला. शके १६०२ रौद्रनाम संवत्सरे मार्गशीर्ष शुद्ध १० (शके १६०४ दुदुंभी संवछरे वैशाख वद्य ७ गुरुवारी ता. १८ मे

इ.स. १६८२) संभाजी राजे यासी पुत्र जाहला शिवाजी राजे नाव ठेविले'. जेधे शकावली)[६]

तात्पर्य :- शाहू महाराजांचा जन्म ता. १८ मे १६८२ रोजी रायगडच्या पायथ्याशी गंगावली येथे झाला. असे जास्तीत जास्त इतिहासकारांनी मान्य केले आहे. .

कारण या वेळी स्वराज्यात युद्धाची धामधूम चालू होती. त्यांचे बालपणाचे जे काही शिक्षण झाले ते जोत्याजी केसरकर व माता येसूबाई यांच्या सान्निध्यात झाले.

## २.२ छत्रपती शाहू महाराज व येसूबाई यांची कैदः-

ता. १ फेब्रुवारी १६८९ ला संभाजी राजास कैद केले गेले.[७] संभाजी महाराजाना कैद झालेली बातमी औरंगजेबास कळाली तेव्हा त्याने पुढील उद्‌गार काढले. ''संभाजी महाराज कैद झाल्याने एका मोठ्या अनावर शत्रूपासून ईश्वराने आपली सुटका केल्याचा निश्वास औरंगजेबाने टाकला.'' परंतु मराठा राज्याचा वारस व राजधानी ही आपल्या ताब्यात येईपर्यंत हे महान संकट अंशत: ती कायम राहणार, या संकटाचे समूळ पारिपत्य करावयासाठी औरंगजेबाने इतिकदखानास सैन्यासह रायगड घेण्यास पाठविले.[८]

या वेळी स्वराज्यावर महान संकट आले होते. एक तर संभाजी राजांना पकडले गेले व दुसरे म्हणजे औरंगजेबाने इतिकदखानास रायगड घेण्यास पाठविले होते. यावेळी संभाजीपुत्र शाहू राजे यांचे वय सात वर्षाचे होते. राजाराम महाराजांचे वय एकोणीस वर्षाचे होते. अशावेळी शाहू राजांस छत्रपती म्हणून घोषित करुन राज्याची सर्व सूत्रे आपल्या हाती येसूबाईंना घेता आली असती. पण तसे न करता राज्याचे हित नजरेसमोर ठेवून अत्यंत निस्वार्थीपणे त्यांनी आपणहून पुढाकार घेऊन राजाराम महाराजांच्या हाती राज्याची सुत्रे दिली.[९] तेव्हा रायगडावर राज्यकारभाराची नवी व्यवस्था करण्यात आली. या वेळपर्यंत राजाराम किल्ल्यातील आहबखान्यात नजरकैदेत होते. त्यांना रायगडाचा किल्लेदार चांगोजी कारकर व येसाजी कंक यांनी माघी अमावस्येस (ता. ९ फेब्रुवारी १६८९) बाहेर आणून फाल्गुन शुद्ध तृतीयेस मंचकी बैसविले. त्यावेळेस संभाजी महाराज हयात होते. त्यांचा वध ता. ११ मार्च १६८९ रोजी झाला. मानाजी मोरे व वरकड जे संभाजी महाराजांनी धरिले होते ते सोडिले व त्यांचे कार्यभाग त्यांसी देऊन राजाराम महाराज राज्य करु लागले.[१०]

रायरी (रायगड) जिंकून घेण्यासाठी बादशहाने जुल्फिकार खान बहादुर याची नेमणूक केली. शहाजादा आज्जम यासकडून हवी ती मदत घेऊन किल्ला घ्यावा अशी बादशहाने त्यास आज्ञा केली. खानाने येऊन ता. २५-३-१६८९ रोजी रायगडास वेढा घातला.[११] रायगडच्या पायथ्याशी छावणी लावण्यात आली. किल्ल्याचे संरक्षण निसर्गानेच केले होते. समुद्र सपाटीपासून २५० फूट उंचीवरील हा किल्ला पूर्वेला तोरणा, दक्षिण बाजूस कांगोरा, सोनगड, ईशान्येस गंगाळा, वायव्येस तळेगड, उत्तरेस ओसाळगड अशा चौफेर किल्ल्यांच्या पहाऱ्यात दिमाखाने उभा होता. राजांचा गड आणि गडांचा राजा हा एका भक्कम नैतिक पायावर उभ्या असलेल्या हिंदवी स्वराज्याची राजगादी संभाळत होता.[१२]

एतिकादखानाने (जुल्फिकारखान) रायरीपासून दोन कोसावर आपला तळ दिला. किल्ला अतिशय मजबूत होता. कोकणात याच्या तोडीचा दुसरा किल्ला नव्हता. किल्ल्याकडे जाण्यायेण्यासाठी एकच वाट होती. किल्ल्याच्या भोवती मोठमोठे डोंगर असल्यामुळे किल्ल्याखाली सुरुंग लावणे अशक्य होते. जुल्फिकारखान हा आका अलीखान आणि इतर घोडेस्वार यांना घेऊन किल्ल्याच्या अगदी पायथ्यापर्यंत चालून गेला. किल्ल्यावरुन तोफांच्या गोळ्यांचा वर्षाव होऊ लागला. जुल्फिकारखानबरोबर असलेले माणसे ठार झाली. जुल्फिकारखानने तेथील मराठ्यांची वाडी जाळली आणि तो परत फिरला. किल्ल्यापासून काही अंतरावर बुजुर्गवाडीचा दर्गा आहे तेथे त्याने छावणी कायम केली होती. तो अद्याप छावणीत पोहोचला नव्हता, इतक्यात साताऱ्याच्या दिशेने हंबीरराव त्याच्यावर चालून आला. मोगलांची रसद तोडणे हा त्याचा हेतू होता. मराठ्यांची जवळ-जवळ दीड हजार माणसे ठार झाली. मोगलांचे सुमारे नऊशे सैनिक ठार झाले. मराठे टिकाव धरु शकले नाहीत, ते पळून गेले. रसद तोडण्यासाठी तुकड्या नेमल्या होत्या, त्याही निघून गेल्या.[१३]

मोगली सैन्याला सुरुंग लावता येणे शक्य नव्हते. त्यांच्यावर तोफांचा मारा चालू होता, दमदमे रचले होते, किल्ल्याला एकच वाट होती. एतिकादखान व अकाअलीखान घोडेस्वारांसमवेत किल्ल्याच्या पायथ्याजवळ चालत आले होते. मराठ्यांनी मोगल सेवेची

रसद बंद पाडली होती, मोगल छावणीत धान्यटंचाई कमालीस पोहोचली. तरीही मोगलांनी धीर सोडला नव्हता.

एतिकादखानाने बादशहास त्यावेळी तेथील परिस्थिती कळविली. ते पत्र असे होते, ''विनंती की आज रायरी (रायगड) पासून सहा कोसांवर असलेल्या महाड येथें मी पाहोचलो. आज गुरुवार असून या महिन्याची आठ तारीख आहे. प्रथम आमच्या लष्करानें येथील गावें आणि ठाणीं लुटली. शत्रू किल्ल्याच्या पायथ्याशी होते. त्यांच्यावरहि आम्ही हल्ले केले. किल्ल्याच्या पायथ्याशी असलेली ठाणीहि आम्ही सोडली नाही. येथे रतनगडचा किल्ला आहे. या किल्ल्याच्या पायथ्याशी असलेली ठाणी पण उद्धवस्त केलीं. येथील शेतें आणि फळबागाही आम्ही नष्ट केल्या. मला आढळून आले आहे की, राजाराम हा नाममात्र आहे. त्याचे सरदार हंबीरराव, निळो आणि दोघे खंडूजी हे सैन्याची जमवाजमव करीत आहेत.तेच राजारामाच्या नाशाला कारणीभूत होतील. त्यांनी रुपाजी भोसले याला ही बोलावून घेतले आहे. परमेश्वराच्या आणि बादशहाच्या कृपेनें शत्रूंची हानी होऊन त्यांना शिक्षा मिळेल अशी मला आशा आहे. गांगोलीच्या मुक्कामी शत्रुने आमच्यावर रात्री हल्ला केला. त्यांनी आमच्यावर बाण फेकले आणि गोळ्यांचा वर्षाव केला. पण आमचे शूर सैनिक सावध होते. त्यांनी शत्रुंचा प्रतिकार करुन त्यांना परतवून लाविले. आजही महाडच्या वाटेवर असलेल्या सोनगडाच्या डोंगरावर शत्रु जमले आणि त्यांनी आमच्यावर तोफांचा आणि बंदुकींचा मारा केला. आमचे सैनिक डोंगरावर चढले. आमच्या सैनिकांनी शत्रूंना मार देत किल्ल्याच्या दरवाजापर्यंत रेटलें. तोपर्यंत समुद्राच्या खाडीला भरती आली. किल्ल्याच्या पायथ्याशी जाण्यायेण्याची वाट होती. ती फक्त तीनचार हातच रुंद होती. त्यांतच दिवस मावळून रात्र झाली. या चकमकीत खैर अंदेशखान आणि त्याचे मोगल यांनी चांगलीच कामगिरी बजाविली.किल्ला मोगलांच्या ताब्यात देण्यावाचून गत्यंतर राहिले नाही.''[१४]

वरील पत्रावरुन असे लक्षात येते की, ''जवळ-जवळ रायगडाचा पाडाव होणार होता. या उपरान्त रायगडवरील मुत्सद्दी व सरदार मंडळीस दिसून आले की, खजिन्यात पैसा नाही, जागा, फौज सर्व मोडले, पूर्वीची अनुभवी माणसे मरुन गेली, मोगलांच्या निरनिराळ्या फौजा मराठी राज्यांत सर्वत्र घुसून नाश करु लागल्या अशा अवघड स्थितीत

किल्ला लढविण्याचे व राज्य राखण्याचे काम कठीण होऊन बसले. शत्रूंशी उघड टक्कर देणे शक्य नव्हते, हा विचार मुत्सद्यांनी राणी येसूबाईंना बोलून दाखविला तेव्हा येसूबाई म्हणाल्या की, तुम्ही सर्व पराक्रमी सरदारांनी एक विचारे चालून राजारामांनी त्याचे कबिलासह बाहेर पडावे. आम्ही मुलांसह रायगडावर सुखरुप राहू. तुम्ही सर्व बाहेर पडल्यावर शत्रू तुमचे अंगावर जातील. तुमचा सर्वांचा जमाव एके ठिकाणी पोक्त झाला म्हणजे आम्हांस काढून तिकडे न्यावे.''[१५] या संदर्भात बखरकारांच्या बखरीत येसूबाईचे शब्द पुढीलप्रमाणे दिले आहेत, ''....मुलाचे वय लहान राज्य तरी गेलेच. त्या अर्थी तुम्ही सर्वही पराक्रमी सरदार यांनी राजाराम समवेत बाहेर पडावे. आम्हांस सुरक्षित राहण्यास रायगडाहून अधिक मज़बूत ऐशी दुसरी जागा नाही. तुम्ही सर्वांनी बाहेर पडून फौज जमा करुन प्रातांचा बंदोबस्त राखिला असता सर्व ओढ किंवा मसलत तिकडे आधी पडेल. येथे काही किल्ला पडणार नाही. किल्ला बेलाग मजबूत, वर्ष सहा महिने टिकाव पडेल. तुमचा सर्वांचा जमाव एखादे ठायी पोख्त झाला म्हणजे आम्हास काढून न्यावे. परंतु ये समयी सर्व कुटुंब निघोन एकदास सर्वांनी शत्रुस हस्तगत व्हावे ऐसे होईल....''[१६]

डॉ. जयसिंगराव पवार म्हणतात, ''राजघराण्यातील ज्येष्ठ व्यक्ती म्हणून राणी येसूबाईकडे सर्वजण मार्गदर्शक देवता म्हणून पाहत होते. रायगडावर जमलेल्या सर्व मुत्सद्यांनी व सेनानींनी त्यांच्याकडे जाऊन सल्लामसलत मागितली. तेव्हा अत्यंत दूरदृष्टीने त्यांनी मसलत सांगितली की, आपण स्वत: शाहू राजांसह रायगड लढावे; तथापि राजघराण्यातील सर्वानीच एकत्र राहून इथे अडकून पडण्यापेक्षा राजाराम महाराजांनी प्रमुख मंडळीसह गडाबाहेर पडावे आणि शत्रूशी संघर्ष चालू ठेवावा आणि तशीच परिस्थिती उद्‌भवल्यास; कर्नाटकात जावे व तेथून संघर्ष चालू ठेवावा.''[१७] या एकंदरीत राणी येसूबाईची पोख्त विचारसरणी ऐकून सर्वांना धीर आला. परंतु येसूबाईस मागे एकटी टाकून जाणे राजाराम महाराजांच्या जीवावर आले. तथापि प्रसंगावर दृष्टी ठेऊन सर्वांचे समाधान करुन राजाराम महाराज बोलले, ''राज्याचे अधिकारी शिवाजी राजे पूर्वीचे तेच हे ऐसे लक्ष ठेवून, आम्ही कारभारी, आमचे आज्ञेत राहून, पूर्वीहूनविशेष पराक्रम करुन, औरंगजेबास जिंकून राज्य लक्षावे येविशी सर्वांची शपथाप्रमाणे व्हावी.'' येणे प्रमाणे सर्वांच्या शपथा झाल्या आणि राजाराम महाराज ता. ५ एप्रिल १६८९ रोजी

रायगडाबाहेर पडले.[१८] निघताना राजाराम महाराजांनी राणी येसूबाईचे चरणी मस्तक ठेवून श्रमी झाले तेव्हा राणी साहेबांनी त्यांच्या मस्तकी हात ठेवून बोलल्या यशस्वी व्हावे, गेलेले राज्य मिळवावे, श्रमी होऊ नये. तद्नंतर राजाराम महाराजांनी नेत्र पुसून संभाजीपुत्र शिवाजीस पोटाशी धरले व पुन्हा भेट होईल ती सुदीन असे म्हणून निरोप घेतला. संताजी घोरपडे, धनाजी जाधव, खंडेराव दाभाडे इत्यादी मंडळी बरोबर होती.[१९]

शौर्यादि गुणांत मराठे कोणासही हार जाणारे नाहीत, त्यांचे मरण गळेकापू स्वभावांत आहे, हा प्रकार रायगड किल्ल्याचे बाबतीत चांगला निदर्शनास आला. किल्ला इतका दुर्भेक्ष की लढून तो बहुधा मोगलांस प्राप्त झाला नव्हता. वेढा घालून आठ महिने झाले, तथापि इतिकदखानांचे पाऊल यत्किंचित् पुढें पडेना. बाहशहाने त्यांस सारखी निकड लाविली आणि त्याच्या मागणी प्रमाणें सामान फौजासर्व कांही तयार करुन पाठविले.[२०] चांगोजी काटकर हवालदार यांनी वेढा लढवला. पावसाळ्यानेही थोडा हातभार लाविला. बाहेरुन मदत यावी ती आली नाही. शंकराजी नारायणाची मुख्यत: मदत व्हावयाची. परंतु त्यांचे सचीवपद काढून घेतल्याने त्यांना काहीच हालचाल करता आली नाही. वेढा नऊ महिने चालू राहिला. ह्याच वेळेस झुल्फिकारखानाच्या साह्यार्थ जंजिऱ्याचा सुभेदार खैरियतखान सिद्दी हा बादशहाच्या हुकूमाने मदतीस आला होता. किल्ल्यात तोफा व युद्धाचे इतर सामानही होते पण बेताचे होते. झुल्फिकरखान याने किल्ल्याला चहूकडून वेढले. किल्ल्याच्या वाटा त्याने बंद केल्या आणि किल्ल्यावर तोफांचा मारा चालू केला. किल्ला मोगलांच्या हवाली करण्याशिवाय गत्यंतर नव्हते. हे येसूबाईस सूर्याजी पिसाळाने पटवून दिले. किल्लेदारांनी झुल्फिकरखानाबरोबर तहाचे बोलणे लाविले.[२१] या बाबतीत डॉ. शिवदे म्हणतात, ‘‘येसूबाईना वाटाघाटी करण्याशिवाय पर्याय नव्हता. झुल्फिकरखानाच्या सैन्यात इकडच्या माहितगार माणसाच्या मध्यस्थीने वाटाघाटी होणे गरजेचे होते. त्या दृष्टीने झुल्फिकरखानाने सूर्याजी पिसाळ यास यासाठी नेमले. सूर्याजी पिसाळ ओझर्डे गावचा पाटील त्याने गडाच्या वाटा दाखविल्या वगैरे आख्यायिका खऱ्या नाहीत. त्याच्या मध्यस्थीने रायगडाचा सल्ला झाला.[२२] बेन्द्रे म्हणतात, सुर्याजी पिसाळाने मध्यस्थी केली. त्या तहात त्यांना मानाने व

सुरक्षिततेत कैदेत ठेवण्याचा करार केला होता व रायगड मोगली सेनेच्या हाती द्यावयाचा होता. हा तह शके १६११ कार्तिक मासात (इ.स. ऑक्टोबर १६८९) झाला.[२३]

या गडावर येसूबाईंनी शिवछत्रपतींचा राज्यभिषेक पाहिला होता. संभाजी राजांशेजारी राज्यभिषेक प्रसंगी पट्टराणी म्हणून त्यांच्या मस्तकी अभिषेक धारा पडल्या होत्या. 'क्षत्रिय कुलावतंस सिंहासनाधीश्वर छत्रपती शिवाजी महाराज की जय', 'छत्रपती संभाजी महाराज की जय' हे शब्द या रायगडावर घुमले होते.[२४] त्याच येसूबाईस रायगड मोगलाच्या स्वाधीन करण्यास वेळ येते. काल-करार झाले. त्यांत सर्वांना मानाने व सुरक्षित ठेवण्याचा करार झाला. संभाजी महाराजांची पत्नी राणी येसूबाई मुले व इतर मंडळी मोगलांच्या छावणीत आली. झुल्फिकरखानाने सर्वांना सन्मानाने वागविले. किल्ला ता. ३ नोव्हेंबर १६८९ रोजी झुल्फिकरखानाच्या ताब्यात आला तेव्हा त्याने महाराजांचा दफ्तरखाना जाळला व सिंहासन फोडीले. हे त्याने बादशहास कळविले व किल्ल्याच्या बंदोबस्ताला अधिकारी नेमले. रायगडाला उत्तमगड इस्लाम असे नाव देण्यात आले.[२५]

हा इतिवृत्तांत औरंगजेबाची मुलगी बेगम हिला समजले. ती बादशहास म्हणाली, "तो बेटा माझा. त्यास अभय कौल देऊन आणावे." हे सर्व येसूबाईसाहेबांस सांगून पाठविले. तेव्हा बाईसाहेब बोलिली, "असे सापडलो म्हणजे आधीच अविंध, त्यांत द्वेषी, चांगले नाही. झुल्फिकरखान यांचे इनाम प्रमाण करुन त्यांचा आश्रय करावा हे उत्तम दिसतें. व बेगमेचेही निरोप आदरयुक्त आले. तेंच साधन करावें. आणि जाऊन भेटावे." ऐशी मसलत सर्वांचे विचारें करुन झुल्फिकारखाना यांशी राजकारण बळाविणे. त्यांत बेगमेसही निरोप पाठवून पक्के केलें. तिचे इमान आश्वासन आणिले आणि महाराज उतरुन आणून खानाने मांडीवरी बसविले. "यांचे वडील, चुलते ते सर्व सोडून गेले. सर्वांविशी वडील तुम्ही आहां." असे म्हटल्यावर त्यांनीही "येविशी याऊपरी तुम्ही खतरा न करणे. याचे जिवास व अबरुस कदापि धक्का लागू देणार नाही.", म्हणून कुराण उचलून दिले. खातरजमा केली आणि शिवाजीराजे व मदनसिंग नाटक शाळेची पोटी होते व येसूबाईसाहेब आणखी नाटकशाळा एक दोन इत्यादि सर्व घेऊन खान सर्व दौलत

खजीना, मालमत्ता, सोनें, हत्ती, घोडे, व तक्तांचे सोनेंही सापडले ते घेऊन बादशहाकडे निघोन गेले.[२६]

बादशहाने झुल्फिकारखान यास संभाजीची बायका मुले बरोबर घेऊन दरबारांत यावें म्हणून आज्ञा केली. झुल्फिकारखानानें संभाजीची मुलें, शिवाजी (शाहू), मानसिंग, मदनसिंग, संभाजीची बायको, आई आणि इतर मंडळी यांना बरोबर घेतले आणि तो बादशहाकडे आला. संभाजीच्या मालमत्तेपैकी जड-जवाहिराने भरलेल्या दोन पेट्या बादशहासमोर ठेवण्यात आल्या. बादशहाने त्या फाजलखानाच्या अमानतीत दिल्या. झुल्फिकारखानाबरोबर सर अफराजखान, खैर अंदेशखान व द्वारकादास वगैरे मानकरी होते. त्यांनी नजरा समोर ठेविल्या, पण बादशहाने त्या माफ केल्या. नजरा घेतल्या नाहीत. यानंतर झुल्फिकारखानाने संभाजीच्या तिन्ही मुलांना बादशहाकडे आणलें.[२७]

बादशहाने त्या मुलांना त्यांच्या-त्यांच्या योग्यतेप्रमाणे राजा ही पदवी, मन्सबी, हत्ती, घोडे इत्यादी सरंजाम दिला. त्यांच्या सरंजामाची व्यवस्था करण्यासाठी बादशाही अधिकारी नेमून दिले. त्यांना चांगले शिक्षण देण्यात यावे अशी आज्ञा देण्यात आली. संभाजीची आई, बहीण, बायको यांना बादशहाने उंची वस्त्रे आणि रत्नाचे अलंकार दिले. संभाजीचे खंडोजी, रामाजी, जानोजी आणि इतर सरदार हे मोगल छावणींत आले होते. त्यांनाही बादशहाने त्यांच्या योग्यतेप्रमाणे मन्सबी आणि इतर सरंजाम दिला. शहजादा अकबर याची सोळा माणसे पण धरुन आणली होती, त्यापैकी दोघींना अंत:पुरात दाखल करुन बाकी इतरांना सोडून देण्यात यावे अशी आज्ञा करण्यात आली. अब्दुलकादरखान याचीं बायकामुले संभाजीच्या कैदेत होती. तीही सूटून मोगल छावणीत आली होती. त्यांना अब्दूल कादरखानाच्या माणसांकडे सोपविण्यात आले.[२८]

''आता औरंगजेबाने आपल्या मनासारखे सारे काही प्राप्त करुन घेतले होते. निदान तसा देखावा तरी निर्माण झाला होता. परंतु प्रत्यक्षात मात्र त्याने सारे काही गमावलेले होते. तसे बघितले तर त्याच्या सर्वनाशाची ती केवळ सुरुवात होती. मोगल साम्राज्याचा विस्तार आता इतका मोठा झाला होता की, एका माणसाकडून अथवा एकाच मध्यवर्ती ठिकाणावरुन त्या साम्राज्यावर अधिसत्ता गाजविणे कठीण होते. त्याच्या शत्रुंनी सर्व बाजूंनी त्याच्याविरुद्ध उठाव केला होता. तो त्यांचा पराभव करु शकत होता. परंतु

त्याचा कायमचा नायनाट करणे त्याच्या आवाक्यापलीकडचे होते. उत्तर आणि मध्य हिंदूस्थानातील अनेक भागांत अराजकता माजली होती. राज्यकारभारात ढिलाई आणि लाचलुचपत याचा सुळसुळाट झाला होता. दक्षिणेमधील अविरत चाललेल्या युद्धाने खजिना रिता पडला होता. पहिला नेपोलियन म्हणत असे की, ''स्पेनरुपी अल्सरने माझा नाश केला.' दक्षिणेतल्या अल्सरने औरंगजेबाला धुळीला मिळविले.''[२९] न्यायमूर्ती रानडे म्हणतात, ''सगळा मैदानी मुलूख काबीज करुन किल्ले बचावाच्या तयारीचे नसल्याने औरंगजेब ते एकामागून एक विशेष प्रयत्नांवाचून सर करीत चालला. शेवटी रायगड त्याच्या ताब्यात आला आणि संभाजीची बायको व मुलगा यांना औरंगजेबाच्या छावणीत नेले. दक्षिणेत येऊन पाच वर्षे होतात न होतात तोच तो जन्मभर जे स्वप्न आपल्या डोळ्यांपुढे खेळवीत होता. ते साकार झाल्याची धन्यता त्याला लाभली. नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंतचा साराप्रदेश त्याच्या पायाशी लोळत पसरलेला होता. त्यामुळे असे वाटण्याची पाळी आली की, शिवाजी व ज्यांना त्याने विजयाचे धडे शिकविले ती माणसे या सर्वांचे जीवन मरण फुकट गेलें. ज्या मोठ्या प्रलयांतून आपला देश तारण्यासाठी शहाजी आणि शिवाजी यांचा साठ वर्षे खटाटोप चालला होता तो आताच्या प्रलयाने साफ धुतला गेला.[३०]

## २.३ छत्रपती शाहू यांचे बादशहाच्या कैदेतील जीवन कार्याची वाटचालः-

रायगडाहून शाहू व येसूबाई इतर मंडळी छावणीत दाखल होताच बादशहाने त्या सर्वांस आपल्या राहत्या तंबूजवळ लालकनातीच्या आवारात स्वतंत्र जागा नेमून दिली. त्या ठिकाणी सर्वांस पुरेसे तंबू उभारुन त्यांच्या राहण्याची व जनानखान्याच्या पडद पोशीची तजवीज केली. नोकर चाकरांची जागा वजीराच्या मुक्कामाशेजारी 'राणीचा बाजार' या नावाने ठरवून दिलेली होती. प्रत्येकास इल्माच्या खर्चास ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे सालाच्या उक्त्या नेमणूका बादशहाने बांधून दिल्या. शाहूला त्याने 'राजा' ही पदवी आणि जात व स्वार मिळून सप्तहजारी मनसब मुक्रर केली. त्याची राहण्याची जागा आई-आजींच्या जागेत होती. स्वतंत्र नव्हती. आरंभी तरी खाण्यापिण्याची कमतरता नव्हती. पण पहारा मात्र अगदी सक्त होता.[३१]

या वरुन समजते की, जरी शाहू व येसूबाई याला सन्मानाने वागवण्याचे ठरविले तरी त्यांचा पहारा हा सक्त ठेवला होता. कारण औरंगजेबाला बहुतेक वाटत होते की, छ. राजाराम तसेच मराठे सरदार त्याला सोडवून घेऊन जातील. त्याने शाहूला सप्तहजारी मन्सबदारी दिली व राजा ही सुद्धा पदवी देण्यात आली. खिलतीची वस्त्रे, रत्नजडित खंजीर, आरसी, घोडा, हत्ती, ध्वज, नगारे, नौबतीचा मान इत्यादी वस्तू दिल्या. तसेच धाकटे भाऊ मदनसिंग व उद्धवसिंग (माधवसिंग) यांना त्याच्या योग्यतेप्रमाणे मन्सबी देण्यात आल्या होत्या.

औरंगजेबाने पुढे सर्वांना कैदेत ठेवल्यानंतर ता. ३ जाने. १६९० रोजी आपली छावणी तुळापूर-कोरे गावाहून विजापूरला हलविली. पंधरा दिवस विजापूरला राहून ता. ९ फेब्रुवारी १६९० रोजी बद्रीनाथाच्या कृष्णानदीच्या काठावरील खेड्यात पोहचली, तेथे दोन महिने बादशहाचा मुक्काम होता. येसूबाई व शाहूराजे बादशहाच्या बरोबरच होते.[३२] ता. ११ मे १६९५ रोजी बादशहा भीमानदीच्या काठावरील ब्रम्हपुरीस पोहोचला. येसूबाई व शाहूराजे यांना बरोबर राहावे लागत असे. जत्रा स्वरुपी छावणी बरोबर त्यांना मेण्यातून प्रवास करावा लागे. जनानखाना हा मेण्यातून व अंबारीतून प्रवास करी.[३३]

एकंदरीत मराठ्यांचा राजा शाहू व महाराणी येसूबाई यांची अशी दयनीय स्थिती झाली होती. ज्या महाराष्ट्राचे ते स्वामी होते त्याच महाराष्ट्रात त्यांना कैदी म्हणून एका ठिकाणाहून दूसऱ्या, दुसऱ्या ठिकाणाहून तिसऱ्या अशी भटकंती करावे लागत होते.

येसूबाई व शाहू मोगलांच्या कैदेत असताना त्यांचे वर्तमान राजारामास पोचविणे हे काम संभाजीच्या वेळेचे विश्वासू, भक्ताजी हुजरे व बंकी गायकवाड यांच्याकडे दिले होते. औरंगजेबाच्या कैदेत असता त्यांच्या सारख्या मुत्सद्दी व संशयी अशा मुत्सद्याला आपल्याविषयी कोणत्याही प्रकारचा संशय येऊ नये म्हणून येसूबाईला व शाहू राजाला मोठी काळजी घ्यावी लागत असे. राजारामाशी असलेल्या संबंधाचा सुगावा त्याला लागू नये म्हणून येसूबाई मोठ्या मुत्सद्देगिरीने वागत असे.

संभाजीच्या मुलाचे नांव मुळचे शिवाजी असून बादशहाने त्यास 'साव' म्हटल्यावरुन शाहू हे नांव प्रचारांत आले असा समज आहे. याबद्दल राजवाड्यांनी

आपला अभिप्राय पूर्वी व्यक्त केला होता की, यांचे मूळचे नाव शहाजी असून त्याचाच अपभ्रंश प्रचारांत शाहू असा झाला. शहाजी हा शब्द फारशीत साहजी व त्याचे हस्तरूप साहू असे लिहिलेले आढळते. पण ग्रँड डफ व बखरकार या सर्वांनी यांचे मुळचे नांव शिवाजी होते असे दिले आहे व कित्येक शिक्क्यांतही त्यांचे नाव शिवाजी असेच आढळते. औरंगजेब विनोदाने पहिला शिवाजी लुच्चा, हा मात्र 'साव' असे म्हणत असेल पण पुढे 'साव' व 'शाहू' ही रुपे प्रचारांत आणली असे म्हणतां येणार नाही. घरांत त्याची आई वगैरे वडील माणसे शाहू या नावानेच त्यास हाक मारीत असावी.[३४]

छत्रपती शाहू महाराज यांचे मूळ नाव शिवाजी असे होते पण त्यांना पुढे पुढे शाहू म्हणू लागले. त्यातच पुढे ते शाहू याच नावाने ओळखू लागले.

औरंगजेबाने एकदा थट्टेने शाहूला म्हटले, ''राजे तुमचे वडील मारले असता तुम्ही नेकीने चालता, तुमचे चुलते यांनी तुमचे राज्य दौलत आटोपून आम्हासी ते लढता त्यास तुम्हास त्याजकडे लावून देतो जावे.'' यावर शाहूने अतिशय मार्मिक व समयोचित असे उत्तर दिले. शाहू म्हणतात, ''पूर्वी आमचे वडील हयात असता त्यास नजर बंदीत ठेऊन आपण राज्य करावे असा राजारामाने बेत केला होता. त्याचे पश्चात आम्हाला आमचे इलाखा सुद्धा रायगडी टाकीत आपले कबिलेखसुद्धा निघोन गेले...गादी व शिक्के आपले नावे करुन घेतले. आम्ही स्थानाकडे गेलो असता आम्हांस नजरबंद ठेवतील. आपण (औरंगजेब) त्यांचे पारिपत्यकरुन आम्हांस राज्यावर बसवाल तेव्हा राज्य करु.''[३५] शाहू ने कुठल्याही प्रकारचे असे हावभाव दाखविले नाहीत जेणे करुन बादशहाला फितुरी वाटावे अशी. शाहू हा अजून लहानच होता तर त्यांच्यावर किती मोठा परिणाम झाला होता. कोणा सोबत कसे वागावे हे सर्व त्याला माहित झाले होते.

येसूबाई व शाहू यांनी आपल्या निरलस वागणुकीने बादशहा व बेगम यांची मर्जी संपादन केली होती. मराठी राज्याशी आपली कुठल्याही तऱ्हेची फंदाफितुरी चालू नाही असे ते भासवित होते.

शासनाकडील वर्तमान (आपल्या गोटातील) आपल्यास कळावे म्हणून रायगड सोडताना खंडो बल्लाळाला आपल्या जवळ बोलावून शाहूला त्याच्या जवळ बसवून तिने

वचन घेतले. पुढे खंडो बल्लाळ राजारामा बरोबर चंदीकडे गेला.[३६] औरंगजेबाने येसूबाई व शाहू यांच्या वागणुकीबद्दल संतोष व्यक्त केला.

शाहू महाराजांना अक्कलकोट, इंदापूर, सुपे, बारामती व नेवासे या पाच परगण्यांची जहागीर करुन दिली एक सोन्याची तलवार, शिवाजीची भवानी व अफझलनाखाची तलवार अशी बक्षिसे दिली. औरंगजेबाने शाहूला सप्तहजारी मनसब दिली व येसूबाईना कारभार पाहण्याचा अधिकार दिला. हा कारभार करण्याकरिता येसूबाईला एक शिक्का दिला होता. शाहू अल्पवयीन असल्यामुळे येसूबाई तो वापरत असे. तो फारशी मध्ये आहे. ''येसूबाई इ वालिदा शाहू राजा सन अहद'' मराठीत ''शाहू राजाची आई येसूबाई वर्ष पहिले.''[३७] असा तो शिक्का होता. यावेळेस येसूबाई सोबत जोत्यांजी केसरकर व मोरोपंत सबनीस ही दोन विश्वासू मंडळी होती.

बादशहा व शाहू एकमेकांना आपल्या वर्तनाने खूष ठेवण्याचा प्रयत्न करीत असत. औरंगजेब शाहूला वारंवार भेटवस्तू देत असे. ''बादशहाने शाहूला लाल माणके जडवलेला आरसा हिऱ्या सोन्याची पंछी (अलंकार) पाच रत्नजडीत आंगठ्या व एक रत्नजडीत खंजीर आणि सोनेरी असलेला घोडा या वस्तू दिल्या.''[३८] यावरुन औरंगजेब सतत शाहूला खूष ठेवण्याचा प्रयत्न करीत होता.

औरंगजेब मुत्सद्दी होता जो है जाणून होता की,
आकिबते गुर्ग जादा गुर्ग शवद
गर्चे बा आदमी बुजुर्ग शवद[३९]

म्हणजे (लांडग्याचा बच्चा माणसा बरोबर वाढला तरी तो शेवटी लांडगाच होणार) बादशहाचा मुक्काम गलगलें व ब्रम्हपुरी येथे असतां शाहूचे हाल झाले नाहीत, पण इ.स. १६९९ मध्ये बादशहा स्वत: किल्ले हस्तगत करण्यास निघाला तेव्हापासून सर्वांचीच आबाळ होऊ लागली. बहुधा शाहू व येसूबाई तळ मुक्कामावरच थोडे दिवस असावी पण पुढे पुढे बादशहाच्या अडचणी वाढत गेल्या, खर्चाची ओढ झाली थंडी, वारा, पाऊस यांच्या योगाने सर्वांचेच हाल होऊ लागले, तेव्हा शाहूची सुद्धा इतरांबरोबर अत्यंत आबाळ झाली, याचा ध्वनि येसूबाईने चिंचवडच्या देवांस लिहिलेल्या पत्रांत उमटलेला दिसतो.[४०] जरी बादशहाने शाहूला सप्तहजारी दिली तरी पुढे पुढे त्यांचे हाल

होण्यास सुरुवात झाली. शाहूची कैद सक्त असल्यामुळे त्यास बाह्य जगाचा अनुभव घेण्याची संधीच मिळाली नाही. राजारामाप्रमाणे त्यांचेही आयुष्य नि:सत्त्व परिस्थितीत गेले. रानावनांत स्वेच्छेने बाहेर फिरण्याची मोकळीक त्यास नव्हती. छावणीचे आवारांत घोडयाचा फेरफटका करायला सापडला असेल तेवढाच. शिक्षणांचे नावांने तर विचारायलाच नको. डोक्यावर नागवी तलवार लटकत असल्याप्रमाणे त्याचे जिणे होते.[४१]

ता. १० जुलै १७०३ रोजी बादशहाने दिवाणेखास भरविला त्याचे वृत्त.

शाहूची मन्सबदारी काय दर्जाची होती हे अखबरीतील खालील नोंदीवरुन दिसून येते. बादशहाने आज दिवाणे खास भरवला, दिवाणे खासचा दारोगा (व्यवस्थापक) हमीदोद्दीनखान बहादूर यास बादशहाने आपल्यासमोर यादी ठेवण्यास सांगितली व पुढीलप्रमाणे ती यादी होती-

१) उम्दतुल्मुतक- अमीर उलूउमरा (असदखान मुख्य प्रधान)

२) बक्षीउल्मुतक- रुहुल्लाखान

३) बक्षीउल्मुतक - सदरुद्दीन मुहंमदखान

४) मतलबखान

५) हाजी मुहंमद अलिखान

६) मन्सूरखान

७) राजा शाहू

८) हमीदोद्दीन खान बहादूर

९) इनायत उल्लाखान

१०) अब्दुल रहीमखान

११) रशीदखान

१२) शादी खान

१३) वाकर खान

१४) मुजीम खान [४२]

एकंदरीत शाहूचे कैदेतील जीवन हे पिंजऱ्यातील पक्ष्याप्रमाणे होते. त्यांना कुठेच बाहेर मोकळीक नव्हती. त्यांना औरंगजेबाने अनेक वस्तु भेट म्हणून दिल्या होत्या. पण त्यांचा पहारा हा सक्तच होता. जवळ-जवळ त्याचे उमेदीचे आयुष्य हे कैदेतच गेले.

## २.४ छत्रपती शाहू महाराजांना सोडविण्यासाठी छ. राजारामाने केलेले प्रयत्न व राजारामाचा मृत्यू (इ.स. १७००):-

राजारामाने सांगितले की राज्याचा खरा वारस शाहू आहे व तो कैदेत आहे, जो सोडवून आणण्याचे कार्य आपले आहे. राजाराम यांनी राज्यभिषेक केला नव्हता त्यांनी फक्त मंचकारोहन केले होते. राजाराम महाराज जिंजीतून महाराष्ट्रामध्ये येत असताना तेव्हा त्यांनी शाहूस सोडविण्याचा प्रयत्न केला.

राजाराम महाराज यांनी औरंगाबाद येथे प्रत्यक्ष औरंगजेबाच्या छावणीवर हल्ला केल्यासंबंधी चिटणीसाच्या बखरीत वर्णन केले आहे. त्यावरुन राजाराम महाराजांची शाहू महाराजांसंबंधी आत्मीयता व्यक्त होते. तसेच औरंगजेबाला धडा शिकविण्याची इच्छाही दृष्टीस पडते. स्वत: राजाराम महाराज काही निवडक स्वारांबरोबर औरंगजेबाच्या छावणीवर गेले आणि रात्री छावणीवर छापा घातला.

हे कृत्य अतिशय धाडसाचे होते. तसेच जिवावरच्या धोक्याचेही होते, पण बादशहाच्या ताब्यातून शाहू महाराजांना सोडवून आणण्याची जबरदस्त इच्छा त्यामागे होती आणि तिच्या जोरावर राजाराम महाराजांनी हे धाडस केले. पण दुर्दैवाने हेतू सफल झाला नाही. बखरकाराच्या मताप्रमाणे, ‘‘त्या रात्री बादशहाचा मुक्काम दुसऱ्या तंबूत होता. तिकडे त्याच्या बेगमेने मेजवानीसाठी बोलाविले होते. शाहू महाराजही बरोबर होते.’’ त्यामुळे एवढ्या धाडसाने केलेला हल्ला फुकट (व्यर्थ) गेला. शाहू महाराज हाती लागले नाहीत म्हणून ‘‘महाराजांची मर्जी बहुतच दिलगीर जाहली.’’[४३] यानंतर औरंगजेबाने आपला मुक्काम हलविला.

बेंद्रे म्हणतात, ‘‘शाहू महाराजांना परत राज्यात आणण्यासाठी राजाराम महाराजांनी खासा जाऊन ओरंगजेबाच्या छावणीवर छापाही घातला. परंतु त्याच दिवशी बेगमेच्या आमंत्रणावरुन औरंगजेब व शाहू तिच्याकडे गेल्यामुळे हा छापा निष्फळ ठरला

होता. इतकेच नव्हे तर औरंगजेबाशी केलेल्या करारात शाहूस राज्याची मागणी केली होती.''[४४]

सरदेसाई म्हणतात, ''इ.स. १६९६ त एकदां बादशहाचे छावणीवर छापा घालून राजारामाने शाहूस सोडविण्याचा प्रयत्न करविला, पण तो साधला नाही. त्या छाप्याने बादशहा एकदम सावध झाला. मराठ्यांशी लढण्याची नवीन व्यवस्था ठरवून त्या कामी त्याने स्वत: कंबर बांधिली तरी कैदेतून सुटून परत येण्याची योग्य संधि शाहू पाहतच होता त्यांने आपल्या पोटांतील गोष्ट बादशहास कधीही कळू दिली नाही. राजाराम आपला शत्रू आहे असेच त्यानें बादशहास भासविले आणि नेहमी बादशहाची मर्जी सुप्रसन्न ठेऊन आतून सुटकेचे इलाज चालू ठेविले.''[४५]

राजाराम महाराज महाराष्ट्रात आल्यानंतर त्यांनी शाहू हा खरा वारस आहे म्हणून त्यास सोडविण्याचा प्रयत्न केला अनेक इतिहासकारांनी शाहूस राजाराम सोडवून आणण्याचा प्रयत्न केला हे मान्य केले आहे. काही दिवस राजाराम महाराज पुण्यास राहून नंतर सिंहगडावर गेले. महाराजांना छातीचा विकार असावा, सिंहगडावर महाराज आल्यावर त्यांना अल्पकाळ ताप आला, छातीच्या विकाराने रक्ताच्या गुठळ्या होऊन त्याच आजारात ते फाल्गून वा ता. २ मार्च १७०० रोजी कालवश झाले. विठोजी राजे भोसले यांच्या वंशातील जीवाजीराजे भोसले वावीकर यांनी विधी केला. मृत्यूसमयी त्यांचे वय ३० पेक्षा अधिक नव्हते.[४६]

राजाराम महाराज ता. २ मार्च इ.स. १७०० रोजी मरण पावले. मरण समयी फक्त रामचंद्रपंत त्यांच्याजवळ होते. त्यांना तो म्हणाला, ''तुम्ही थोरले महाराजापासून राज्याचे साधनास श्रमसाहस करीत आलात व करीत आहात. आमचा तो काळ समीप आला. आमच्यामागे सर्वत्र मिळोन हल्ली करता तसे करावे. शिवाजी महाराज (शाहू) सुटोन येत ते करावे...'' त्याच्या एका पत्रात एक उल्लेख अगदी स्पष्ट आहे...''कारण चिरंजीव राजश्री (शाहू) काले करुन तरी श्री देसी आणील...ते (शाहू) मुख्य, सर्व राज्यास अधिकारी, आम्ही करतो तरी ते त्याचे साठीच आहे.''[४७]

राजाराम महाराजाने मन:पूर्वक शाहूस सोडविण्याचा प्रयत्न करत होते असे दिसते. त्यांना मरताना सुद्धा आपल्या मुख्य माणसांना शाहू राजांना सोडवून आणण्यास सांगत

होते. पण बेंद्रे म्हणतात की, ''राजारामाच्या मृत्यूनंतर अर्थातच शाहूस सोडवून आणण्याचे पुन्हा प्रयत्न होणे शक्य नव्हते. कारण रामचंद्रपंत व शंकराजी यांनी शाहूच्या चाकर माणसांची इनामे स्वाहा केली होती.[४८]

राजाराम महाराज मरण पावल्याचे शाहू व येसूबाई यांना समजले, त्यांना खूप दु:ख झाले. या संदर्भात चिटणीस बखरीतील मजकूर असा, ''......नंतर शाहू महाराजांस ज्वर झाला. हे वर्तमान बेगम याणि ऐकून बहुत घाबरी होऊन, आपण नेहमी जवळ राहून, उपाय करिती झाली. बादशहास वर्तमान कळाल्यानंतर खासा स्वारी समाचारास आली. जवळ बसोन अंगावरुन हात फिरविला. यानी पायावर डोई ठेविली. तेव्हा बोलिले की, ''मुमचा चिचा मर गया, उस वास्ते तुमारी तबियेत बिघड गई, आजार हुवा?'' असे बोलले. तेव्हा महाराज हात जोडून बोलिले की, ''आमचा बाप व चिच्या आब खुदावंत! दुसरे कोणी ठाऊक नाही. जर आमचे काका असते तर आमचा कबिला रायगडी ठेवून का जाते?'' हे शब्द ऐकोन बहुत खूष होऊन, पुन्हा अंगावरुन हात फिरवून दाढी धरुन बोलिले की, 'तुम चिंता मत करो, दख्खनमें सब चोर, तुम साहू तुमारा राज्य तुमकू देऊंगा. तुम हमारे बेटीके बेटे हो. कुच फिकीर मत करो।' असे समाधान करुन 'राजारामही बहुत अच्छा था' असे बोलून बेगमेस सांगितले की, 'आपने बेटेकू जलदी अच्छा करना' असे सांगून स्वारी गेली. भक्ताजी हुजरे यानि पाहिले. भक्ताजीस (महाराजांनी) निरोप सांगितला. 'उभयता आई साहेबांच्या पायावर डोई ठेविली. आणि उभयता बंधूस आशीर्वाद सांगावा. काकांचे ठिकाणी तुम्ही आहा. सर्व कार्यकर्ते मोठमोठे त्यांस तुम्ही काकासाहेब आहा. काकासाहेबांचे मागे लढाई केली हे वर्तमान कळून बहुत संतोष जाहला. काकासाहेबांचे व थोरले महाराजांचे पूर्ण यश आलेचे खचित वाटले. आम्हास नेणेचा उद्योग करीतच आहा. श्रीइच्छेने घडेल तो सुदिन! तथापि काकासाहेब याणी राज्य रक्षण केले ते आपण रक्षावे. श्रीकृपे सुदिवस प्राप्त होईल.' असा निरोप भक्ताजी गायकवाड यासबरोबर सांगून पाठविला. हा निरोप पाहोचल्यानंतर रामचंद्रपंतास बहुत संतोष वाटला. नेत्रास उदक आले. 'शिवाजी महाराज बहुत योग्य आहेत.' अशी कचेरीत तारीफ केली. सेनापती वगैरे यानीही तारीफ केली. ऋणानुबंध (असे तसेल घडेल) असे बोलिले.[४९] यावरून शाहू किती विचारपूर्वक वागत असे. त्यांना माहिती होते

की, राजाराम महाराजाचा मृत्यू झाल्यानंतर शिवाजीस गादीवर बसविले होते व त्यास त्याने अनुमती दर्शवली कारण जर त्यांनी विरोध केला असता तर औरंगजेबाने त्यांचा फायदा घेतला असता.

### २.५ छ. शाहू यांचे बादशहाच्या छावणीतील संस्कार, धर्मांतराचे प्रयत्न आणि शाहूंची लग्नेः-

एखादा मनुष्य खडतर जीवनात यशस्वी होतो तो योग्य संस्कारामुळे जर त्याला योग्य संस्कार मिळाले तर तो कोणत्याही संकटांना डगमगत नाही, याचे उत्तम उदाहरण म्हणजे छत्रपती शाहू महाराज होय. शाहू महाराज जवळ-जवळ १७-१८ वर्षे जीवन कैदेत गेले. या वेळेस त्यांच्यावर अनेक बिकट प्रसंग आले होते. या प्रसंगातून बाहेर पडण्यासाठी सर्वात महत्त्वाचे समतोल दृष्टी, धैर्य लागते व ते योग्य संस्कारांतून मिळते. आजोबा शिवाजी महाराज, वडील छत्रपती संभाजी महाराज व काका छत्रपती राजाराम महाराज यांच्या पासून चालत आलेले संस्कार हे शाहूंना उपयोगी पडले. कारण की कैदेमध्ये त्यांच्यावर अनेक दुर्धर प्रसंग आले होते. त्यांनी त्या सर्वांचा प्रखरतेने सामना केला होता.

इ.स. १७०० मध्ये शाहूंना भयंकर तापाने पछाडले. या आजाराने त्याचे मन आणि शरीर पुढील सर्व आयुष्यभर कमकुवत करुन ठेवले असे दिसते. त्याच्या आजारीपणाबद्दलची हकिकत अखबारात पुढीलप्रमाणे दिली आहे. राजा शाहू हा २६ ऑगस्ट रोजी बादशहाच्या भेटीला आला आणि त्याने बादशहाला मुजरा केला. बादशहाने त्याच्याकडे निरखून पाहिले आणि उद्गार काढले की, ''तुझ्या चेहऱ्याचा रंग पार पिवळा पडून गेला आहे. याचे कारण काय बरे आहे? यावर खोजा हफीज अंबर याने उत्तर दिले की, 'राजा शाहू शिजवलेली डाळ, चपाती, अगर भात काहीही खात नाही तर फक्त गोड पदार्थांचे सेवन करतो. याचे कारण त्याने असे सांगितले की हिंदूंनी तुरुंगात (कैदेत) शिजवलेले अन्न खाणे हे निषिद्ध मानले आहे आणि मी स्वत:ला कैदी समजतो.''[५०]

म्हणजे प्राचीन कालखंडापासून हिंदू परंपरेप्रमाणे जर एखादा मनुष्य कैदी असेल तर तो कुठलेही शिजवलेले अन्न खात नाहीत. तेच धोरण शाहूने ठेवले. जरी औरंगजेबाने

मोठ्या प्रमाणामध्ये जरी बक्षीसे व अनेक वस्तू जरी दिल्या तरी शाहू महाराजांवर त्याचा काही परिणाम झाला नाही.

बेन्द्रे म्हणतात, इ.स. १७०० अखेरची नोंद अशी की, बादशहाच्या कानावर खबर गेली की, शाहूबरोबर आलेले हिंदू कैदेत असताना शिजविलेले अन्न खात नाहीत. राजा शाहूही शिजवलेले अन्न न खाता फक्त मेवामिठाईवरच राहतो. तेव्हा हमिदउद्दीन खानाबरोबर शाहूस निरोप दिला की, ''तु कैदी नसून आपल्या घरीच राहत आहेस. तेव्हा तू अन्न शिजवून घेऊन ते खाण्यास मोकळा आहेस. खाण्यात निर्बंध पाळण्याची आवश्यकता नाही...''[५१] यावरुन शाहू व इतर मंडळी आपला व्यवहार धर्मनिष्ठेने कसा करीत होते हे दिसते.

शाहू महाराज यांच्यावर जे संस्कार झाले होते ते चांगल्या प्रकारचे होते. त्यांनी कैदेत सुद्धा आपल्या चालीरिती प्रमाणेच व आपल्या धर्मशास्त्राप्रमाणेच वागत होते.

### २.५.१ औरंगजेबाचे शाहू महाराजांना धर्मांतरीत करण्याचे प्रयत्नः-

छत्रपती संभाजी महाराज यांना औरंगजेबाने मुस्लिम धर्म स्वीकारण्यास सांगितले तेव्हा संभाजी महाराजाने विरोध केला व राजांना देहांताची शिक्षा दिली. तोच प्रसंग आता त्यांच्या मुलावर आला.

शाहू मोठे झाल्यावर त्यांच्यावर रखवाली करणे कठीण होऊ लागले, तेव्हा शाहूस मुलमान केले की आपला त्रास कमी होईल असे योजून इ.स. १७०३ च्या उन्हाळ्यात पुणे येथे मोहरमचे उत्सवांत शाहूस दीक्षा द्यावयाची असा हुकूम बादशहाने जाहीर केला. याप्रमाणे बादशहाने शाहूस मुसलमानी दीक्षा देण्याचे ठरविल्यावर त्यासाठी त्यांचे मन वळविण्यासाठी हमीदोद्दीनखानास शाहूकडे पाठविले. धर्मांतराची ही आकाशांतली कुऱ्हाड अंगावर कोसळल्याचे ऐकून शाहू व त्याची आई यांनी रडून आकांत चालविला.[५२]

ता. ९ मे १७०३ या तारखेची नोंद पुढील प्रमाणे आहे. बादशहाने हमीदोद्दीनखान यास म्हटले, ''तुम्ही शाहूकडे जा, त्याला म्हणावे तु मुसलमान हो.'' त्याप्रमाणे हमीदोद्दीनखान शाहूकडे गेला. त्याने शाहूला बादशहाचा निरोप सांगितला. शाहूने त्या सूचनेला निर्धाराने नकार दिला परत येऊन हमीदोद्दीन खानाने शाहूचा नकार

बादशहाला कळविला. हे ऐकून बादशहा इतकेच म्हणाला, "शाहूवर कडक नजर ठेवा."[५३]

डॉ. शिवदे म्हणतात, "औरंगजेबाचा आतला आवाज बाहेर आला. कारण ता. ९ मे १७०३ (मोहरम) बादशहानी हमीदोद्दीन खान बहादूर याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली. संभाजीचा मुलगा राजा शाहू हा गुलालबारमध्ये कैद आहे. त्याला बोलवा आणि त्याला म्हणा, 'तु मुसलमान हो.' त्याप्रमाणे हमीदोद्दीनखान बोलला. परंतु शाहूने ते मान्य केले नाही. बादशहाला खानाने बातमी कळविली. बादशहाने आज्ञा केली की, 'शाहूवर कडक नजर ठेवा."[५४]

याबाबतीत जदुनाथ सरकार म्हणतात, औरंगजेबाच्या अडचणी जसजशा वाढू लागल्या आणि दक्षिण प्रश्नाची सोडवणूक करण्याकरिता कोणताही उपाय सापडेना त्यावेळी मराठा सेनापतीशी चाललेले हे युद्ध शाहूच्या मध्यस्थीमार्फत शेवटास नेण्याच्या योजना तो आखू लागला. प्रथमत: ता. ९ मे १७०३ रोजी त्याने आपल्या कारकीर्दीत इतर अनेक हिंदू शासकांच्या वारसांनी मुसलमान धर्म स्वीकारला, तसाच तो शाहूनेही स्वीकारावा असा आग्रह (शाहूला) करण्याकरिता हमीदोद्दीनखानाला पाठविले. परंतु शाहूने धर्मांतर करण्याचे नाकारले.[५५]

या सर्व गोष्टीवरुन असे समजते की, शाहू महाराज यांना ता. ९ मे १७०३ मोहरम या दिवशी मुस्लीमधर्माची दिक्षा देण्याचे औरंगजेबाने ठरविले. ज्या छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वधर्मरक्षणासाठी एवढा खटाटोप केला व संभाजी राजे यांना धर्मरक्षणासाठी स्वत:च्या जीव द्यावा लागला. त्यांच्या प्रत्यक्ष मुलांवर एवढा मोठा दुर्धर प्रसंग ओढवलेला पाहून मराठे लोकांमध्ये अत्यंत दु:ख झाले.

शाहू राजे अतिशय निर्धाराने धर्मांतरास तयार झाले नाहीत, याचे कारण त्यांच्या वर शिवाजी महाराज व संभाजी महाराज यांचा संस्कार व प्रभाव होता. तसेच येसूबाईच्या सल्ल्याशिवाय झाली नसावी.

सेतू माधवराव पगडी म्हणतात, 'शाहूने धर्मांतर केले असते तर महाराष्ट्राचा संपूर्ण इतिहास बदलला असता. मराठ्यांनी त्यांची सत्ता मानली नसती. औरंगजेबाने त्याला जहागिरी देऊन नवाब केले असते. पुढील काळात पेशवे उदयाला आले, त्यांनी

मराठी राज्याचे अखिल भारतीय साम्राज्यांना रुपांतर केले या गोष्टी झाल्या नसत्या. शाहूच्या निर्धाराचा निकाल ही महाराष्ट्राच्या मागे आपल्याला जाणवते ते येसूबाईचे प्रखर व्यक्तिमत्व.''[५६]

शाहूला असा ठाम निर्णय घेण्याची शक्ती कोठून आली असावी? त्याचा विचार करता आपले लक्ष येसूबाईकडे जाते. मोगलांच्या छावणीतील सगळे वातावरण आणि संस्कार हे मुसलमानी धर्माला पोषक होते. बादशहाच्या सान्निध्यांत राहत असताना शाहूच्या संस्कारक्षम वयात त्याच्या मनावर धर्मांतराला अनुकूल असे परिणाम होणे काही अशक्य नव्हते पण असे घडले नाही. याला मोठे कारण म्हणजे शाहूवर येसूबाईची सतत नजर हेच होय. सतत १८ वर्षेपर्यंत शाहू हा मुगलांच्या निर्बंधात होता. या काळात त्याची आई येसूबाई ही त्याच्या मागे सतत सावलीसारखी वावरत होती. शाहूचे धर्मरक्षण येसूबाईने महाराष्ट्राच्या या जगदंबेने केले असेच म्हणावे लागेल.[५७]

या बाबतीत शाहू व येसूबाई यांनी बेगमेची करुणा भाकून तीस विनविले, ''बापास चार गोष्टी सांगून हा निश्चय सोडून देण्यांचे करा.' बेगमलाही त्यांची कीव आली. तिने सर्व मजकूर बापास कळवून त्यास त्या कृत्यापासून परावृत्त केले. बादशहाने विचार करुन जबाब दिला की, 'मी निश्चय केला तो मोडल्यास माझ्या शब्दाची किंमत जाते. बादशहाचा उच्चार लटका पडता कामा नये. जर एका शाहूच्या ऐवजी दुसरे दोन प्रसिद्ध पुरुष मुसलमान होत असतील तर मी शाहूपुरता आपला हुकूम मागे घेतो.' जिवावरचे शेपटीवर गेले असे समजून आपल्या बदली दुसरे दोन इसम कोण आणावे यावी विवंचना येसूबाईने चालविली.[५८] याच वेळेस त्याच्यासोबत असलेले दोन मराठी सरदार पुढे आले. धन्याच्या बचावासाठी खंडेराव व जगजीवन हे दोघे गुजरबंधू मुसलमान होण्यास कबूल झाले. ता. १६ मे रोजी मोहरमच्या मुहूर्तावर त्यांस मुसलमान करुन बादशहाने त्यांची नावे अब्दुर्रहीम व अब्दुर्रहमान अशी ठेविली. खंडोजीचा हा उपकार शाहू कधी विसरला नाही.[५९] औरंगजेबाने दुधाची तहान ताकावर भागवली! पुढे शाहू हे साताऱ्यास आल्यावर त्यांना सालगाव हे गाव इनाम दिले. परळी (सातारा) तेथे त्यांचे वंशज आजसुद्धा आहेत.[६०]म्हणजे शाहू महाराजांना उपकाराची जाण होती.

जदुनाथ सरकार अखबारांच्या आधारे लिहितात, "Rajaram's wife's brothers Khanderao and Jagjivan. When prisoners of war under aurangzeb were

induced to become Muhammadans with the names of Abdur Rahim and a. rahman in return of their liberation."[६१]

औरंगजेबाने आपले जुलमी कृत्य सोडले नव्हते. तो फक्त वरुन वरुन शाहूस खूष ठेवत होता. त्याने आपले खरे रूप दाखविले नव्हते. शाहूने नकार दिल्यानंतर तो आपला शब्द मोडत नाही म्हणून त्याने शाहूच्या बदल्यात दोन मराठी सरदारांना मुसलमान व्हावे लागेल असे सांगितले तेव्हा शाहूचे मामाच मुसलमान झाले. या सर्व गोष्टीवरुन शाहूस दु:ख झाले.

या बाबतीत शाहू महाराजांस असे वाटले की, थोरले महाराज व संभाजी महाराज आज गेले, राज्यही बुडाले. बेगम यांच्यायोगे येथे सुखी आहो. तरी बादशहा आम्हास मुसलमान करितो. अशी गोष्ट एक -दोन वेळा जाहली असता प्रतापजी गुजर यांचे चिरंजीव खंडेराव, राजाराम साहेब यांचा मेव्हना, आमचा मामा, आम्हाबद्दल मुसलमान जाहला. आम्हासही करणार परंतु बेगम यांनी वाचविले. काकासाहेब सोडवून नेतील अशी खातरजमा होती. आता ईश्वरांनी आम्हास निराश्रित केले. असा शोक संतापेकरुन महाराज यांस ज्वर प्राप्त जाहला. महिना पंधरा दिवस जाहले. बादशहासही वर्तमान कळले. तेव्हा बोलिले की, दुष्मान दाणा गेला. हिंदू गनीम काही असतील त्याजवर फौजा पाठवा. असा हुकूम की, हिंदू नाहिसा करा.[६२]

एकूण इतिहासकारांच्या म्हणण्यानुसार येसूबाईने आपल्या प्राचीन काळापासून सुरु असलेले संस्कार, तसेच पारंपरिक हिंदू संस्कारापासून शाहूराजांना दूर होऊ दिले नाही. ज्याप्रमाणे छ. शिवाजीमहाराज व छ. संभाजी महाराजांच्या मनात हिंदूत्वनिष्ठा सदैव जागृत होती तेच येसूबाईने शाहूच्या मनात हिंदूत्वनिष्ठा सदैव जागृत ठेवली आणि शाहू राजांचे धर्मांतर टळले ही मराठ्यांच्या इतिहासातील अत्यंत महत्त्वाची घटना मानली जाते. या सर्व गोष्टीचे सर्व श्रेय येसूबाईंकडे जाते.

शाहूचे धर्मांतर झाले नाही तरीसुद्धा बादशहा त्यांच्यावर बक्षिसाची कशी खैरात करतो ते अखबारातील नोंदीवरुन समजते, त्याचा सारांश:-

ता. १८ सप्टेंबर १७०३ - राजा शाहूस रत्नजडित अंगठी देण्यात आली.

ता. ४ ऑक्टोबर - राजा शाहूस पाचशे रुपये किंमतीचा एक रत्नजडित अलंकार देण्यात आला.

ता. ६ ऑगस्ट - बादशहाने आज्ञा केली की राजा शाहूसाठी तीनशे मोहरांच्या किंमतीचा घोडा काढून ठेवावा.

ता. ९ ऑगस्ट - शाहूस रेहकनबार (जेथे शस्त्रतळ आहे) त्याला कामबक्षाच्या डेऱ्यावर घेऊन जा आणि बादशहाची भेट घालून द्या. बादशहाने त्याला खिलतीची वस्त्रे आणि अलंकार दिले.

ता. १४ ऑगस्ट -शाहूच्या इस्टेटिला नासिर (सुपरिटेंडेंट) म्हणून ख्वाजा सेदल याची नेमणूक केली.

ता. १५ जानेवारी १७०४ - शाहूने बादशहास विनंती केली की, काही रत्ने व अलंकार देण्याची कृपा करावी. शाहूस एक हजार रुपये मंजूर झाले. नेवासा जहागिरीची मागणी केली ती मंजूर झाली.[६३]

काही इतिहासकारांचे म्हणणे आहे की, शाहू हा पूर्णपणे मोगली परंपरेनुसार वागत होते हे मत चुकीचे आहे, कारण तसे असते तर शाहू केव्हाच मोगलांचा सुभेदार झाला असता व त्याने धर्मांतर करुन घेतले असते. तसेच शिवदे म्हणतात की, बादशहा येसूबाईकडे दुर्लक्ष करीत असे मानतात व शाहू हा बादशहाच्या गुलालबारमध्ये ऐष आरामात राहतो व येसूबाई कर्जबाजारी झाले असे म्हणतात. हे सर्व चुकीचे आहे कारण जिथे शाहू राहत होते तेथेच येसूबाई राहात होत्या व शाहूंना त्याने जी परगणे दिली होती किंवा वतने दिली होती ते चालविण्याची जिम्मेदारी येसूबाईवर होती व त्यासाठी त्यांना येसूबाईला शिक्का सुद्धा करुन दिला होता. एकंदरीत जे येसूबाईचे हाल झाले होते तेच शाहू महाराजांचे झाले होते.

### २.५.२ छत्रपती शाहू महाराजांची लग्नेः-

शाहूचे वय विवाह योग्य झाल्यावर औरंगजेबाजवळ त्याच्या विवाहाची गोष्ट काढण्यात आली. या बाबतीत हेरवाडकर म्हणतात, ''शाहू महाराज वयस्क जाहले (तेव्हा) यांचे लग्न करावे असा बेगमेने अर्ज केला. तेव्हा बादशहानी उद्धव योगदेव, मोरोपंत सबनीस व जोत्याजी केसरकर यांस आज्ञा केली की, 'आमचे पदरी मातबर उमराव सरदार आहेत. यांत राजाचे शरीरसंबंधी पूर्वीपासून होत असतील त्यांच्या

कन्यापासून उत्तम देशा योजाव्या आणि लग्न करावे' म्हणून समारंभास खर्चास लक्ष रुपये देविले आणि तरतूद करावी असे सांगितले.''[६४]

सरदेसाई म्हणतात, ''१७०३ साली बादशहाने शाहूची दोन लग्ने केली. जोत्याजी केसरकर व मोरोपंत सबनीस यांनी बादशहाचे पदरी नोकरी करीत असलेल्या सरदारांच्या दोन मुली पसंत केल्या. रुस्तुमराव जाधवाचा नातू मानसिंग याची कन्या राजसबाई एक व दूसरी कण्हेरखेड सिद्यांकडील अंबिकाबाई. मार्गशीर्ष शु. २ शके १६२५ ता. २९ नोव्हेंबर स. १७०३ रोजी मानसिंग जाधवास आपली मुलगी आणण्याचा बादशहाचा हूकूम गेला तो विद्यमान आहे. यावरुन त्यावेळी लग्ने झाल्याचे निश्चित होते.[६५]

या संदर्भात मल्हारराव म्हणतो, ''यानंतर राजे (शाहू) यास दोन नवऱ्या करावयाच्या (त्या) पाहिल्या की नाही''. म्हणून बादशहाने कारभारी यास विचारले तेव्हा रुस्तुमराव जाधव यांची कन्या एक व शिंदे कण्हेरखेडकर यांची एक योजिली आहे असे समजाविले. त्यावरुन त्यासही खर्चास देऊन उत्तम प्रकारे समारंभ करवून मराठे यांचे चालीप्रमाणे लग्ने करविली. आपण जाऊन बसोन मेजवानी घेणे वगैरे केले. शिंदे यांचे कन्येचे नाव सावित्रीबाई ठेविले. जाधवराव यांचे कन्येचे नाव अंबिकाबाई ठेविले.[६६]

जदुनाथ सरकार लिखित अखबारात अशी माहिती आहे की, ता. १४ जून १७०४ राजा शाहू याचे लग्न बहादूरजी (जाधव)यांच्या मुलीशी ठरले. त्या निमित्त राजे शाहू यांस मदत म्हणून तेरा हजार रुपयांचे अलंकार देण्यात आले. बहादूरजी (जाधव) याने आपल्या मुलीच्या अंगावर दागिने घालावे म्हणून त्याला तेराशे रुपयांचे अलंकार देण्यात आले.[६७]

**तात्पर्य-**

औरंगजेबाचा शाहूवर धर्मांतर करण्याचा डाव व्यर्थ गेल्यानंतर त्याने शाहूचे लग्न करण्याचे ठरविले. त्यांनी जोत्याजी केसरकर व मोरोपंत सबनीस यांना उच्चप्रतीच्या मराठ्यांच्या मुली पाहण्याकरता सांगण्यात आले. रुस्तुमराव जाधव यांची कन्या अंबिकाबाई व कण्हेरखंडाचे शिंदे यांची कन्या सावित्रीबाई या दोन वधू नियोजित करुन त्यांचा विवाह समारंभ थाटात पार पाडला. तारखेच्या बाबतीत अजून एकमत झाले नाही.

अनेक इतिहासकारांनी मांडलेल्या तारखा वेगवेगळ्या आहेत. पण साधारण इ.स.१७०३-१७०४ च्या दरम्यान शाहूचे लग्न झाले असावे.

ता. १५ जून १७०४ काल (१४ जून) चौदा जून दिवस मावळला राजा शाहू हा स्वत:चे लग्न ठरल्यामुळे बादशहाच्या हुजूरात आला. त्याने बादशहाला मुजरा केला. बादशहाने त्याला मुंडावळीसाठी म्हणून हजार रुपये किंमतीचा माणकाचा शिरपेच, तेराशे रुपये किंमतीचा रत्नजडित कंबरपट्टा व खिलतीची वस्त्रे दिली. बादशहा म्हणाले, "दौलत खाण्यापासून (बादशहाच्या वास्तव्य स्थानापासून) बहादूरजीच्या तंबूपर्यंत नौबती वाजविण्यात याव्यात, राजा शाहू याच्या स्वारीसाठी छत्र असलेला लाल अंबारीचा हत्ती देण्यात यावा. वरातीमध्ये पुढील मंडळींनी राजा शाहू यांच्याबरोबर राहावे १ ) छावणीचा कोतवाल सर्रबराह खान, २) नगार खान्याचा अधिकारी मुहंमद अमीन, ३) फत्ते दौलत कौल, ४) फरासखान्याचा अधिकारी मुहंमर हारी, ५) खाजगीतील निरीक्षक खिदमतगारखान याचा नायब हाजी सुहेल, ६) वरातीबरोबर हमीदोद्दीनखानाची पथके राहावीत."[६८] असा आदेश बादशहाने दिला.

शाहू महाराजांचे लग्न झाल्यानंतर एके दिवशी बादशहाने नववधू पाहण्याची इच्छा प्रदर्शित केली. येसूबाईने बादशहाला सांगून पाठविले. परंतु त्याच्या इच्छेकरता वधूला पाठवणे भाग होते. मराठा कुळातील स्त्रिया नेहमी पडदा पोशीत असतात. दुसऱ्याच्या नजरेत पडने लांछन समजतात. तेव्हा येसूबाईने बेगमेच्या संमतीने शिंदे यांनी आपल्या मुलीबरोबर पाठविलेल्या एका दासीला दागदागिने घालून शाहू सोबत पाठवले, हीच दासी पुढे बिरुबाई म्हणून प्रसिद्धीस आली.[६९] आणि शाहू महाराजाची शेवटपर्यंत तिच्यावर मर्जी राहिली.

शाहू महाराज व बिरुबाई हे जेव्हा बादशहाच्या दरबारात जातात तेव्हा बादशहा त्यांना जवळ करुन पुढील उद्‌गार काढतात व आशीर्वाद देतात. "राजे! तुमचे वडील फौज धरुन आम्हांपाशी लढतात असे असोन कांही एक फितूर न करितां बहुत नेकीने चालता तिकडे लक्ष ठेवीत नाहीं. तुमचे राज्य तुम्ही बहुत दिवस उभयतां कराल." असे आशीर्वादात्मक बोलले आणि उभयतांस वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे देवून निरोप दिला. अक्कलकोट परगणा व इंदापूर, सुपें, बारामती व नेवासें असे पांच महाल साजक दुधास

म्हणून दिल्हे. दोन स्त्रिया केल्या. परंतु पादशहांनी बिरुबाई सहवर्तमान आशीर्वाद देऊन, उभयतांचे मस्तकी हात ठेऊन आशीर्वाद दिल्हेवरून तिजला खाजगीत ठेवून, उभयतांपेक्षा तिजवर कृपा करून ठेविले.''[७०] शाहू महाराजांचे औरंगजेबाने लग्न लावून दिले तेही मराठ्यांच्या सरदाराच्या मुलीशीच हे सर्वात महत्त्वाची गोष्ट होती. या मागे शाहूचा सन्मान करण्याचा एकच हेतू होता. तो म्हणजे त्याचे मार्फत धनाजी जाधवाशी बोलणी करणे होय व मराठ्यांमध्ये फुट पाडणे होते.

औरंगजेबाने परत दुसऱ्यांदा दुधाची तहान ताकावर भागविली कारण औरंगजेबाने संभाजीराजांच्या एका मुलीचे (दासीकन्या) विजापूरच्या शेवटचा कैदी बादशहा सिकंदर याचा मुलगा मोहीउद्दीन याच्याबरोबर लग्न लावून दिले, तसेच राजारामाच्या एका मुलीचे लग्न आगरखानाचा एक मुलगा शमशीरबेग याच्याबरोबर तर दुसऱ्या मुलीचे नेकनाथ (देवगडचा राजा) याच्याबरोर लग्न लावून दिले, अशी अखबारात नोंद आहे.

## २.६ छ. शाहू महाराजांवर पडलेला इतर मुत्सद्यांचा प्रभावः-

शाहू महाराजांवर लहानपणापासून अनेक मुत्सद्यांचा प्रभाव पडला होता. विशेष म्हणजे त्यांच्या वंशात महान असे लोक होते. कारण प्रत्येक व्यक्तीची जडण-घडण, तसेच त्याची बौद्धिक वाढ ही त्याच्या सभोवतालच्या परिस्थितीमुळे निर्माण होते. तसेच सभोवतालच्या व्यक्तींचे प्रभाव त्यांच्यावर पडतात. शाहू महाराजांवर सुद्धा अशाच काही व्यक्तींचे प्रभाव पडले आहेत.

### २.६.१ छत्रपती शिवाजी महाराजः-

छत्रपती शिवाजी महाराजांचाही छत्रपती शाहू यांच्यावर प्रभाव होता. आपल्या आजोबाप्रमाणे, धडाडी, युद्धकौशल्य गुणांची छ. शाहू यांच्यात उणीव असली तरी त्यांच्यात आजोबांप्रमाणे राज्य चालविण्यास लागणारे नेतृत्वगुण, मुत्सद्दीपणा, मनुष्याची पारख, सर्वांना घेऊन त्यांना राष्ट्रीय उद्योगास लावण्याची दृष्टी याची छाप दिसते. तसेच छ. शिवाजी महाराजांचा जो उद्देश मराठी सत्तेचा फैलाव चोहिकडे करणे व हिंदुपातशाहीचे रक्षण करणे याचा प्रभाव शाहू महाराजांवर पडला.

सरदेसाई गो. स. कर्नाटक मोहिमेच्या छ. शाहू यांच्या उद्देशाबद्दल लिहितात, ''...मराठी सत्तेचा फैलाव थेट दक्षिणेपर्यंत करणे व शिवाजी महाराजांनी रुजविलेली

हिंदुपदपातशाहीच्या बीजास खतपानी घालून वाढविले, हे मुख्य उद्देश सिद्धीस नेणे हे पवित्र कर्तव्य शाहूस वाटत होते. ऊगाच असंबंध गोष्टीने कोणतीही गोष्ट व्यवहारात घडत नसते.''[७१]

### २.६.२ छत्रपती संभाजी महाराजः-

छत्रपती शाहू यांच्यावर वडील छत्रपती संभाजी महाराजांच्या हिंदुधर्म अभिमानाचा प्रभाव होता हे दिसते. छ. शाहू यांनीही औरंगजेबाच्या कैदेत असताना बादशहाने त्यांनाही मुस्लिम बनविण्याचा प्रयत्न केला. परंतु आपल्या पित्याचा आदर्श समोर असल्याने छ. शाहूंनी तेवढाच करारी जबाब देऊन मुस्लिम बनण्यास नकार दिला. त्यावेळी त्यांचे वयही लहान होते. यातून त्यांच्यावर पित्याचीही छाप होती हे स्पष्ट दिसते.

बेन्द्रे म्हणतात, ''संभाजी राजांनी जशी आपल्या अगदी बालपणापासून कर्तव्यनिष्ठा जागृत राखली, स्वतःच्या कारकीर्दीत छत्रपतीचा राजधर्म श्रेष्ठ युद्धन्यायनीति -व्यवहारकौशल्याने जोपासला आणि आपल्या आचरणाने व सुखोपभोगांची पर्वा न करता गीतेच्या 'कर्मण्येवाधिकारस्ते' चा 'ज्वलज्जहाल' आदर्श आपल्या तरुण शूर सांगातीच्या समोर ठेवून त्यांच्यात आत्मसामर्थ्याची जीवंत जाणीव करुन दिली, तशीच त्यांनी मोगली सम्राटापुढे यत्किंचितही मान न तुकविता तीव्र निग्रहाने व कंटकवृत्तीने अमानुष हाल सोसतानादेखील अभिषिक्त राजाचा राजधर्म व हिंदवी स्वराज्यातील स्वधर्म, हेच आचार श्रेष्ठ मानून 'स्वधर्मे निधनं श्रेयः' ही शिकवण स्वतःच्या आचरणातून अद्वितीयपणे दाखविली आणि पूर्ण समाधानाने व स्थितप्रज्ञतेने शूरांचा स्वर्ग गाठला.''[७२] या सर्व गोष्टींचा प्रभाव शाहू महाराजांवर पडला त्यांचाच आदर्श घेऊन त्यांना शिजविलेले अन्न खाल्ले नाही व धर्मांतर करुन घेतले नाही.

### २.६.३ महाराणी येसुबाई :-

शाहू महाराजांवर सर्वात जास्त प्रभाव कुणाचा पडला असेल तर ते महाराणी येसुबाई यांचा, ज्यांनी शाहू महाराजांना जन्म दिला होता. मराठ्यांच्या इतिहासामध्ये महाराणी येसुबाईचे स्थान खूप महत्त्वाचे आहे. शिवप्रभूंची स्नुषा व संभाजी छत्रपतीची महाराणी अशा वैभवात राहणाऱ्या या स्त्रीस औरंगजेबाच्या कैदेत व औरंगजेबाच्या मृत्युनंतर दिल्लीत मोगलाच्या कैदेतच राहावे लागले. यातील १८ वर्षे शाहू व येसुबाई

एकत्र कैदेत होते. झुल्फिकारखानाने जेव्हा रायगडला वेढा घातला तेव्हा त्यांनी जो सल्ला दिला त्यावरुन त्यांच्यात किती स्वराज्यनिष्ठा होती हे दिसते व याचाच प्रभाव पुढे शाहूवर पडला. शाहूस शत्रूच्या छावणीतही स्वाभिमानी बाण्याने राहण्याचे सांगितले. तसेच जिद्द व अस्मिता, आशावाद या गोष्टी त्यांनी शिकविल्या. तसेच धर्मनिष्ठेपासून येसुबाईने शाहूस दूर जाऊ दिले नाही.

येसुबाईच्या जीवनाचा खोलवर विचार केला तर असे म्हणता येईल की, मराठ्यांच्या इतिहासात आपल्या सोशीक, सोज्वळ, सात्विक, धीरोदात्त व नि:स्वार्थी वागणुकीद्वारे हे मराठी राज्य पुन्हा उभे राहण्यासाठी अपूर्व त्यागाने जिने ३० वर्षे कारावास (कैद) स्वीकारली, कारावासातील वनवास सहन केला. त्या राणीचे स्थान जिजाऊसाहेब, ताराराणी यांच्या इतके खचितच उच्चतम आहे. साने गुरुजी आपल्या 'भारतीय नारी' या ग्रंथात म्हणतात, ''संभाजी राजांची पत्नी येसुबाई किती थोर आणि हिमतीची,' तात्पर्य, जिजाऊ ही प्रत्यक्ष सरस्वती, ताराराणी ही महिषाशुर मर्दिनी कालिका मर्दिनी तर येसुबाई ही चंदनासारखी झिजणारी शांत, संयमित शांता दुर्गाच.[७३] हे डॉ. शिवदेचे वाक्य यथायोग्य वाटते. या सर्व गोष्टीचा प्रभाव शाहूवर पडला होता, येसुबाईमुळेच शाहूने धर्मांतर केले नाही असे अनेक इतिहासकारांनी मांडले आहे.

### २.६.४ जोत्याजी केसरकर:-

जोत्याजी केसरकर हा छ. संभाजी राजा पासून त्यांच्याजवळ नोकरीत होता तो छ. संभाजी राजे यांचा स्वामीनिष्ठ सेवक म्हणून ओळखल्या जात होता. पुढे तो शाहू बरोबर सुद्धा होता याचाही शाहू महाराजांवर प्रभाव पडला होता.

बेन्द्रे म्हणतात, जोत्याजी केसरकर, करवीर प्रांती पुंजाळ गावचे पाटील, हे संभाजी महाराज यांजपाशी सेवा करुन इतबारी व कर्ते शाहाणे होते. शाहू महाराज बाळवय असता त्यांस खेळवणें, शिक्षा लावणे (याजकरिता) ठेविले होते. ते महाराजाबरोबर गेले होते. बेगमकडे जाणें, बोलणें व बादशहाकडे जाणे येणें वगैरे इतबारी कामांत तेच राहिले.[७४] यावरुन समजते की, जोत्याजी केसरकर हा शाहू महाराज लहान असल्यापासून त्यांच्या जवळ होता. शाहू महाराजांचे जेवढे थोडेफार शिक्षण झाले त्यास जोत्याजी केसरकरांचा प्रभाव (कारणीभूत) होता.

कैदेनंतर येसुबाई व शाहू महाराज यांचे पत्रव्यवहार तोच पाहत होता. शाहू महाराजांचे लग्न करण्यास त्यांचा पुढाकार होता. शाहू महाराजांनी त्यांना सरदेशमुखीच्या कारभारावर नेमले होते. औरंगजेबाचे किल्ले घेण्याच्या मोहिमेत शाहू महाराजांचे हाल होत असत. एकवेळ पावसात ज्योत्याजी केसरकराने तेलात काकडे भिजवून शाहूस भात शिजवून घातला.[७५]

शाहू महाराजांवर ज्याचा सर्वात मोठा प्रभाव पडला त्यामध्ये जोत्याजी केसरकर एक होते. येसुबाई व शाहूराजे कैदेत असताना जोत्याजी केसरकर व मदनसिंग या दोघांनी शाहू व बादशहा यांच्या मध्यस्थीचे काम केले.

### २.६.५ रायभानजी भोसले:-

शाहू महाराज जेव्हा कैदेमध्ये होते तेव्हा मुघलांना हवा होता, एखाद्या मराठ्यांशी बोलणी करण्यासाठी विश्वासू अशी दोन माणसे त्यांना दक्षिणेत सापडलेली दिसतात. त्यापैकी एक म्हणजे तंजावरचे राजे व्यंकोजी यांचा मुलगा रायभान भोसले हा होय. यांना मोगल छावणीत पाठविण्यात तामिळनाडूचा नायब फौजदार दाऊदखान पन्नी याने पुढाकार घेतला. रायभान भोसले हा शिवाजी महाराजांच्या घराण्यापैकी होता. त्यामुळे तडजोडीच्या बोलण्यात त्याचा उपयोग आपल्याला होईल असे मोगलांना वाटे.[७६]

मोगली चाकरीत आल्यानंतर रायभानजी भोसल्याच्या मध्यस्थीने मराठ्यांशी कामबक्षाची बोलणी सुरु झाली. या वाटाघाटीचे महत्त्व बादशहास इतके वाटत होते की, त्याने रायभानजीला एकदम सहा हजारी मनसबदार बनविले (ता.१० जुलै १७०३).[७७] तसेच त्याच्या अनुयायांना दोन वर्षासाठी कराची सुद्धा सुट दिली व इतरही सवलती रायभानला देण्यात आल्या.

शाहू राजांबरोबर सतत संपर्क ठेवण्यास रायभानला परवानगी देण्यात आली होती. पण बोलणे झाल्यानंतर परत शाहूस गुलालबारमध्ये जावे लागे. शाहूंची सुटका व्हावी याकरिता व मराठा सेनापतीनी मोगल बादशहाशी मैत्रीचा तह करावा याकरिता त्यांचे मन वळविण्याच्या आशेने त्याने रायभानला त्याच्याच हाताखाली नेमले. या सर्व गोष्टींमुळे रायभानजी भोसले यांचा प्रभाव शाहू महाराजावर पडला होता. शाहू

महाराजांना बाहेर जाण्यास परवानगी नव्हती. अशावेळी बाहेरची सर्व माहिती ही रायभानजीमुळे शाहूस समजत होती.

### २.६.६ झीनत उन्निसा (बादशाही बेगम):-

शिवाजी महाराज जेव्हा आग्रा भेटीला गेले होते तेव्हा त्यांना सन्मानाने वागवावे असे म्हणणाऱ्याचा जो पक्ष होता, त्यामध्ये बेगम झीनत उन्निसा मुख्य होती. तसेच पुढे संभाजीराजाला कैद केले व त्यांना औरंगजेबाने हाल-हाल करून मारण्यास सांगितले, तेव्हा तिने संभाजीराजांना वाचविण्यासाठी खूप प्रयत्न केले. पुढे शाहू महाराज कैदेत आले तेव्हा तिने खूप ममतेने सांभाळ केला होता.

औरंगजेबाच्या या मुलीने येसुबाई व शाहू तसेच इतर मंडळीचा परामर्ष घेतला. तिचे नाव झीनतउन्निसा उर्फ पातशाहा बेगम असे असून तिचा जन्म ता. ५-१०-१६४३ रोजी औरंगाबाद येथे झाला. ती अविवाहित होती. छ. शिवाजी महाराज आग्रा येथे गेले होते तेव्हा ती तेथेच होती. संभाजीच्या वधाच्यावेळी ती कोरेगाव येथे बादशहाजवळ होती. बापाची तिच्यावर मर्जी असून तिचा स्वभावही परोपकारी असल्यामुळे शाहू व येसुबाई यांना तिचा पुष्कळ उपयोग झाला. निदान त्यांच्यावर एखादा दुर्धर प्रसंग ओढवला नाही, याचे श्रेय या बेगमेस आहे. शाहू व येसुबाई छावणीत दाखल झाल्यावर त्यास तिने ममतेने वागविले, काही उणें पडू दिले नाही. दागदागिना, कपडालत्ता, मेवा-मिठाई जे काही त्यास लागेल ते सर्व ती हौसेने पुरवित असे. संभाजीच्या नाटकशाळा व दासीपुत्र यांची निगा सुद्धा तिने यथायोग्य ठेविली.[७८]

औरंगजेबाच्या दक्षिण मोहिमेत ती बादशहाबरोबर २५ वर्षे म्हणजे बापाच्या मृत्यूपर्यंत राहिली. येसुबाईंना व शाहू राजांना तिने आपल्या धर्मशील, उदार व प्रेमळ स्वभावाने साथ दिली. शाहूची सुटका करण्यात तिचे मोठे योगदान होते, तर दिल्लीच्या कैदेत येसुबाईना तिने अतिशय प्रेमळपणाने जपले होते. शाहूच्या धर्मांतराबाबत औरंगजेबाचे तिने मन वळविले. तिचा मृत्यू ता. ७ मे १७२१ रोजी झाला. दिल्लीत झीनत-उल-मशिदीत तिचे दफन करण्यात आले.[७९]

शाहू हा १८ वर्षे कैदेत असल्यामुळे बेगमेचा सर्वात जास्त व महत्त्वाचा प्रभाव शाहूंवर पडला होता. पुढे छत्रपती शाहू महाराजांनी बेगमेच्या स्मरणार्थ साताऱ्याला बेगम

मशीद नावाची मशीद बांधली. याबाबतीत बखरकारांनी म्हटले आहे की, संभाजीराजांबद्दल झीनतच्या मनात आसक्ती होती असे म्हटले आहे आणि त्यामुळे शाहू हा आपलाच मुलगा आहे असे समजून तिने त्याला ममतेने वागविले.

औरंगजेबावर सर्वात जास्त प्रभाव झीनत उन्निसा हीचाच होता व झीनत बेगमच्या प्रभावामुळेच औरंगजेबाने शाहू व येसुबाई यांना उपद्रव पोहोचविला नाही हे सत्य आहे व या बेगमेचा शाहूवर प्रभाव पडला होता.

### २.६.७ झुल्फिकारखान उर्फ एतिकादखान:-

औरंगजेब दक्षिण भारतात आला तेव्हा त्याच्या सोबत अनेक सरदार आले होते. त्यामध्ये औरंगजेबाचा वजीर आसदखान याचा मुलगा एतिकादखान एक होता. मोगल-मराठा युद्धात मोगलांच्या बाजूने सर्वात प्रकर्षाने कोणता सेनानी चमकला असेल तर तो एतिकादखान. याला औरंगजेबाने रायगडचा पाडाव करण्यास सांगितले. रायगडचा पाडाव झाला तेव्हा बादशहाने एतिकादखानचा गौरव केला आणि ता.३ नोव्हेंबर १९८९ रोजी झुल्फिकारखान ही पदवी व खिल्लत दिली.

रायगडचा पाडाव झाला तेव्हापासून ते शाहू सुटेपर्यंत झुल्फिकारखानाचा प्रभाव शाहूवर पडला होता. प्रत्येक चांगल्या वाईट गोष्टी शाहूमहाराजांवर घडल्या त्यावेळेस झुल्फिकारखान सोबत होता. इ.स. १७०३ च्या ऑक्टोबर महिन्यात झुल्फिकारखान हा येऊन बादशहाला भेटला. औरंगजेबाच्या आज्ञेवरुन ता. ७ ऑक्टोबर रोजी शाहूराजे यांनी झुल्फिकारखानाची भेट घेतली. या सुमारास मराठ्यांनी औरंगाबाद प्रांतात पुन्हा हालचाली सुरु केल्या त्यामुळे झुल्फिकारखानाला घाईघाईने औरंगाबादकडे निघून जावे लागले. या भेटीनंतरच झुल्फिकारखानाला शाहूराजांच्या बद्दल थोडी अधिक आस्था वाटू लागली असावी. शाहूराजे आपल्या बरोबर असल्यास आपले बरेच प्रश्न सुटतील असे झुल्फिकारखानाला वाटू लागले. बादशहापासून शाहूला वेगळे करुन आपल्याकडे घ्यावे या दृष्टीने त्याची पावले पडू लागली. सिंहगडच्या वेढयासाठी शाहू आपल्या बरोबर हवा तरच सिंहगड आपल्या हाती लवकर पडेल असे निमित्त सांगून झुल्फिकारखानाने शाहूला बादशहाकडून मागून घेतले. बादशहाने शाहूला तोपर्यंत आपल्या खास देखरेखीखाली निर्बंधात ठेवले होते. पण झुल्फिकारखानाच्या मागणीला त्यांना नकार देता येईना. त्यामुळे इ.स.१७०६ पासून शाहूराजे हे बादशाही छावणी सोडून झुल्फिकारखानबरोबर

राहिले.[८०] शाहूराजे औरंगजेबाच्या शेवटच्या काळात औरंगजेबासोबत नव्हते तर ते झुल्फिकारखान सोबत होते, असे दिसते.

झुल्फिकरखानाच्या मनात शाहूबद्दल आदर होता. शाहूस त्याने चांगली वागणूक दिली होती. शाहूची सुटका ही झुल्फिकारखानाच्या मध्यस्थीने झाली होती. झुल्फिकारखानानेच शहाजहा आज्जमचे मन वळवून शाहूची सुटका करण्यास सांगितले होते.

## २.७ औरंगजेबापुढे शाहूचा प्रश्न व औरंगजेबाचा मृत्यू:-

औरंगजेबाचे दक्षिण भारतात आगमन झाल्यानंतर आपण मराठ्यांना तसेच इतर राज्यांना जिंकून लवकर जाऊ असे वाटले पण ते सर्व डाव यशस्वी होऊ शकले नाही. मराठ्यांना लष्करी मोहिमांनी जिंकणे अशक्य आहे, हे बादशहाला पुरेपूर कळले होते. संभाजीचा वध झाला तेव्हा असे वाटले की, आपण लवकरच मराठ्यांचे राज्य जिंकू शकू. राजाराम महाराजांच्या कारकिर्दीत मराठी लष्कराच्या हालचाली फक्त महाराष्ट्रापुरत्याच होत्या. पण ताराबाईच्या कालखंडात त्या कारवाया महाराष्ट्राच्या बाहेर वाढल्या होत्या उदा. गुजरात, माळवा, तेलंगणा व कर्नाटक या प्रदेशात मराठ्यांच्या कारवाया वाढल्या होत्या.

औरंगजेबाला असे वाटू लागले की, मराठ्यांशी वाटाघाटी करुन त्यांच्याशी तह करता आला तर त्याच्या डोळयांसमोर मोगली साम्राज्याची होणारी वाताहत थांबेल. या वाटाघाटीत त्यांच्या कैदेत असणारे शाहू राजे म्हणजे त्याच्या हातात असणारा हुकमी डाव होता. त्यांचा उपयोग तो आपली वाटाघाटीमधील शक्ती वाढविण्यासाठी करु इच्छित होता.[८१] एकंदरीत औरंगजेब शाहू महाराजाचा उपयोग एखाद्या मोहराप्रमाणे करणार होते.

बादशहापुढे शाहूचे काय करायचे असा प्रश्न होता. तेव्हा त्याने काही पर्याय योजले होते. पर्याय पहिला, शाहूला ठार मारुन त्यांचे प्रकरण निकालात काढणे, पण हा पर्याय योग्य नव्हता, कारण संभाजी महाराजांचा वध करुन बादशहाला जास्त फायदा झाला नाही उलट नुकसान झाले होते. कारण संभाजीच्या वधाने चिडून जाऊन मराठ्यांनी बादशहाला जास्तच हैराण केले होते. मराठ्यांमध्ये दुही निर्माण करता येईल हा दृष्टिकोन समोर ठेऊन बादशहाने शाहूला जीवंत ठेवण्याचे ठरविले.

शाहू राजांना मराठ्यांचा छत्रपती म्हणून मान्यता देणे व त्यांची मुक्तता करणे हा पर्याय औरंगजेबाला पटणारा नव्हता. कारण औरंगजेबाला मराठ्यांचे राज्य संपवयाचे होते. पुढला पर्याय म्हणजे शाहू राजांना मुसलमान बनविणे पण तोही पर्याय अपयशी गेला. तेव्हा आता त्यांना शाहू राजांच्या सहाय्याने मराठ्यांशी वाटाघाटी करुन तह करणे हा पर्याय राहिला होता.

राजपुत्र कामबक्ष याच्या मध्यस्तीने प्रमुख मराठा सेनापतीशी शाहूची सुटका कोणत्या अटींवर करावयाची याच्या वाटाघाटी करावयाच्या आणि तशा त्यांच्याशी तह करावयाचा असा बादशहाचा बेत होता. मराठा नेत्यांशी भेटीगाठी घेऊन त्याचे मन वळविण्यासाठी म्हणून रायभान भोसले यांचा उपयोग करुन घेण्याचे ठरविले. परंतु याही योजनेला अपयश आले.[८२]

याबाबत पगडी अशी माहिती देतात की, ''रायभानजीच्या मध्यस्थीने कामबक्ष व मराठ्यांशी बोलणी व्हावी यासाठी बादशहाने शाहू राजांना नजरकैदेतून काढून त्यांना अलंकार व सोनेरी साज असलेला घोडा देऊन त्यांचा सन्मान केला आणि त्यास कामबक्षाच्या हवाली केले. कामबक्षानेही त्यांना खिलतीची वस्त्रे दिली.''[८३] शाहू राजांचा तंबू हा बादशहाच्या निवासस्थानाजवळ असे, आता तो तेथून हलवून शहाजाद्याच्या निवासस्थानाजवळ नेण्यात आला. असे सर्व करण्यात बादशहाला हे दाखवायचे होते की, त्याला खरोखरच शाहूराजांची सुटका करुन मराठ्यांशी तह करावयाचा आहे. मराठ्यांचे वकील येऊन शाहूस बादशहाच्या छावणीत भेटतील असे त्याला वाटत होते. कामबक्ष आपले वकील अनेक वेळा धनाजी जाधवाकडे पाठवित होता. परंतु ताराबाई, सेनापती व इतर सरदार बादशहाशी वाटाघाटी करुन तह करण्यास तयार नव्हते. तेव्हा मराठ्यांशी तह होणे शक्य नाही, हे समजून चुकल्यावर बादशहाने पुन्हा शाहू राजाना नजरकैदेत ठेवले.

खाफीखान या तहाच्या बाबतीत माहिती देतो की, ''कामबक्ष आणि शाहू यांनी बादशाही छावणीपासून चारपाच कोसावर मराठी सरदारांना भेटावे. त्यानुसार सत्तर मराठी सरदारांच्या नावे पत्रे तयार करण्याची बादशहाने आज्ञाही केली. परंतु नंतर त्याचा निर्णय बदलला. चाळीस-पन्नास हजारांच्या फौजेनिशी मराठे बादशाही छावणीजवळ येतील

आणि विश्वासघाताने ते शाहू व शहाजादा यांना पळवून नेतील, अशी भीती त्याला वाटू लागली. म्हणून त्यानेच वाटाघाटी मोडून टाकल्या.''[८४] म्हणजेच औरंगजेबाने शाहू महाराजांमार्फत तह करण्याचे ठरविले पण ते होऊ शकले नाही.

अशी एक-दोन वर्षे गेली. बादशहा अहमदनगरच्या मुक्कामास आल्यावर, शाहूस सोडण्याचा आणखी एक प्रयत्न त्याने केला. त्याची हकीकत अशी, सगळे उपाय हरल्यावर शेवटचा उपाय म्हणून औरंगजेबाने विजापूर, कर्नाटक वगैरे प्रांताचे राज्य मुलगा कामबक्षच्या हवाली करुन आपण दिल्लीस निघून जाणार असे त्याने जाहिर केले. शाहूस त्याने मोकळा केले, त्यास पोशाख व सप्तहजारी मनसब दिली आणि कामबक्षाचे आज्ञेत वागून दक्षिणचे राज्य करीत जा. असा त्यास हुकूम केला. त्यासाठी काही प्रांत बादशहाने त्यास तोडून दिले आणि काही प्रांतावर चौथाई वसूल करण्याचाही हक्क त्यास दिला. शाहूंचा तंबू बादशहाच्या आवारात असत. ता. ६ फेब्रुवारी १७०६ रोजी झुल्फिकारखानाच्या छावणीशेजारी शाहूस स्वतंत्र मुक्काम देऊन तेथे त्यास राहण्यास पाठविले आणि मराठे सरदारांनी येऊन शाहूला मिळावे; असा पुकारा केला. पण युक्तीस कोणीच फसले नाहीत आणि शाहूकडे कोणी आले नाही. शाहू मोकळा झाला होता. परंतु त्याजवर नजर ठेवण्यास झुल्फिकारखानास आतून ताकीद होती.[८५] शाहू महाराजांना तो पूर्णपणे सोडण्यास तयार नव्हता तर त्याचा फायदा औरंगजेबाने घेण्याचे ठरविले होते, पण त्याचे सर्व प्रयत्न अयशस्वी झाले.

सिंहगड जिंकून घेण्यासाठी शाहूचा आधार घेण्याचे ठरविले. त्याचप्रमाणे त्याने शाहूस झुल्फिकारखानाबरोबर सिंहगड घेण्यास पाठविले. याबाबतीत शकावलीमध्ये नोंद अशी- ''माघ वद्य प्रतिपदेस (ता. १८ जाने. १७०६) नवाब झुल्फिकारखानास समागमे राजश्री शाहू राजे जाळीतून काढून दिले आणि कोंडाणी घ्यावयास रवाना केले.''[८६]

बादशहाची पुढे-पुढे व्यथा सुप्त झाली. त्यातच तो आजारी पडू लागला. या वेळेस शाहूबद्दल बेगम यांना वाईट वाटले. तेव्हा ती बादशहापाशी गेली. बादशहाचे वाईट वाटण्याचे कारण काय? असे विचारले तेव्हा बेगम म्हणाली, दोन गोष्टीसाठी एक म्हणजे माझे वडील मृत्यूजवळ आहेत आणि दुसरे म्हणजे माझा पुत्र बंदी वासात त्यासाठी मला वाईट वाटते. तेव्हा बादशहा म्हणाला, ''आम्हासाठी तुम्ही कष्टी न व्हावे. शतवर्षे

वांचले असताही मृत्यू आहेच. पुत्रासाठी श्रमी होता तरि हा तुझा पुत्र पुन:शिवाजी उत्पन्न झाला आहे. शिवाजी व आम्ही बदरिकाश्रमी राज्य इच्छा धरुन तप केले. आमची तपश्चर्या अति उग्र, तापसी, त्यायोगे म्लेच्छ जाहलो. ह्याधर्माची स्थापना करावी हा नियम आमचा, शिवाजीची सात्विक तपश्चर्या म्हणोन हिंदू धर्मात जन्म होऊन हिंदूची स्थापना करावी हा नेम त्याचा. आयुर्दय कमी होऊन तोच शिवाजी हा तुझा पुत्र जन्मला. याचा झेंडा दिल्लीस लागेल. माझे पुत्र याचे आश्रयाने चालतील. असा तुझा पुत्र आहे. श्रमी व्हावयाचे कारण नाही. आज पंचवीस वर्षे हिंदू मोडीत असता मोडत नाहीत. याचे कारण हें.'' यावरुन बेगम यांनी विनंती केली की, ''ह्या गुढ गोष्टी तुमचे तुम्ही जाणे. मनुष्य लोकांत व्यवहार रीतीने आपण सार्वभौम दिल्लीपती. तुमचे राज्यांत मराठे गनीम म्हणवितात. सांप्रत कैदेत आहेत. आपल्या मागे यांनी सार्वभौमत्व जरी केले, तरी पादशाहीत गनीम म्हणविलीत याची वाट काय?'' त्यावरुन बादशहा बोलविले की, ''दक्षिणेस साडेसहा सुभे यांत यांचा घोडा गनीम न म्हणता फिरावा, असे करुन देतों. माझे तिघे पुत्र, तू कन्या चौथी. चौथाई तुझे हिश्श्यांची तुझ्या पुत्रास दिली.'' ''माझे पुत्रास वतन नाही.'' म्हटल्यावरुन साडेसहा सुभ्यांमध्ये सरदेशमुखी वतने दर शेंकडा रुपये साडेबाराप्रमाणे (१२।।) सनदा करुन, त्या सनदेचे माथा आपले पंजे असल्याचे उठवून, शाहू महाराजांस बोलावून आणून मुदबकांतून सगही भाकर आणविली. तो पादशहाजादी हिने आडवी होऊन सगळी भाकर दिली असता माझ्या मुलाची वाट काय? म्हणोन अर्धी ठेवून अर्धी दिली ती सनदा शाहू महाराज यांच्या ओट्यात घालून, मस्तकी हस्त ठेवून बहुत दिवस राज्य करशील असा आशीर्वाद दिला. बेगम यांस सांगितले की, ''यास मुत केलेस आमच्या नेमास अंतर पडेल. आमच्या मागे सोडा.'' असे सांगितले.[८७]

औरंगजेबाने आपल्या मृत्यूपर्वी शाहू महाराजास सनदा दिल्या होत्या असे दिसते. अहमदनगरी बादशहा आपल्या मृत्यूपूर्वीचे दिवस मोजीत होता.

### २.७.१ औरंगजेबाचा मृत्यू (ता. २० फेब्रुवारी १७०७):-

इ.स. १७०७ औरंगजेबाच्या आयुष्याची ८८ वर्षे पूर्ण झाली होती. त्यापैकी २६ वर्षे शिवाजी महाराज, संभाजी महाराज, राजाराम महाराज, ताराबाई यांच्याशी म्हणजेच मराठ्यांशी झगडण्यात गेली. त्याने मराठ्यांचे किल्ले जिंकून घेण्यास जिवापाड मेहनत

घेतली. तेच किल्ले मराठ्यांनी परत जिंकून घेताना त्यास पाहावे लागले. मराठे दक्षिणभर तर पसरले होतेच आता ते गुजरात आणि माळवा या प्रांतावर धाडशी आक्रमणे करु लागले होते. मोगलांचा राज्यकारभार मोडकळीस आला होता. आपल्या डोळ्यासमोर रक्तपात होऊ नये म्हणून त्याने कामबक्ष याची विजापूरच्या सुभ्यावर नेमणूक केली होती.

पगडी म्हणतात, "ता. ९ फेब्रुवारी १७०७ रोजी बादशहा छावणीतून विजापुरी जाण्यास रवाना झाला. नंतर ६ दिवसांनी १३ फेब्रुवारीस शहाजादा अज्जम याची माळव्याच्या सुभेदारीवर रवानगी करण्यात आली. यानंतर ४ दिवसांनी औरंगजेब आजारी पडला. तीन दिवसांच्या आजारानंतर ता. २० फेब्रुवारी १७०७ रोजी त्यांचा मृत्यू झाला."[८८]

जयसिंगराव पवार म्हणतात, महंमद आज्जमचा बादशहाने १३ फेब्रुवारी रोजी माळव्याच्या सुभेदारीवर पाठविले. लवकरच बादशहाची प्रकृती पुन्हा ढासळली. तापाने तो फणफणू लागला. अशा अवस्थेतही तो नमाज वगैरे धार्मिक कृत्ये नेमाने करीत होता. शेवटी शरीराने त्यांना दगा दिला. ता. २० फेब्रुवारी १७०७ रोजी या नश्वर जगातून तो निघून गेला.[८९]

सरदेसाई म्हणतात, "औरंगजेब बादशहा ता. २० फेब्रुवारी स. १७०७ रोजी अहमदनगर येथे मरण पावला, त्यावेळी शाहूचा मुक्काम तेथे मातुश्रीस होता."[९०]

वरील इतिहासकारांच्या म्हणण्यानुसार औरंगजेबाचा मृत्यू ता.२० फेब्रुवारी १७०७ रोजी अहमदनगर येथे झाला, त्यावेळेस येसूबाई व शाहू हे त्यांच्याजवळ होते.

### २.८ छत्रपती शाहू महाराजाची सुटकाः-

ता. २० फेब्रुवारी १७०७ रोजी औरंगजेब मरण पावताच हळूहळू त्याच्या साम्राज्याला उतरती कळा लागली. औरंगजेबाच्या मृत्यूच्या वेळी शाहू महाराज व येसूबाई अहमदनगरलाच होते. औरंगजेब या कर्तृत्ववान व महत्वाकांक्षी सम्राटाने केवळ धार्मिक दुराग्रहाने मोगल साम्राज्याचा नाश करुन घेतला. त्याच्या पश्चात बहादूरशहा, आजमशहा व कामबक्ष या त्यांच्या पुत्रांत सत्तेसाठी लढाई व झगडे सुरु झाले.

औरंगजेबाने बेगमेस सांगितले होते की, माझ्या मृत्यूनंतर शाहूस सोडून देणे, पण आजमशहा पुढे प्रश्न होता की शाहूचे करायचे काय?

कानेटकर म्हणतात, शाहू मुसलमानी संस्काराखाली घडवण्यात बादशहाचा उद्देश अगदी स्पष्ट होता. मराठ्यांचा राजा हा बादशहाचा मांडलिक आणि सुभेदार म्हणून मराठी मुलखात रहावा आणि दक्षिणेत त्याने मोगलांचा प्रतिनिधी म्हणून राज्य करावे अशी त्याची मनापासून इच्छा होती आणि शाहूने ती इमाने इतबारे पूर्ण केली. 'औरंगजेबाचा बंदा' म्हणून शाहूने छत्रपती झाल्यावरही राज्यकारभार केला.[११] हे वसंत कानेटकरचे मत मला चुकीचे वाटते कारण तसे असले असते तर शाहू महाराजाने तेव्हाच धर्मांतर केले असते आणि तसेच ते शिजविलेले अन्न खाल्ले असते. ज्या माणसाचे उमेदीचे आयुष्य हे मोगल दरबारामध्ये १८ वर्षे जातात, तेव्हा थोडाफार तरी प्रभाव असतोच. तेव्हा शाहू महाराज हे औरंगजेबाचा बंदा होता हे म्हणने चुकीचे आहे.

औरंगजेब बादशहाच्या मृत्यूची बातमी माळव्याच्या सुभेदारीवर रवाना झालेल्या त्याच्या मुलास, आझमशहास समजली. त्याने स्वत:ला बादशहा म्हणून जाहीर केले. आपला भाऊ शहाआलम याचा विरोध मोडून काढल्याखेरीज आपल्याला दिल्लीचे तख्त मिळणार नाही याची आझमशहाला खात्री होती. म्हणून मराठ्यांबरोबर सुरु असलेला लढा बंद करुन तो दिल्लीकडे निघाला. संभाजीचा मुलगा शाहू व येसूबाई अद्यापि मुघलांच्या कैदेतच होती. दिल्लीच्या रोखाने जात असताना वाटेत भोपाळ जवळील दोराहा मुक्कामी सरदार झुल्फिकारखान आणि काही मुत्सद्यांच्या सल्ल्यानुसार आझमशहाने शाहूची ता. ८ मे १७०७ रोजी बंदिवासातून मुक्तता केली. शाहूच्या सुटकेनंतर मराठी राज्याच्या वारसदाराच्या प्रश्नावरुन राणी ताराबाई व शाहू हे दोन विरुद्ध पक्ष तयार होतील. या दोन पक्षांमध्ये संघर्ष होऊन त्याची परिणती शेवटी यादवी युद्धात होईल आणि तेणे करुन मराठयांची शक्ती त्यातच खच्ची होऊन मराठी सत्ता कमकुवत बनेल ही झुल्फिकाराची अटकळ होती. आझमशहाने जरी शाहूची सुटका केली तरी पण राणी येसूबाईस मात्र कैदेतेच ठेवले.[१२]

डॉ. खोबरेकर म्हणतात, औरंगजेबाच्या मृत्यूनंतर शहाजादा आज्जम हा तडक अहमदनगरला आला. त्याने स्वत:ला बादशहा म्हणून जाहीर केले आणि सगळे सैन्य बरोबर घेऊन तो उत्तरेकडे रवाना झाला. हंडीयापाशी आज्जमने नदी ओलांडली आणि तो दोराहाच्या सरहद्दीत दाखल झाला. छत्रपती शिवाजीचा नातू शाहू राजाबरोबर

झुल्फिकारखानाचे घनिष्ठ संबंध होते. पूर्वीपासून तो शाहूच्या सर्व कारभारांकडे आस्थापूर्वक लक्ष देत असे. झुल्फिकारखानाने आज्जमशहाला विनंती करुन शाहू व त्यांचे सोबती यांना मुक्त करविले (ता. ८ मे १७०७).[९३]

कृष्णाजी पुरंदरे म्हणतात, औरंगजेबाच्या मृत्यूनंतर आज्जमशहा तख्तावर बसला तो नबाब झुल्फिकारखानाच्या मदतीने आणि जुल्फिकारखान तर मराठ्यांचे मर्म जाणण्यांत अग्रगण्य होता. तेव्हा त्याने आज्जमशहास नर्मदेवर गेल्यावर सल्ला दिला की, ''आपल्या हिताच्या अटीवर राजा शाहूची सूटका करावी म्हणजे काही काळ मोगली साम्राज्य टिकू शकेल.'' हे म्हणणे आज्जमशहास पटून त्याने शाहू व त्याच्या बरोबरीचे काही लोक सोडून दिले. हा त्याच्या मुक्ततेचा नक्की दिवस मिळत नाही. शाहूस सोडले तरी माता येसूबाई व इतर मंडळी मदनसिंग वगैरे त्यांची सुटका केली नाही.[९४]

औरंगजेबाच्या मृत्यूनंतरच आग्राकडे राजपुत्र आझम कुच करीत असताना शाहू मोगलांच्या छावणीतून निसटला आणि तो दक्षिणेकडे गेला. परंतु याकडे आज्जमने जाणून बुजून दुर्लक्ष केले.[९५]

औरंगजेबाच्या मृत्युनंतर इकडे शाहू महाराज यास महमदबहादर (अजमशहा) शाहजादे यांनी दिल्लीस जातांना नर्मदेवरुन पळून गेले अशा तऱ्हेने बहाणा करुन, सनदा देऊन, मातोश्रीस ओलीस ठेवून, उभयंता स्त्रिया घेऊन, ते देशी आले.[९६]

आज्जमशहा दक्षिणेतून दिल्लीकडे जात असताना वाटेत शाहू महाराजांची सुटका झाली. परंतु त्यांना बादशहाकडून सामान्य ताबेदारी पलीकडे विशिष्ट लेखी करार अथवा आश्वासन काही मिळविले नव्हते.[९७]

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर लवकरच त्याचा मुलगा आज्जमशहा याने झुल्फिकारखानाच्या सल्ल्यावरून शाहूला बंधनमुक्त केले आणि असे करताना आश्वासन दिले की, जर मराठा पुढाऱ्यांनी शाहूला आपला राजा मानले तर त्याच्या आजोबाने विजापूरपासून जिंकलेला 'स्वराज्य' नावाचा प्रदेश त्याला परत केला जाईल, शिवाय भीमा, गोदावरी यांच्या दरम्यान जादा जहागिरी ही मिळेल.[९८]

प्रा. जयसिंगराव पवार म्हणतात, शहाजादा कामबक्षास बादशहाच्या मृत्यूची बातमी समजताच त्याने विजापूरच्या किल्ल्याचा आश्रय घेतला व आपल्या संरक्षणाची

तजवीज चालविली. तिकडे पेशावर मुक्कामी बादशहाचा वडील पुत्र शहाजादा मुअज्जम हा वास्तव्य करून होता. तोही बादशाही सिंहासन प्राप्त करण्यासाठी फौज घेऊन निघाला. शहजादा आज्जमने शहजादा मुअज्जमचा नाश करण्यासाठी मोठ्या फौजेनिशी उत्तरेकडे कूच केले. या फौजेबरोबर शाहू राजे व येसूबाई यांनाही जावे लागले. फौज जसजशी उत्तरेकडे सरकू लागली तसतसे शाहू राजांचे मन त्यांच्या सुटकेविषयी चिंतातूर होऊ लागले. शेवटी माळव्यात भोपाळ जवळ शहादाजा आज्जमची छावणी पडली असता झुल्फिकारखानाच्या मध्यस्तीने शाहू राजांची सुटका होऊ शकली. (ता. ८ मे १७०७).

झीनत उन्निसाबेगम भावाबरोबर वाट चालत होती. त्यांच्या मार्फत शाहूने आपल्या सुटकेची खटपट चालविली. आज्जमशहाची इच्छा त्यास सोडण्याची नव्हती. वडील बंधूचा पाडाव करण्यात तो गर्क असून त्या उद्योगास मराठ्यांनी दक्षिणेतून अडथळा करू नये अशी तजवीज त्याने ठेविली. ता. १३ मार्च रोजी बऱ्हाणपुरच्या मुक्कामावर झुल्फिकारखानाने आज्जमशहाशी शाहूची भेट करविली. शहाने त्यास पोशाख दिला. शाहूच्या सुटकेचा हा उपक्रम होता. पुढे शाहू तसाच लष्कराबरोबर प्रवास करीत पुढे गेला. राजपुतांनी व इतरांनी शहास गळ घातली की शाहूस सोडावे, पण हातातला डाव सोडण्याची बुद्धी त्यास झाली नाही. होता होता नर्मदा पार होऊन शहाचा मुक्काम ता. ४ मे रोजी सिरोजेस झाला. उत्तरोत्तर शाहूंचे चित्त अधीर व चिंतातूर होऊ लागले.

सरदेसाई म्हणतात, भोपाळच्या वाव्यवेस वीस मैलांवर दोराहा गांवी मुक्काम असता शाहूने दक्षिणेची वाट धरिली. शाहू छावणींतून पळून गेला असे मुसलमान लेखक सांगतात, तर शहाशी करार बोलण्यांत येऊन शाहू परत निघाला असे मराठी लेखक सांगतात. तो करार असा, "शाहूने बादशाही ताबेदारीत राहून दक्षिणेचे राज्य साध्य करावे, प्रसंग पडेल तेव्हा बादशहाची कुमक व सेवा करावी, मातुश्री वगैरे कबिले व मदनसिंग ओलीसदाखल बादशहाचे ताबीत ठेवले. चौथाई, सरदेशमुखीचे हक्क दक्षिणेच्या सहा सुभ्यांतून वसूल करावे, त्यांच्या सनदा मागाहून तयार करून पाठविण्यांत येतील. तुर्त दोनशे स्वार रांगडे बरोबर घेऊन जावे." करार ठरत असताच बेगमेने शाहूला प्रेमाचा निरोप दिला. किंबहुना तिनेच भर देऊन त्यास निघण्याची त्वरा करविली. पण शहाने रीतसर पोशाख वगैरे देऊन त्यास स्पष्ट निरोप दिला नाही. बेगम बोलिली, "तुम्ही

आताच निघून जा, उद्या शहाची बुद्धी फिरेल कोणी सांगावे!'' त्याचा पाठलाग शहाने केला नाही यावरुन त्याची मूक संमती शाहूस होती इतकाच अर्थ निघतो.[९९]

शाहू महाराजांची सुटका ही झुल्फिकारखान तसेच बेगम यांच्या मध्यस्तीने झाली. कारण शहाजादा आज्जमशहा यास असे वाटत होते की, आपण उत्तरेत गेल्यावर दक्षिणेमध्ये आपल्याला विरोध होऊ नये यासाठी त्याच्या मनात शाहूस सोडण्याचा विचार आला. तसेच शाहूस आपण सोडले तर ताराबाई व शाहू महाराज यांच्या यादवी युद्धामध्ये अराजक परिस्थिती निर्माण होईल व आपल्याला फायदा होईल. या गोष्टींचा विचार करून उत्तरेकडे जात असताना नर्मदेच्या काठी दोराहा या ठिकाणी ता. ८ मे १७०७ रोजी शाहू महाराजांना कैदेतून सोडून दिले आणि येसूबाई व मदनसिंग यांना कैदेत ठेवले.

शाहू राजांच्या सुटकेसंबंधी खाफीखानाने पुढील निष्कर्ष काढला होता. शेवटी आलमगीर बादशहा आजारी झाला आणि खालील म्हण सत्य ठरली. ''सापाला ठार करायचे आणि त्याची पिल्ले सांभाळायची, आग विझवायची आणि त्याचा विस्तव जपायचा ही काही दूरदर्शी माणसांची धारणा नव्हे, माणसाच्या सहवासात वावरण्याचे शिक्षण घेतलेला लांडगा शेवटी लांडगाच होता.''[१००]

अशाप्रकारे या प्रकरणात आपण छ. शाहू महाराज यांचा जन्म, बालपण, सुरुवातीचे वर्ष व कैद याची आपण सविस्तर चर्चा केली आहे, त्याच्यावर झालेले संस्कार तसेच इतर मुत्सद्यांचा प्रभाव व त्यातून झालेली त्यांची जडण-घडण त्यांची बनलेली वैचारिक दृष्टी, राजनैतिक बैठक, त्यांच्या भावी आयुष्यास व मराठ्याच्या इतिहासात कलाटणी देणारी ठरली. हे आपण साधनाच्या आधारे चर्चिले आहे. त्याचबरोबर छ. शाहू महाराजांची सुटका व ते सक्रीयपणे राजकारणात येईपर्यंतचा भाग अभ्यासला आहे.

**संदर्भः-**


१) शिवदे सदाशिव, महाराज्ञी येसूबाई, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००४, पृ. ४५-४६.

२) सरदेसाई गो. स. (संपा.), परमानंद काव्यम अनुपुराण (देवस्त, गोविंद), गायकवाड ओरिएंटल सीरीज, बडोदा, १९५२.

३) बेन्द्रे वा. सी., श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन मुंबई, २००१, पृ. ७४०.

४) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-२, उग्रप्रकृती संभाजी, स्थिरबुद्धी राजाराम, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९/१९११, पृ. १२१.

५) शिवदे सदाशिव, महाराणी येसूबाई, उपरोक्त, पृ. ६७.

६) हेरवाडकर र. वि., मल्हार रामराव चिटणीस-विरचित, थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९७२, पृ. १.

७) बेन्द्रे वा. सी., श्री छत्रपती राजाराम महाराज आणि नेतृत्वहीन 'हिंदवी स्वराज्याचा मोगलाशी झगडा', लोक वाङ्मयगृह, मुंबई, १९७५, पृ. ३०.

८) कित्ता, पृ. ६०.

९) प्रा. पवार जयसिंगराव, सेनापती संताजी घोरपडे, मंजुश्री प्रकाशन, कोल्हापूर, १९८७, पृ. २०.

१०) डॉ. खोबरेकर वि. गो., महाराष्ट्राचा इतिहास- मराठा कालखंड (भाग-१), शिवकाल (१६३० ते १७०७), महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, २००६, पृ. ३१६.

११) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-२, उपरोक्त, पृ. १५३.

१२) शिवदे सदाशिव, महाराणी येसूबाई, उपरोक्त, पृ. ७८-७९.

१३) सेतुमाधवराव पगडी (भाषांतकार), मोगल मराठा संघर्ष (फुतुआते आलमगिरी रहुतुते शिवाजी), चित्रशाळा प्रेस, पुणे, १९६४, पृ. ३४.

१४) शिवदे सदाशिव, महाराणी येसूबाई, उपरोक्त, पृ. ७९-८०.

१५) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड -२, उपरोक्त, पृ. ८.

१६) कानेटकर वसंत, शिवशाहीचा शोध, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई, १९९७, पृ. १६९.

१७) पवार जयसिंगराव, सेनापती संताजी घोरपडे, उपरोक्त, पृ. २०.

१८) जेधे शकावली, शिवचरित्र प्रदिप, पुणे, १९२५, पृ. ३४.

१९) पगडी सेतुमाधवराव, मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), ज्ञानराज प्रकाशन, पुणे, १९६३, पृ. १९७.

२०) सरदेसाई गो.स., मराठी रियासत, खंड-२, उपरोक्त, पृ. १५६

२१) डॉ. खोबरेकर वि. गो., महाराष्ट्राचा इतिहास (भाग-१) शिवकाल, उपरोक्त, पृ. ३२०-३२१.

२२) शिवदे सदाशिव, महाराणी येसूबाई, उपरोक्त, पृ. ८५.

२३) बेन्द्रे वा.सी., श्री. छत्रपती राजाराम महाराज आणि नेतृत्वहीन 'हिंदवी स्वराज्याचा मोगलाशी लढा', उपरोक्त, पृ. ६१.

२४) शिवदे सदाशिव, महाराणी येसूबाई, उपरोक्त, पृ. ८५.

२५) खोबरेकर वि.गो., तारिखे दिलकशा (इंग्रजी), मुंबई, १९७२, पृ. १७०.

२६) हेरवाडकर र. वि., मल्हार रामराव चिटणीस विरचित, श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज आणि थोरले राजाराम महाराज यांची चरित्रे, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९७२, पृ. ३०-३१.

२७) पगडी सेतुमाधवराव (भाषांतकार), मोगल-मराठा संघर्ष, चित्रशाळा प्रेस पुणे, १९६४, पृ. ३४.

२८) कित्ता, पृ. ३५.

२९) कुंटे भ. ग. (भाषांतकार), औरंगजेबाचा इतिहास, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, १९७८ (शके १९००), पृ. ६४६.

३०) फाटक नरहर रघुनाथ (अनुवादक), मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९६४, पृ. ९२.

३१) Sarkar J., History of Aurangzib, Vol. V, M.C. Sarkar and Sons, Calcutta, 1928, P. 203.

३२) शिवदे सदाशिव, महाराणी येसूबाई, उपरोक्त, पृ. ९३.



३३) कित्ता, पृ. ९८.

३४) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-२, उपरोक्त, २५६.

३५) राजवाडे वि. का., भारतवर्ष, मासिक वर्ष-१, पृ. २८.

३६) ऐतिहासिक चर्चा, भारत वर्ष, खंड- ३ रा.

३७) राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड-२२, (पेशव्याची शकावली)

३८) पगडी सेतुमाधवराव, मराठे व औरंगजेब, उपरोक्त, पृ. ४७६.

३९) पगडी सेतुमाधवराव, मराठ्यांचे स्वातंत्र्य युद्ध, जोशी-लोखंडे प्रकाशन, १९६२, पृ. ४७६.

४०) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड- २, उपरोक्त, पृ. २५७.

४१) कित्ता, पृ. २५७-२५८.

४२) पगडी सेतुमाधवराव (अनुवादक), मोगल दरबारची बातमीपत्रे, खंड-३ रा., महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, १९८९, पृ. १०.

४३) गर्गे स. मा., करवीर रियासत, श्री. शहाजी छत्रपती म्युझियम ट्रस्ट, कोल्हापूर, २००३, पृ. ५२.

४४) बेन्द्रे वा. सी., श्री. छ. राजाराम महाराज आणि नेतृत्वहीन 'हिंदवी स्वराज्याच्या मोगलांशी लढा', उपरोक्त, पृ. ३२४.

४५) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड- २, उपरोक्त, पृ. २५६-२५७.

४६) खोबरेकर वि. गो., महाराष्ट्राचा इतिहास (भाग-१), शिवकाल, उपरोक्त, पृ. ४१७-४१८.

४७) कानेटकर वसंत, शिवशाहीचा शोध, उपरोक्त, पृ. १९३.

४८) बेन्द्रे वा. सी., श्री. छ. संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, उपरोक्त, पृ. ७५२.

४९) बेन्द्रे वा. सी., श्री. छ. राजाराम महाराज आणि नेतृत्वहीन 'हिंदवी स्वराज्याचा मोगलाशी लढा', उपरोक्त, पृ. ४२४.

५०) कुंटे भ. ग. (भाषांतकार), औरंगजेबाचा इतिहास, उपरोक्त, पृ. ७८१.

५१) बेन्द्रे वा.सी., श्री. छ. संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, उपरोक्त, पृ. ७४८.

५२) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-२, उपरोक्त, पृ. २८५.

५३) पगडी सेतुमाधवराव (अनुवादक), मोगल दरबाराची बातमीपत्रे, खंड-३, उपरोक्त, पृ. ११.

५४) शिवदे सदाशिव, महाराणी येसूबाई, उपरोक्त, पृ. १०९.

५५) कोलाटकर रा. गो. (अनुवादक), औरंगजेब, (India Under Aurangzeb), डायमंड पब्लिकेशन्स्, पुणे, २००६, पृ. ३८२.

५६) शिवदे सदाशिव, महाराणी येसूबाई, उपरोक्त, पृ. १०९.

५७) पगडी सेतुमाधवराव, मोगल दरबाराची बातमीपत्रे, खंड-३ रा, उपरोक्त, पृ. ११.

५८) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-२, उपरोक्त, पृ. २८५-२८६.

५९) कित्ता, पृ. २८६.

६०) शिवदे सदाशिव, महाराणी येसूबाई, उपरोक्त, पृ. १०९.

६१) Sardesai G. S. & Sarkar J., History of Aurangzeb, Vol.-V, M.C. Sarkar & Sons, Calcutta, 1928, P. -165.

६२) साने काशिनाथ नारायण, मल्हार रामराव चिटणीस विरचित, पुणे, १९१५, पृ. ६८.

६३) शिवदे सदाशिव, महाराणी येसूबाई, उपरोक्त, पृ.११०.

६४) हेरवाडकर र. वि., विरचित थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, उपरोक्त, पृ.४.

६५) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-२, उपरोक्त, पृ. २८६.

६६) साने का. ना., थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, मल्हार रामराव चिटणीस विरचित, पुणे, १८८३, पृ.५.

६७) पगडी सेतुमाधवराव, मोगल दरबाराची बातमीपत्रे- खंड-३, उपरोक्त, पृ. ३५.

६८) कित्ता, पृ. ३३.

६९) गोगटे चि. ग., छत्रपती थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, नवीन किताबखाना, पुणे, १८९३, पृ. १६.

७०) हेरवाडकर र. वि., थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, उपरोक्त, पृ. ६.
७१) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९/१९११, पृ. २६९.
७२) बेन्द्रे वा. सी., श्री. छ. संभाजी महाराज यांचे चिकित्सक चरित्र, उपरोक्त, पृ. ७०९.
७३) शिवदे सदाशिव, महाराणी येसूबाई, उपरोक्त, पृ. १३१.
७४) हेरवाडकर र. वि., विरचित श्रीमंत संभाजी महाराज व थोरले राजाराम महाराज यांचे चरित्र, उपरोक्त, पृ. ३२.
७५) शिवदे सदाशिव, महाराणी येसूबाई, उपरोक्त, पृ. १३१.
७६) पगडी सेतुमाधवराव, मोगल दरबाराची बातमीपत्रे- खंड-३, उपरोक्त, पृ. १३.
७७) पगडी सेतुमाधवराव, मोगल आणि मराठे (तारिखे दिल्कुशा-भीमसेन सक्सेना), पुणे, १९६३, पृ. १६७.
७८) सरदेसाई गो. स., मोगल रियासत, खंड-२, उपरोक्त, पृ. २५५.
७९) शिवदे सदाशिव, महाराणी येसूबाई, उपरोक्त, पृ. १२६.
८०) पगडी सेतुमाधवराव, मोगल दरबाराची बातमीपत्रे, खंड-३, उपरोक्त, पृ. १५.
८१) पवार जयसिंगराव, महाराणी ताराबाई, ताराराणी विद्यापीठ, कोल्हापूर, १९७५, पृ. १९७.
८२) कोलाटकर श. गो. (अनुवादक), औरंगजेब India under Aurangzeb डायमंड पब्लिकेशन्स, पुणे, २००६, पृ. ३८१.
८३) पगडी सेतुमाधवराव, मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगीरी- साकी मुस्तैदखान), पुणे १९६३, पृ. १३२.
८४) पगडी सेतुमाधवराव, मराठ्याचे स्वातंत्र्य युद्ध (खाफीखानाचा साधनग्रंथ), पुणे, १९६२, पृ. १३२.
८५) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड- २, उपरोक्त, पृ. ३०६.
८६) आपटे द. वि. व दिवेकर सा. म. (संपा.), शिवचरित्र प्रदीप, पुणे, शके १८४७, पृ. ६९.

८७) हेरवाडकर र. वि., मल्हार रामराव चिटणीस- विरचित श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज आणि राजाराम महाराज, उपरोक्त, पृ. ७३-७४.

८८) पगडी सेतुमाधवराव, मराठ्यांचे स्वातंत्र्य युद्ध, उपरोक्त, पृ. १०९.

८९) पवार जगसिंगराव, महाराणी ताराबाई, उपरोक्त, पृ. २३६.

९०) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ३६.

९१) कानेटकर वसंत, शिवशाहीचा शोध, उपरोक्त, पृ. २०७.

९२) पाठक अ. श. (संपा.), महाराष्ट्र शासन राज्य गॅझेटिअर, सातारा जिल्हा, महाराष्ट्र शासन, मुंबई, १९९९, पृ. १४५-१४६.

९३) खोबरेकर वि. गो., शिवकाल (१६३० ते १७०७), भाग-१,उपरोक्त, पृ. ४६७.

९४) पुरंदरे कृ. वा., ब्रह्मीभूत शंकराजी नारायण पंतसचिव, पुरंदरे दप्तर भाग-१ ते ४, काशिनाथ श्रीकृष्ण गुप्ते, पुणे, १८७०, पृ. १०९.

९५) कोलाटकर. श. गो.(अनुवाद), औरंगजेब India under Aurangzeb, उपरोक्त, पृ. ३८२.

९६) हेरवाडकर र. वि., थोरले राजाराम यांचे चरित्र प्रकरण, उपरोक्त, पृ. ७६.

९७) न. चिं. केळकर स्मारक व्याख्यानमाला, महाराष्ट्राच्या जीवनातील स्थित्यंतरे आणि त्यांचा साहित्यावर व संस्कृतीवर झालेला परिणाम, प्रा. भवानीशंकर पंडित प्रकाशन, पुणे विद्यापीठ, पुणे, १९६८, पृ. १२८.

९८) फाटक न. र. (अनुवादक), मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ, मुंबई, १९६४, पृ. ९४.

९९) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड -३, उपरोक्त, पृ. २७-२८.

१००) शिवदे सदाशिव, महाराज्ञी येसूबाई, उपरोक्त, पृ. १२७.

105·1



प्रकरण तिसरे

# छत्रपती शाहू महाराज यांच्या काळातील मराठ्यांचा साम्राज्य विस्तार

4

प्रकरण तिसरे

# छत्रपती शाहू महाराज यांच्या काळातील मराठ्यांचा साम्राज्य विस्तार

| | |
|---|---|
| ३.१ | स्वराज्याचे स्वरूप |
| ३.२ | शाहू यांचे महाराष्ट्रात आगमन व राज्यसंपादन |
| ३.२.१ | शाहू महाराज यांचे लांबकनी येथे वास्तव्य : मराठे सरदार अनुकूल |
| ३.२.२ | शाहू यांचे अहमदनगरास आगमन : ताराबाईंचा विरोध |
| ३.२.३ | खेडची लढाई : शाहूंचा विजय : ता. १२ ऑक्टो.१७०७ |
| ३.२.४ | शाहू यांचे साताऱ्यावर वर्चस्व : ता. १ जाने. १७०८ |
| ३.२.५ | शाहू महाराज यांचा सातारा येथे राज्याभिषेक : ता. १२ जाने. १७०८ |
| ३.३ | छ. शाहू यांच्या समोरील समस्या : विरोधकांची लाट |
| ३.३.१ | छ. शाहू महाराज व बहादुरशहा |
| ३.३.२ | ताराबाईंचा विरोध कायम. |
| ३.३.३ | धनाजी जाधवांचा मृत्यू ता. २६ जून १७०८ |
| ३.३.४ | चंद्रसेन जाधवांचे बंड |
| ३.३.५ | खटावकरांचा दंगा |
| ३.३.६ | दमाजी थोराताचे बंड (इ. स. १७१६,१८) |
| ३.३.७ | बंडाचा फैलाव |
| ३.३.८ | कान्होजी आंग्रेचे आव्हान |
| ३.४ | पेशवा बाळाजी विश्वनाथचा उदय व कामगिरी |
| ३.४.१ | कान्होजी आंग्रे यांच्याशी समझोता |
| ३.४.२ | दिल्ली येथील सय्यद बंधूंचे राजकारण : छ. शाहू यांचा त्यात सहभाग |
| ३.४.२.१ | सय्यद हुसेन याचे दक्षिणेत आगमन |
| ३.४.२.२ | चौथाईचा तह |
| ३.४.३. | बाळाजी विश्वनाथ यांची दिल्ली स्वारी |

३.४.४. बादशहाकडून स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखीच्या सनदाची प्राप्ती

३.४.५. मातोश्री येसूबाई यांची सुटका व महाराष्ट्रात आगमन

३.४.६. पेशवा बाळाजी विश्वनाथांचा मृत्यू व योग्यता ता. २ एप्रिल १७२०

३.५ छ. शाहू महाराज व मराठा मंडळाची निर्मिती

३.६ कोल्हापूर मध्ये राज्यक्रान्ती : इ.स. जुलै १७१४

३.७ छ. शाहू महाराज व पेशवा बाजीराव यांच्या नेतृत्वाखाली मराठ्यांचा साम्राज्य विस्तार (इ.स. १७२० ते १७४०)

३.७.१ बाजीराव पहिला यास पेशवेपदाची प्राप्ती ता. १७ एप्रिल १७२०

३.७.२ छ. शाहू महाराज व निजाम संबंध

३.७.२.१ निजामाचा भाग्योदय

३.७.२.२ बाजीराव व निजाम भेट

३.७.२.३ निजामास दिल्लीची वजिरी प्राप्त : इ.स. १७२१

३.७.२.४ साखर खेर्डल्याची लढाई : इ.स. ऑक्टो. १७२४

३.७.२.५ छ. शाहू यांची कर्नाटकावर स्वारी : निजामाचे मराठे विरोधी धोरण

३.७.२.६ करवीरकर संभाजी यांचे बंड : छ. शाहू व निजाम संघर्ष

३.७.२.७ निजामाचा कारस्थानी उद्योग

३.७.२.८ पालखेड येथे छ. शाहू यांचा विजय व निजामाचा पराभव : इ.स. फेब्रु. १७२८

३.७.२.९ भोपाळ येथे निजामाचा पुन्हा पराभव : इ.स. डिसेंबर १७३७

३.८ छ. शाहू यांचे मार्गदर्शन व बाजीराव यांच्या नेतृत्त्वाखाली मराठ्यांचा माळवा व बुंदेलखंडात प्रवेश व वर्चस्व

३.८.१ माळव्यावर मराठ्यांचा ताबा : आसमऱ्याच्या युद्धात दयाबहादूरचा पराभव

३.८.२ बाजीराव व छत्रसाल

३.९ छ. शाहू व संभाजी : वारणेचा तह : इ. स. एप्रिल १७३१

३.९.१ छ. शाहू व संभाजी भेट व तह

३.१० दाभाडे-पेशवे संघर्ष : छ. शाहूची मध्यस्थी ,

३.११ जंजीरा मोहिम : सिद्दिचे पारिपत्य

३.११.१ सिद्दीसातचा पाडाव : ता. १९ एप्रिल १७३७

३.१२ पेशवा बाजीरावची दिल्लीवर स्वारी : इ.स. मार्च १७३६ : उत्तर दिग्वीजय

३.१२.१ पेशवा बाजीराव व सवाई जयसिंग भेट

३.१२.२ दिल्लीवर चढाई

३.१३. वसईची मोहीम :पोर्तुगीजाचा बंदोबस्त

३.१४. कान्होजी भोसले यांचे बंड : छ. शाहू यांची मध्यस्थी

३.१५. छ. शाहूंची मिरजवर स्वारी : इ. स. १७३६-३९

३.१५.१ पेशवे बाजीरावचा मृत्यू : ता. २८ एप्रिल १७४०

३.१६ छ. शाहू महाराज व पेशवा नानासाहेब यांच्या नेतृत्त्वाखाली मराठ्यांचा साम्राज्य विस्तार : इ.स. १७४०-१७४९

३.१६.१ नानासाहेबास पेशवाई प्राप्त : ता. २५ जून १७४०

३.१६.२ सातारकर व कोल्हापूरकर सत्तांचे एकत्रीकरणाचा प्रयत्न

३.१६.३ बाबूजी नायकाचे उच्चाटन

३.१६.४ नानासाहेब आणि निजाम

३.१६.५ नानासाहेबांच्या उत्तरेकडील मोहिमा : इ. स. १७४१-१७४८

३.१६.५.१ नानासाहेबांची उत्तरेकडील पहिली मोहिम : इ.स. १७४१

३.१६.५.२ नानासाहेबांची उत्तरेकडील दूसरी मोहिम : इ.स. १७४१ ते १७४३

३.१६.५.३ पेशवा रघुजी भोसले तेढ व संघर्ष : छ. शाहू यांची मध्यस्थी

३.१६.५.४ नानासाहेबांची उत्तरेवर तिसरी मोहिम : ता. २० नों. १७४४ ते इ.स. १७४५

३.१६.५.५ नानासाहेबांची उत्तरेस चौथी मोहिम किंवा नेवाईची स्वारी : इ.स. १७४८

३.१६.६ कर्नाटकातील राजकारण

३.१७ छ. शाहू महाराज यांची अखेरची वर्षे : दत्तक प्रकरण

३.१७.१ छ. शाहू महाराजांची उदास वृत्ती

३.१७.२ छ. शाहू यांनी नानासाहेब यांना पेशवे पदावरून काढले

३.१७.३ छ. शाहू महाराजांचा वारस शोधण्याचा प्रयत्न : दत्तक प्रकरण

ता. २० फेब्रुवारी, स. १७०७ रोजी औरंगजेबाचा मृत्यू अहमदनगर येथे झाला.[१] ही गोष्ट एकंदर मराठ्यांच्या किंबहुना हिंदुस्थानच्या इतिहासात मोठे परिवर्तन दर्शविते. अदिलशाही व कुतुबशाही या दोन शाही राजवटींना केवळ एक दोन वर्षात मूठमाती देणाऱ्या औरंगजेब बादशहाला मराठ्यांचे राज्य संपूष्टात आणण्यात यश आले नाही. पुढे औरंगजेबाच्या कालखंडातच मोगल साम्राज्याच्या विघटनाची बिजे रुजली गेली. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर काही वर्षातच मोगल साम्राज्यातून फुट पडून अनेक प्रांतिक सत्ता आकारास आल्या. त्यात मराठ्यांना छ. शाहूच्या नेतृत्वाखाली संधी मिळताच उत्तरेत व दक्षिणेत सत्ता विस्तार केला आणि अठराव्या शतकाच्या मध्याला मराठ्यांची सत्ता ही भारतात सर्वत्र प्रबळ ठरली. परंतु मोगल साम्राज्याप्रमाणे मराठे एकसंघ साम्राज्य प्रस्थापित करु शकले नाही. 'मराठा मंडळ' वा 'संयुक्त राज्यव्यवस्था' प्रस्तापित करुन मराठ्यांनी जमेल त्या भागात राज्यविस्तार केला.'

आपण या प्रकरणात छ. शाहू महाराज यांच्या काळातील मराठ्यांचा साम्राज्य विस्तार याचा अभ्यास करणार आहोत. याचे व्यवस्थित आकलन करुन घेण्यासाठी आपणास शाहूच्या आगमनापूर्वी व आगमनानंतरची स्वराज्याची परिस्थिती कशी होती याचा येथे आपणास अभ्यास करावयाचा आहे.

## ३.१ स्वराज्याचे स्वरुपः-

रानडे मो. ग. लिहितात, "शाहूची सुटका झाली. मराठ्यांना मान्य असलेला पुढारी या नात्याने तो दक्षिणेत आला. तेव्हा आपल्या आजोबांचे (शिवाजीचे) महाराष्ट्रात ऐक्याची संघटना निर्माण करण्याचे धोरण पुढे चालविण्याची कामगिरी त्याला पार पाडावयाची होती."[२]

यावेळी महाराष्ट्रात लढाईमुळे बजबजपुरी व बेबंदशाही माजली होती. तिच्यातून व्यवस्था निर्माण होणे कठीण होते. स्वातंत्र्य युद्धात भाग घेणाऱ्या पुढाऱ्यास प्रत्येकजण स्वतःचे नशीब उघडावे म्हणून लढला. युद्ध चालू असताना जो समान हेतू होता तो मोगलांच्या पराभवाने नाहीसा झाला. आता प्रत्येकजण स्वतंत्र होऊ पाहत होते. मराठ्यांमध्ये दुही व कलह निर्माण करण्यासाठी शाहूला सोडण्याचा सल्ला बादशहाला झुल्फिकारखानाने दिला होता.

ताराबाईचा पक्ष घेणाऱ्यांपैकी पुष्कळांनी शाहूचे स्वागत केले नाही. पंत अमात्य व पंत सचिव हे शाहूपासून दूर राहिले. धनाजी जाधव हे जुने जाणते पुढारी शाहूचा हक्क वाजवी आहे हे पटल्यावर ते शाहूस मिळाले. पण धनाजीच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा चंद्रसेन जाधव याचे शाहूशी न जमल्याने त्याने बंडखोरी करुन प्रथम ताराबाईस व नंतर निजामास जाऊन मिळाला. इतर पुढाऱ्यांपैकी खंडेराव दाभाडे खानदेशात बळ वाढवित होते. तर परसोजी भोसले वऱ्हाड गोंडवनात आपले बळ वाढवित होते. पण हे दोघे शाहूच्या पक्षाकडचे होते. हैबतराव निंबाळकर गंगथडीस होते. कान्होजी आंग्रे हे कोकण ताब्यात ठेवून होते. कान्होजी आंग्रे प्रथम ताराबाईच्या पक्षात होते, नंतर ते शाहूंच्या पक्षात आले. अशाप्रकारे अनेक नामांकित सरदार, अधिकारी मंडळ, शाहू, ताराबाई व निजाम यांच्या नोकरीत सारख्या प्रमाणात विभागले गेले. त्यात थोरात, चव्हाण व खटावकरांनी बराच त्रास शाहूस दिलेला दिसतो. त्यामुळे सातारा शहराची सीमा व जे डोंगरी किल्ले शाहूकडील सरदारांच्या हातात होते. तितकेच शाहूचे राज्य होते व अशा स्थितीचा सामना शाहूस करावयाचा होता. मराठ्यांचे बुडते जहाज छ. शाहू यांनी आपल्या अंगभूत गुण व कर्तबगारी, माणसांची पारख याद्वारे ते प्रथम तरते केले, नंतर त्यास भक्कमपणा आणून ते पैलतीरास नेऊन स्वराज्याचे रक्षण केले. त्याच्या काळात साम्राज्याचा विस्तार कसा झाला ते पाहणे येथे गरजेचे आहे.

## ३.२ शाहू यांचे महाराष्ट्रात आगमण व राज्यसंपादनः-

शाहू महाराजांची सुटका होताच ते माळव्यातून महाराष्ट्राकडे निघाले. हे मागील प्रकरणात आपण अभ्यासले आहे. यावेळी त्यांच्याबरोबर काही सेवक होते. फौज अशी काही नव्हती. सवाई जयसिंग वगैरे राजपूत उत्तरेत होते त्यांचा पाठिंबा शाहूस होता. "स्वामीचा व सवाई जयसिंगाचा घरोबा पूर्वीपासून चालत आला आहे, त्याचे मनोधारण स्वामीस आगत्य",[३] असे शाहूचे उद्‌गार आहेत.

शाहू हे प्रथम वीजागढ उर्फ वढवाळी येथील मोहनसींग रावळ यांच्याकडे गेले. मोहनसिंगाने फौज व पैसा देऊन त्यांची व्यवस्था लावून दिली. सरदेसाई गो. स. लिहितात, "शाहू नर्मदा उतरल्यावर पूर्वबाजूने बुऱ्हाणपुराकडील मोगल बंदोबस्त चूकवून पश्चिम मार्गाने सातपुड्यातून बीजागड, सूलतानपूरवरुन खानदेशात आला, जोत्याजी

केसरकर आजमशहा बरोबर सनदा आणण्यासाठी उत्तरेत गेला. त्या सनदा त्यास बहादूरशहाकडून ता. ३ ऑगस्ट रोजी ग्वाल्हेर येथे मिळाल्या असे विधान अखबरात आहे.''[४] त्या सनदा उपलब्ध नाहीत.

शाहू महाराज यांस नैतिक सहानुभूति-

शाहूस जरी प्रारंभी लष्करी बळ मिळाले नसले तरी महाराष्ट्राची नैतिक सहानुभूती मात्र भरपूर मिळाली. हा पाठिंबा नुसता हिंदूचा नसून मुसलमानांचाही होता. कारण बादशहाने शाहूची सुटका सशर्त केली होती, त्यामुळे मोगलांचा रोष होण्यासारखी परिस्थिती नव्हती. त्याचा फायदा शाहू यास मिळाला व जमीनदार व सेनानायक शाहूस मिळाले. त्यांनीही आपल्या औदार्याची छाप बसविली.

### ३.२.१ शाहू महाराज यांचे लांबकानी येथे वास्तव्यः मराठे सरदार अनुकूलः-

शाहू हे सुलतानपूरजवळील तापीकाठी असलेल्या कोकरमुंडी किल्ल्याजवळ आले. तेव्हा तेथील जमीनदार अंबू बांडे म्हणजे कदम बांडे हा शाहूस मिळाला. पुढे दोघेही इस १७०७ च्या मे अखेर लांबकानी येथे दाखल झाले.[५] या लांबकानी येथे त्याचा मुक्काम जवळपास महिनाभर होता. येथे असताना त्यांनी चहुकडे पत्र पाठवून आपणास सामील होण्याविषयी लिहिले. 'मल्हार तुकदेव' हा मराठा सरदार सर्वप्रथम शाहूस येऊन मिळाला. त्याबद्दल पुरंदरे दप्तर भा. त. यांनी मल्हार तुकदेव यास आज्ञा केली, ''ऐसा जे स्वामीचे आगमन स्वदेशास झाले तेव्हा तुम्ही औघीया अगोदर खानदेशामध्ये लांबकानीचे मुक्कामी येऊन स्वामीचे दर्शन घेतले. कित्येक कार्यप्रयोजने केली. एकनिष्ठे सेवा केली आहे म्हणून स्वामीने कृपाळू होऊन ----.''[६] या पत्रातून आपणास इमान राखल्याबद्दल शाहूंनी त्याचा गौरव केल्याचे दिसते.

त्यानंतर तेथील जमीनदार सूजनसिंग रावळ यानेही शाहूस भरपूर मदत दिली. परंतु शाहूंना पहिला मुख्य आधार मिळाला तो परसोजी भोसले याचा. ते ता. २६ जून १७०८ रोजी मुठे खोऱ्याच्या कुलकर्णी बापूजी सोनाजी दिघे शाहूने पत्र लिहिलेले 'ऐतिहासिक टिपने' भा.न. मध्ये पारसनिस द. वा. यांनी दिले ते, ''स्वामी परराष्ट्रातून स्वराज्यात आले, त्याप्रसंगी तुम्ही परसोजी भोसले यांची जामेनिशी करीत असता त्यांचे

तर्फेने येऊन लांबकानीच्या मुक्कामी स्वामीचे दर्शन घेतले. स्वामीचे आज्ञेने परसोजीस दर्शनास आणिले. ते प्रसंगी तुम्ही सेवा बहुत एकनिष्ठेने केली-------.''[७] यावरुन परसोजी व त्याचा भाऊ साबाजी हे सरदार शाहूस मिळाले म्हणून शाहूचा जम लवकर बसला व यांनीच शाहू हा खरा आहे अशी खात्री केल्याने हैबतराव निंबाळकर, नेमाजी शिंदे हे सरदार शाहूस मिळाले. पेशव्याचा मूतालीक चिमणाजी दामोदरही शाहूस येऊन मिळाला.

यावेळी शाहूजवळ फार मोठी मंडळी जमा झाली त्यात परसोजी व कान्होजी भोसले, मानसिंग मोरे, कदम बांडे, नेमाजी शिंदे, हैबतराव निंबाळकर, रुस्तमराव जाधव, चिमणाजी दामोदर, चांबळीकर गणेश, शंकर सरनाईक, केसो त्रिमल पिंगळे, रामचंद्र त्रिंबक वाकणीस, पंताजी शिवदेव हणमंते मंडळी, रायजी प्रभू, कृष्णाजी नरस प्रभू, आनंदराव प्रभू, महादजी यमाजी बोकील, पुरंदरे मेडशी इ. प्रभावळ त्याच्या भोवती जमा झाली होती.

### ३.२.२ शाहू यांचे अहमदनगरास आगमनः ताराबाईंचा विरोधः-

जुलैमध्ये शाहू लांबकानीहून खड, कुसुंबी या मार्गे ऑगस्टमध्ये अहमदनगरास आले व तेथे जवळपास दोन महिने मुक्काम करुन होते. तेथे त्यांनी पुष्कळ कामे केली. महाराष्ट्राचे राज्य आपण संघटित करीत आहोत अशी भावना असल्याचे पत्र सरदेसाई यांनी आपल्या 'मराठी रियासत' भाग-३ या ग्रंथात दिले आहे ते पुढीलप्रमाणे, ''तुम्ही स्वामीच्या दर्शनास गोदातिरी आलात, परमयोग्य अनुष्ठाते सत्कर्मे अचरोन महाराष्ट्र राज्यास कल्याण चिंतीत आहा.''[८] यातून त्यांची भावना उजागर होते.

नगर येथे येण्यापूर्वीच शाहू यांनी ताराबाईस कळविले, ''आम्ही निघून स्वदेशी परत येत आहोत. आता राज्य आम्ही करु, बादशाही आज्ञाही अशी आहे. आपण मातूश्री आहा, आपलजे यथास्थित चालविण्यास आम्ही कमि करणार नाही. पुढचा मार्ग आक्रमण्यास आम्हांस आपला आशीर्वाद व अनुभव यांचाच उपयोग विशेष होईल.''[९]

अहमदनगरला आल्यावर शाहूंनी ताराबाईशी वाटाघाटी चालविली व त्यासाठी दोन महिने वाट पाहिली. यातून ताराबाईशी युद्ध टाळणे अशीच त्यांची इच्छा होती हे दिसते.

ताराबाईस हे वर्तमान कळाल्यावर त्यांनी शाहूस राज्याधिकार सांगण्यावरुन विरोध केला व शाहू हा खरा नसून तो तोतया आहे, अशी वावटळ उठविली; पण ही बाब टिकली नाही. कारण शाहू पंचवीस वर्षे महाराष्ट्रातच नांदला होता व प्रमुख मंडळीस चांगला परिचयाचा होता. त्यामुळे हा डाव फसला तेव्हा ताराबाईनी उघड विरोध करुन शाहूस रोख उत्तर दिले व उत्तरात पाठविले की, "तुमचा राज्यावर हक्क नाही आणि आम्ही तुम्हास राज्य देत नाही."[१०] अशा आशयाचे हुकूम काढले.

शाहू यांचा हक्क नाकारणारे आणखीन एक पत्र पुढील प्रमाणे, "---- राजश्री शाहूराजे ताम्राचे निर्बधातून निघाले आहेत, म्हणून हुजूर वर्तमान आले. यशास, हे राज्य थोरल्या कै. स्वामीनी बहुत श्रमे मेलऊन, सर्वथ संपूर्ण केले होते. ते राजर्षी संभाजी राजा काका यांनी विध्वंसून कैलासवासी स्वामी राज्याधिकारी झाले. त्यांनी स्वपराक्रमे नुतनच राज्य संपादले. स्वामिनी त्याचे रक्षण करुन ताम्राचा पराभव केला. राज्याची अभिवृद्धी होत चालली. दुसरी गोष्ट हे राज्य थोरल्या कै. स्वामिनी तीर्थस्व कै. स्वामीस द्यावेसे केले होते. ऐसे असता त्यास या राज्याशी संमंध नाही. त्या डोहणियात जे मिळाले आहेत व मिळतील त्यास नतिजा त्यास नाहीत पावायची आज्ञा करुन, रा. जयसिंग जाधवराऊ सेनापती व हंबिरराव मोहिते सरलष्कर व वरकड सरदारास फौजे तिथे पाठविले आहे. ज्यांचे अनुसंधान त्याकडे लागले असेल त्यांचा मुलाहिजा होणार नाही."[११]

वरील पत्रातील ताराबाईंनी उपस्थित कलेले मुद्दे टिकण्यासारखे नव्हते कारण संभाजीच्या मृत्यूनंतर राजारामांनी जिंजिहून ज्या राज्याचे संरक्षण केले व कारभार पाहिला ते राज्य शिवाजी महाराजांनी स्थापन केले होते. स्वत: राजाराम राज्य करीत असताना मराठा राजवंशाचा वारस औरंगजेबाच्या कैदेत असलेला शाहू हाच आहे असे मानित होते व शिवाजी यांनी संभाजी ऐवजी राजाराम यांना वारस करण्याची इच्छा केल्याचा पुरावा ताराबाईकडे नव्हता. त्यामुळे ताराबाईचे मुद्दे निकालात निघतात.

शाहूचे हक्क नाकारुन ताराबाई यांनी लढा देण्याची तयारी सुरु केली. शाहुच्या सुटकेने यादवी निर्माण होईल ही मोगल मुत्सद्दीची अपेक्षा खरी ठरली. ताराबाई व शाहू यांच्यात संघर्षास सुरुवात झाली. कारण महत्त्वाकांक्षी ताराबाईला अधिकार सोडवेना गेला पण ज्याच्या नावाने ताराबाई कारभार बघत होती तिचा पुत्र शिवाजी हा लहान असून तो

वेडसर वृत्तीचा होता अशी सर्वत्र प्रसिद्धी होती त्यामुळे तिच्या पक्षास वैगुण्य प्राप्त झाले होते.

इथे काही इतिहासकार लिहितात शाहू हा बादशहाचा अंकीत होऊन आल्यामुळे मराठेशाहीचे नुकसान झाले, त्यापेक्षा ताराबाईचा स्वतंत्र बाणाच राष्ट्राला फायदेशीर होता. परंतु ताराबाईनेही बादशाही ताबेदारी पत्करण्याचे बोलले. शाहू प्रमाणेच चालविले होते.[१२] त्यामुळे या म्हणण्यास आधार राहत नाही. खरे तर ताराबाई यांनी शाहूशी सलोखा करुन यादवी टाळली असती तर मराठ्यांची शक्ती वाढून पुढे निजामशाहीचा उदय झाला नसता. शाहू नगरला असताना ताराबाई यांनी शाहू यास खोटा ठरवून त्यास पकडून मारुन टाकावे असा हुकूम सोडल्याचा बखरकार सांगतात.[१३] तसेच शाहूस कोणी मिळू नये म्हणून दुधभातावर हात ठेऊन राजनिष्ठेचा शपथा घेतल्या.[१४] पण यातील काहींनी शपथा मनातून घेतल्या तर काहींनी मनातून घेतल्या नाही. कारण त्यांचे अंत:करण शाहूकडे होते.

नगरच्या मुक्कामी असताना शाहूनी अनेक राजकारणी गोष्टी केल्या. त्यात प्रामुख्याने बादशाहीचा रोष होऊ नये म्हणून औरंगजेबाच्या मातृभूमीचे दर्शन भक्तिपूरस्पर घेऊन खुल्ताबादाच्या रोझाला तो गेला.[१५] इकडे त्याचवेळी त्याने आपला अंमल आजुबाजूच्या प्रदेशात बसविण्याचा उदयोग चालू केला. यावेळी पारद गाडीवर शाहूची माणसे गेली असताना गावच्या पाटलांनी त्यांच्यावर गोळ्या सोडल्या, तेव्हा शाहूंच्या लोकांनी हल्ला करुन गाव ताब्यात घेतले. गावचा पाटील शहाजी लोखंडे मारला गेला. त्यावेळी पाटलाच्या स्त्रीने आपला मुलगा आणून महाराजांच्या पालखीत घातला व बोलली ''यास वाचवावे, अन्यायी होते ते गेले, मुलाचा अपराध नाही.'' त्यावरुन समाधान पावून मुलाला आश्रय देऊन मुलाचे नांव फत्तेसिंग भोसले ठेविले हा पुढे प्रसिद्ध होऊन राजपूत्र बनून अक्कलकोट जहागिरीचा संपादक बनला.[१६] यामुळे शाहूचा लौकिक वाढला.

### ३.२.३ खेडची लढाई : शाहूंचा विजय : ता. १२ ऑक्टो. १७०७

सरदेसाई. गो. स. लिहितात, ''धैर्य, तडफ, निश्चय, मुत्सद्देगिरी वगैरे गुण शाहूने या पहिल्या चारपाच महिन्यात असे प्रकट केले की, त्याजबद्दल महाराष्ट्रात

सर्वत्र मोठा आदर उत्पन्न झाला. याचमुळे ताराबाईचे मनोरथ ढिले पडले आणि शाहूंचा मार्ग मोकळा झाला.''[१७] गृहकलह शस्त्र बळापेक्षा सामोपचाराने सोडवावा हे शाहूस पसंत होते. परंतु ताराबाई यानी सैन्य पाठवून शाहूचा बंदोबस्त करण्याचे ठरविले. तेव्हा मात्र लढाईची तयारी करणे शाहूस भाग पडले.

ताराबाईच्या आदेशानुसार धनाजी जाधव आणि परशुराम त्र्यंबक फौज घेऊन इ.स. ऑक्टो. १७०७ च्या प्रारंभी शाहूच्या बंदोबस्तासाठी निघाले. शाहू हे अहमदनगर सोडून पुण्याच्या दक्षिणेस खेड (सध्या राजगुरुनगर) गावाजवळ आले. यावेळी युद्धाचे वातावरण तयार झाले. तथापि शाहूंची समोपचाराच्या मार्गाने खुद्द धनाजी जाधव यास आपल्या भेटीस बोलावले तसेच धनाजी जाधवाच्या पदरी असलेले खंडो बल्लाळ, बाळाजी विश्वनाथ आणि नारो राम या तीन अधिकाऱ्यांनी शाहूचा पक्ष कसा योग्य आहे. हे अगोदरच आपल्या धन्यास समजावून दिले. शाहूच्या गोटात धनाजी जाधव अचानकपणे सामील झाल्यामुळे शाहूची बाजू बळकट झाली.

या लढाईचे वर्णन चिटणीसी या बखरीत असे दिले आहे की, ''महाराज लढाईस सिद्ध झाले. धनाजी जाधव व प्रतिनिधी चाल करुन आले. परसोजी भोसले व चिमणाजी यांनी घोडे चालवून लढाई दिली. महाराजानीं चालून घेतले. प्रतिनिधी वगैरे मोड होऊन पळून गेले. त्यांचे दहा पाच हजार स्वार सापडले. सेनापतींनी आपल्या विचारातील सर्वांस घेऊन घोड्यावरून उत्तरोत मुजरे करून भेटले. महाराजांनी खेडच्या मैदानी मुकाम केला. लोकांनी कामे केली त्यास बहुमान बक्षीस दिले. दुसऱ्या दिवशी सेनापतींच्या भेटी सन्माने करून जाल्या. सुमुहर्तावर सेनापतीस पदाची वस्त्रे व बहुमान दिला. खंडो बल्लाळ यांसही चिटणिसी वस्त्रे दिली.''[१८]

यावरून खंडो बल्लाळ याने लढाईच्या आधीच शाहूस भेटून धनाजीस त्यांच्या परगत आणले होते. व ता.१२ ऑक्टोंबर १७०७ च्या लढाईस परशुराम प्रतिनिधींचा पराभव झाला व ते साताऱ्यास पळून गेले.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''खेडच्या लढाईतील जय मिळताच शाहुंने आपण राज्याचे मालक समजून क्षत्रिय कुलावंतास श्री राजा शाहू छत्रपती, '' या नावाने आज्ञापत्रे सुरू केली.[१९] या लढाईस ताराबाई स्वत: हजर नसल्यामुळे व धनाजी जाधवच्या

अचानक माघार घेतल्याने तसेच रामचंद्रपंत अमात्याने मनापासून साह्य न केल्याने शिकस्त झाल्याचे दिसते. रामचंद्रपंतवर ताराबाईची मर्जी नव्हती. त्यांचे मर्जीतील परशुराम पंत प्रतिनिधी होते व यांचा रामचंद्रपंताबाबत आकस होता. हे त्यांच्या कारभारात हस्तक्षेप करीत असा उल्लेख बखरीत व भोर संस्थानच्या इतिहासात आढळून येतो. अनेक निष्ठावंत मंडळी शाहूस मिळाल्याने शाहुंनी आक्रमक धोरण स्वीकारले.

### ३.२.४ शाहू यांचे साताऱ्यावर वर्चस्व : ता. १ जाने १७०८:-

खेड येथील विजयानंतर शाहू यांनी पुढील राजकारणाच्या चाली ठरवून ते आळंदी, तुळजापूरवरुन पुण्यास आले व तेथून जेजुरी, वीरवाल्हे या गावाहून झटपट चिरवळ येथे पोहचले.[२०] हे महत्त्वाचे ठिकाण सचिवांचे होते. ताराबाईचा पुरस्कर्ता शंकरजी नारायण रोहिड्यावर राहत होता. देशपांडे प्र. न. लिहितात, "शंकरजी या सचिव वृद्ध मुत्सद्याने ताराबाई व शाहू यांच्यातील संघर्ष सहन न झाल्यामुळे आत्महत्या केली. शाहूने सचिवांच्या कुटुंबियांचे सांत्वन केले आणि शंकरजीचा मुलगा नारो शंकर यास सचिवपद दिले."[२१] यावरुन शाहू महाराज यांच्या औदार्याची कल्पना येते.

अशाप्रकारे शाहू यांनी तोरणा, राजगड आणि रोहिंडा हे किल्ले जिंकून मावळ प्रदेशात हुकूमत प्रस्तापित केली. पुढे ते साताऱ्यापर्यंत चंदनवंदन जवळ आले तेव्हा ताराबाई यांनी सातारा लढविण्याची कामगिरी प्रतिनिधीवर सोपवून आपण मुलासह पन्हाळ्यावर निघूल गेल्या.[२२] शाहू यांनी सातारा हवाली करण्याचे पत्रे प्रतिनिधीस पाठविले. प्रतिनिधींनी न जुमानता लढा सुरु केला. वाईचा राहणारा किल्ल्याचा हवालदार शेख मिरा निकराने लढू लागला, तेव्हा शाहूंनी त्याचे कुटुंब पकडून आणून त्यास धमकी दिली. तेव्हा त्याने शरण जावून परशुरापंत प्रतिनिधीस अचानक अटक करुन किल्ला व त्यास शाहू यांच्या हवाली केले. 'शनिवारी सकाळीच किल्ला हस्तगत झाल्याची खून म्हणून फत्तेची नौबत शनिवारी वाजविण्याचा प्रघात पडला.'[२३]

### ३.२.५ शाहू महाराज यांचा सातारा येथे राज्याभिषेक: ता. १२ जाने. १७०८:

शाहू माळव्यातून निघाल्यापासून आठ महिन्यांनी म्हणजेच ता. १२ जाने. १७०८ ला सातारा (राजधानी) त्यांच्या कबजात आली व ते मराठी राज्याचे मालक

बनले. त्यानंतर त्यांनी मुहूर्त पाहून माघ शू. १ सोमवार शक १६८९, ता. १२ जाने. १७०८ रोजी आपला राज्यभिषेक समारंभ करुन घेतला.[२४] सातारा ही राजधानी निश्चित केली. शाहू महाराजाने राज्याभिषेकावेळी व प्रसंगोपात प्रधानांच्या व इतर अधिकाऱ्यांच्या नेमणुका केल्या होत्या. त्यांचा उल्लेख 'छत्रपती राजाराम महाराज' (पृ. ४३५) 'पेशवे दप्तर भा' (पृ. ३०८-२६४), या वा.सी. बेंद्रे लिखित व 'मराठी रियासत भा-३' (पृ. ५१) या सरदेसाई गो. स. लिखित ग्रंथात आढळतात ते पुढीलप्रमाणे -

'मोरोपंत पिंगळ्यांचा मुलगा बहिरोपंत यास पेशवेपद दिले. धनाजी जाधव यांना सेनापतिपद, नारोशंकर यांना सचिवपद दिले, परशुराम पंतांना कैदेत टाकल्याने त्याचे प्रतिनिधीपद गदाधर प्रल्हाद यांना दिले बाळाजी विश्वनाथ याकडे 'मूतालीक' हे पद दिले. नारोशंकर यास सुरनिस हे पद दिले. बाबुराव यास 'अमात्य' हे पद दिले, होनाजी आनंत यांना 'न्यायाधीश' हे पद दिले तर मुदलभट यास 'पंडितराव' केले. 'मंत्री' म्हणून रामचंद्र पंतकडे नंतर रामचंद्र त्रिंबक व नारोराम यास केले. इतर नामांकितपैकी नेमाजी शिंदे, परसोजी भोसले, हैबतराव निंबाळकर यांना नवे किताब व मानाची वस्त्रे देऊन त्यास पुढील उद्योगास लाविले.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''नेमणुका संबंधीने एक प्रकार लक्षात ठेवणे जरुरी आहे. शिवाजीने दोन विशिष्ट दंडक राज्यकारभाराचे विचारपूर्वक ठरविले की सुईच्या अग्रावर राहिल इतकी देखील जमीन कोणास तोडून देऊ नये आणि राज्याच्या नोकऱ्या लायकी पाहून ठरवाव्या, वंशपरंपरा पाहू नयेत. हे दोन्ही नियम बुद्धि:स्तर किंवा परिस्थितीमुळे शाहूने बदलले.[२५]

## ३.३ छ.शाहू यांच्यासमोरील समस्या: विरोधकांची लाट:

राजधानी साताऱ्याहून छ. शाहू 'स्वराज्याचा कारभार' करु लागले तथापि ताराबाईचे आव्हान व इतर समस्या अजून संपलेल्या नव्हत्या आणि म्हणूनच राज्याभिषेक झाल्यानंतर शाहूंना या समस्यांकडे लक्ष पुरविणे भाग पडले.

### ३.३.१ छत्रपती शाहू महाराज व बहादुरशहा:-

शाहू यांच्या परिस्थितीचे आकलन करताना इतिहासकारांच्या मनात शाहूविषयी गैरसमज असल्यामुळे त्यांनी वेगवेगळ्या भूमिका मांडल्या आहे. शाहू महाराज

बादशहाच्या कैदेत होते, कैदेतून सुटून आल्यावर त्याला फक्त त्याच्या चुलतीशीच लढावयाचे होते व बादशहाच्या संबंधामुळे तो निर्धास्त होता अशी आपण समजूत करतो. परंतु हा प्रकार साफ चुकीचा आहे. शाहू यांना बादशहाकडून सामान्य ताबेदारी पलिकडे विशिष्ट लेखी करार किंवा आश्वासन मिळाले नव्हते. औरंगजेबाच्या मृत्यूचा परिणाम त्यानंतर पंचवीस ते तीस वर्षांनी दिसू लागला. यावेळी त्याचे तिघेही पुत्र पराक्रमी व अनुभवी होते म्हणून बापाचा हेतू (दक्षिण काबीज) पूर्ण करण्यास ते असमर्थ होते असे नव्हे. त्यामुळे शाहू यांचा अभ्यास करताना ही परिस्थिती लक्षात ठेवणे आवश्यक ठरते.

मराठा साम्राज्यात जसा सत्तासंघर्ष चालू होता तसाच संघर्ष दिल्लीच्या मोगल राजवंशात चालू होता. आझमशहा व शहा आलम यांचे इ.स. जून १७०७ मध्ये आग्राजवळ युद्ध होऊन युद्धात आझमशहा मारला गेला व शहा आलम याने 'बहादूरशहा' हा किताब धारण करुन दिल्लीच्या तख्तावर आपला हक्क जाहिर केला.[२६]

सरदेसाई गो.स. लिहितात, ''राज्यरोहनानंतर लगेच त्याने कामबक्षवर दक्षिणेत मोहिम केली तेव्हा तर मराठे सरदाराची व शाहूची त्रेधा उडून गेली.''[२७] शाहू महाराजांचा राज्याभिषेक झाला तेव्हा तो जयपूरास मुक्कामी होता. इ. स. १७०८ साली शाहू रणांगणावर ताराबाईशी लढत असताना बादशहा अहमदनगरकडे दाखल झाला व गोदावरी उतरून तो ऑक्टोबरला बेदरास पोहचला. बहादूरशहाने शाहू यांची मदत मागितली. शाहू यांनी स्वत: न जाता नेमाजी शिंदे यास फौजेनिशी पाठविले. यावेळी शाहूने बहादूरशहाकडून स्वराज्याच्या आपल्या हक्कावर शिक्कामोर्तब करुन घेता येईल, असा अंदाज केला होता. हैद्राबादवर कामबक्ष व बहादूरशहा यांच्यात ता. १४ फेब्रुवारी १७०९ रोजी युद्ध होऊन त्यात कामबक्षाचा पराभव झाला. कामबक्षास बहादूरशहाने ठार मारले.

इकडे शाहू यांचा जम पूर्णपणे बसला नव्हता. इ.स. मे १७०९ ला बहादूरशहा परतीवर अहमदनगरला आला असताना शाहूंनी आपला प्रतिनिधी गदाधर प्रल्हाद व रायभानजी यास बहादूशहाच्या भेटीस पाठविले; कारण चौथाई व सरदेशमुखीच्या सनदा मिळविण्यासाठी झुल्फीकारखानाने शाहूची मागणी उचलून धरली. याच सुमारास ताराबाईचा वकीलही अहमदनगरला आला व त्याने तीच मागणी उचलून धरली.

झुल्फिकारखानचा प्रतिस्पर्धी मुनीमखान याने ताराबाईची मागणी उचलून धरली. मार्ग निघेना म्हणून वजीराने युक्ती काढली की, शाहू आणि ताराबाई यांनी प्रथम वारसा हक्काचा निकाल लावावा. त्याप्रमाणे ज्याचा हक्क निश्चित ठरेल त्यास बादशहाने सनदा द्याव्यात. बहादूरशहाने हा तोडगा मान्य केल्याने दोन्हीही पक्षाची निराशा झाली. वास्तविक मराठ्यांस आपसात लढवून कमकुवत करण्याचा हा मोगलाचा डाव होता.

वरील निकाल शाहूच्या पुढील उद्योगास बाधक झाला हे निश्चित. या परिस्थितीत त्यांना बादशहा व ताराबाई या दोन आघाड्यावर लढणे शक्य नव्हते. म्हणून त्यांनी बादशहाशी सलोख्याचे संबंध ठेवून प्रथम आपला जम बसविण्याचा प्रयत्न सुरु केला.

### ३.३.२ ताराबाईचा विरोध कायमः-

शाहू महाराजांनी पन्हाळ्याची मोहिम हाती घेण्याचे ठरविले, पण यापूर्वी ताराबाईशी सलोखा करण्याच्या दृष्टीने एक महत्त्वाचा प्रयत्न केला. त्यांनी ताराबाईंना स्वतंत्र प्रदेश तोडून देऊन तडजोड करण्याच्या दृष्टीने एक तहनामाही ताराबाईकडे पाठवून दिला. हा प्रयत्न यशस्वी झाला असता तर हा संघर्ष थांबून दोन्ही राजांना आपले वर्चस्व वाढवून साम्राज्यविस्तार करता आला असता.

स.मा. गर्गे लिहितात, "शाहू महाराजांच्या तहनाम्यात वारणानदीच्या दक्षिणेकडचा प्रदेश ताराबाईंना सोडून द्यावा असे सूचविले होते. त्या भागातील लष्करी ठाणी व किल्ले ताराबाईकडे असावी आणि वारणा व कृष्णा यांच्या संगमापासून निवृत्ती संगम तुंगभद्रा पावेतो सर्व प्रदेश आमलाखाली आणावा व कोकण प्रांतात पंचमहाल-अकोलेपर्यंत ताराबाईच्या राज्याचा प्रदेश मानला जावा असेही नमूद केले होते."[२८] या तहाच्या कलमाबद्दलची सविस्तर माहिती 'करवीर छत्रपती घराण्याच्या इतिहासाची साधने' या ग्रंथात, पृ. ६४ वर दिली आहे.

शाहू महाराजांचा भाऊबंदकीचा वाद मिटविण्याचा हा प्रयत्न राजकीयदृष्ट्या व कुटुंबीयदृष्ट्या उल्लेखनिय असा होता, यात शंका नाही. परंतु ताराबाईच्या अधिकाराच्या हाव्यासापायी मनस्थितीनुसार त्यांना ते मान्य नव्हते. ताराबाईचे राजकीय केंद्रे पन्हाळा सातार्‍यापासून साठ मैलावर होते. अशावेळी घरचा विरोध मोडून काढण्यासाठी शाहू यांना शस्त्राचा आधार घेऊन इ.स. फेब्रु. १७०८ मध्ये पन्हाळास वेढा घातला. वाटेत

त्यांनी वसंतगड, पावनगड, कोल्हापूर येथे ठाणे बसविले. पुढे विशालगडचा किल्लाही ताब्यात घेतला. अखेरीस मोठ्या शौर्याने पन्हाळा ताब्यात घेतला परंतु त्या आधीच ताराबाईनी पन्हाळा सोडून रांगण्याकडे निघून गेल्या. यामुळे शाहू महाराजांचा हेतू साध्य न होऊन ताराबाई यांचा फायदा झाला.

ताराबाई यांनी मुत्सद्देगिरीचा डावपेच टाकून सुरक्षिततेच्या दृष्टिकोनातून रांगण्यावरुन त्या मालवनला सिंधुदुर्ग किल्यास गेल्या. रांगणा किल्ला लढविण्याची जबाबदारी पिराजी घोरपड्यावर सोपविली. रांगणा किल्ला शाहू यांनी पावसाळा सुरु होईपर्यंत जिंकण्याचा प्रयत्न केला. पण त्यांना यश आले नाही; कारण ताराबाई यांनी रामचंद्रपंत अमात्य यांना पद देवून त्यांच्यावर संरक्षणाची जबाबदारी टाकली. त्यामुळे त्यांच्या मदतीने त्यांना शाहू यांना थोपविने सोपे गेले.

गर्गे स. मा. लिहितात, ''शाहू महाराज रांगण्याभोवती असलेल्या एका टेकडीवर चढत असताना त्याचा घोडा घसरला परंतु तेवढ्यात त्याना खंडो बल्लाळ यांनी सावरल्याने ते वाचले'', या घटनेमुळे त्यांनी रांगणा किल्ला सोडून पन्हाळ्याकडे परत जाण्याचे ठरविले. अशा तऱ्हेने ताराबाईच्या विरुद्ध शाहू महाराजांनी स्विकारलेल्या चढाईच्या धोरणास रांगणा येथे त्यांना प्रथमच पराभव पत्करावा लागला. या प्रकाराने ताराबाई यांना हुरुप चढून त्यांनी पन्हाळा किल्ला परत जिंकून पुन्हा कोल्हापूर प्रदेशावर वर्चस्व स्थापित केले.

तसेच शाहू महाराज यांचे या मोहिमेवरुन लक्ष विचलित होण्याचे कारण म्हणजे बहादूरशहाचे दक्षिणेत आगमन होय. शाहू यांच्या मनात कल्पना होती की, आपल्याला बादशहाच्या पाठींब्याने ताराबाई यांचा पक्ष कमजोर करता येईल.

### ३.३.३ धनाजी जाधवांचा मृत्यू: (ता. २६ जून १७०८)

शाहू यांना मोठा आधार असलेले अनुभवी व जेष्ठ सेनानी सेनापती धनाजी जाधव यांचा मृत्यू ता. २६ जून १७०८ रोजी वारणातिरी वडगाव येथे झाला. ताराबाई यांनी एका पत्रात धनाजीच्या पराक्रमाची व स्वामीनिष्ठेची प्रशंसा केलेली आढळते. रियासतकार सरदेसाई यांनी म्हटल्याप्रमाणे, ''आजपर्यंत राज्याची मोठमोठी कामे

केलेला, राज्याची शिस्त पाहिलेला हा वृद्ध व अनुभवी पुरुष गेल्याने शाहूच्या पक्षाचे पुष्कळ नुकसान झाले.''[२९]

### ३.३.४ चंद्रसेन जाधवाचे बंडः-

इ.स. १७०९ हे वर्ष शाहू यांना प्रतिकूल गेले. मोगल बादशहाकडून त्यांना प्रतिसाद मिळू शकला नाही. त्यात धनाजी जाधवांच्या मृत्यूने त्यांची बाजू कमकुवत झाली होती. धनाजी जाधवांचा मुलगा चंद्रसेन जाधव यास सेनापती पद दिले. चंद्रसेन हा शूर असला तरी चंचल प्रवृत्तीचा होता. शाहू महाराजांचा दुसरा महत्त्वाचा आधार परसोजी भोसले इ.स. १७०९ मध्ये मृत्यू पावल्याने चंद्रसेन सारख्या चंचल मनुष्यावर विसंबून राहणे धोक्याचे वाटू लागले म्हणून शाहू यांनी बाळाजी विश्वनाथ यास 'सेनापती' हे पद देवून फौज जमविण्याची आज्ञा दिली. यामुळे चंद्रसेन जाधव अधिक बिथरला. ताराबई व मोगल सूभेदार दोघेही त्यास प्रलोभन देऊन आपणाकडे वळवू लागले.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''खानाकडे बळकट संधान सिद्ध झाल्यावरच चंद्रसेनाने शाहूकडे दरडावणी चालू केली.''[३०]

यावेळी त्याची मजल पुढे जाऊन त्याने शाहू यास पदच्यूत करण्याचे कारस्थान केले. त्याविषयी त्याचे ताराबाईस लिहिलेल्या,'ता. १३ ऑगस्ट १७११ च्या पत्रात लिहितो की, ''शाहूच्या लोभाची अस्था मनात न बाळगिता आम्ही प्रथम राजजी व दमाजी थोरात, शहाजी निंबाळकर व संताजी पांढरे यास सामील करुन घेतले आणि आपल्या समाधानार्थ परशुरामपंत प्रतिनिधी व खंडेराव दाभाडे यास पाठवावे.''[३१] यावरुन त्याने शाहू विरुद्ध कट केला होता हे उघड होते. पण या कटाचा सुगावा शाहू यास लागल्याने तो यशस्वी झाला नाही.

चंद्रसेनाला उघड बंडखोरी करण्यास निमित्त पाहिजे होते. ते हरणाच्या तंट्याने उपस्थित झाले. यावेळी शाहू यांनी बंडखोर सरदारांच्या बंदोबस्तासाठी चंद्रसेन व बाळाजी यांना पाठविले. हरणाच्या संरक्षणाच्या कारणामुळे हा तंटा सुरु झाला होता. ते हरिण बाळाजीने चंद्रसेनाच्या हवाली करण्यास नकार दिला यामुळे चिडून चंद्रसेनाने बाळाजीवर फौज पाठविली, तेव्हा बाळाजी आपले लष्कर घेऊन साताऱ्यास गेले.

चंद्रसेनाने शाहू महाराज यांनाच धमकी दिली की, ''स्वामीनी बाळाजीस माझ्या स्वाधीन करावे त्यास आश्रय दिल्यास आम्हास महाराजाचे पाय सुटतील.''[३२]

या उद्धटपणाची शिक्षा देण्याचे ठरवून शाहूंनी हैबतराव निंबाळकर यांना त्यांच्या बंदोबस्तासाठी पाठविले. जेऊरच्या लढाईत त्याचा मोड हैबतरावाने इ.स. १७११ ला केला. तेव्हा चंद्रसेन उद्धटपणे प्रथम ताराबाईस आणि दोनच महिन्यांनी इ. स. ऑगस्ट १७११ ला दाऊदखानास जाऊन मिळाला. या प्रकाराने शाहू यांनी ताबडतोब बदल करुन चंद्रसेनाचे सेनापतिपद काढून ते ता.१ ऑक्टो. १७११ ला त्याचा भाऊ संताजी यास दिले.[३३] जाधवास शक्य तितके कमी दुखविण्याचा शाहू याचा प्रयत्न होता. परशुराम प्रतिनिधी शाहूकडे होते तेही ताराबाईस सामील होणार हे दिसल्यावरुन त्याना ता. ९ नोव्हें. १७११ रोजी कैद करुन त्याचा संरजाम सुद्धा जप्त केला. या प्रसंगी शाहूंनी त्याचे डोळे काढण्याचा विचार केला होता परंतु तो बल्लाळांच्या मध्यस्थीने रद्द झाला.

### ३.३.५ खटावकरांचा दंगा:-

चंद्रसेन जाधवाच्या फितुरीमुळे अनेकांना जोर येऊन त्यांनी शाहू यांच्या प्रदेशात बंड करण्यास सुरुवात केली. याच वेळी खटावकरांनी दंगा सुरु केला. हे घराने पूर्वापार मोगलांचे मनसबदार होते. या प्रसंगाचा शाहू यांच्या एका आज्ञापत्रात खालील मजकूर आहे, ''किल्ले महिमान गडाखाली लष्कराचा मुक्कामअसता खटावकर रुजू न होता बदराहा वर्तणूक करू लागले, म्हणून फौजेची तयारी करुन कसबे खटाववर झाले. इ.स.ले.छ.२ जिल्कादी (म्हणजे ता. २ डिसेंबर १७११ रोजी) चालोन घेतले तेव्हा झुंज निकाराचे झाले त्यात तुकोजी गायकवाड शिपायीपणाची शर्त करुन स्वामीकार्यावर ठार झाले.'[३४] या मजकुरावरून लढाईचा इ.स. कळतो.

शाहू महाराजांनी बाळाजीस कृष्णराव खटावकरावर पाठविले यावेळी परशुरामपंत साताऱ्यास कैदेत होते. शाहू महाराजाची मर्जी प्रसन्न करुन घेण्यासाठी त्याने आपला मुलगा श्रीपतीराव यास बाळाजी बरोबर दिले. लढाईत कृष्णराव मारला गेला. त्याच्या मुलांना क्षमा करुन शाहू महाराजांनी त्यांच्याकडे वतन कायम ठेवले व परशुराम

प्रतिनिधीच्या मुलाच्या पराक्रमावर प्रसन्न होऊन त्यास कैदेतून मुक्त करुन पेशवाईपद दिले व पुढे प्रतिनिधी पद दिले.

### ३.३.६ दमाजी थोरातांचे बंड (इ.स. १७१६-१८)

छ. शाहू यांच्या विरोधकात चंद्रसेनच्या संगतीने वागणारे दमाजी थोरात व उदाजी चव्हाण हे आणखीन दोन गृहस्थ होते. दमाजी थोरातास रामचंद्रपंत आमत्य याने प्रथमपुढे आणले होते व त्यास सूपे व पारस हे दोन परगणे जागीर देऊन बंदोबस्तास ठेवले होते. ते हिंगणलगावास गढी करुन राहत होते. शाहू महाराजांनी स्वराज्यात येता क्षणी थोरातास आपल्याकडे मिळविण्याचा प्रयत्न केला. धनाजी जाधवाने थोरात व दाभाडे यांच्याकडे वकील पाठवून त्यांना भेटीस आणले होते.

इ.स. १७११ ला चंद्रसेनाने थोरात, (रावरंभा सरदारास छ. शाहूच्या पक्षातून फोडले होते.) त्यांचा जम ताराबाईकडे न जमल्याने ते मोगलास मिळाले. पुढे छ. शाहू याचा पेशवा बहिरोपंत पिंगळे यास आंग्रे याने पकडून नेले. तेव्हा या मंडळीचा दंगा विशेष वाढला.

इ.स. १७१६ साली छ. शाहू विरुद्धचे बंड चांगलेच जोर धरू लागले. या साली चंद्रसेन जाधव, थोरात, निंबाळकर, मुहकमसिंग, तुरुकजातखान यांनी साताऱ्यावर चालून जाण्याची मोहिम आखली आणि रोहिडेश्वर, लोना-भापकर तेथपर्यंत आलेही चंद्रसेनाने शाहूस तर थोरातने बाळाजीस पकडून शाहू यांचे राज्य नष्ट करण्याचा डाव मोगलांनी रचला होता. परंतु हा डाव बाळाजी याने, दाभाडे, मोरे, शिवदेव, सुलतानजी, निंबाळकर यांच्या सेना एकत्र करुन तो मोडून काढला.

सरदेसाई गो.स. माहिती देतात की, ''छत्रपती शाहू यांनी हा अतूल पराक्रमी सेवक म्हणून बाळाजीचा गौरव केलेला आढळतो.''[३५]

थोरातास सामोपचाऱ्याच्या मार्गाने शाहूकडे वळवावे असे बाळाजीने ठरविले. त्यानुसार त्याने थोराताच्या भेटीस कुटुंबासह हिंगणगावास जाण्याचे ठरवून दगा न करण्याची शपथ (बेल भंडार) घेऊन ते भेटीस गेले. परंतु गढीत गेल्याबरोबर थोराताने त्यास कैद करुन जबरी दंड मागितला. यावेळी बाळाजीने त्यास शपथेची आठवण करुन

दिली. त्याने शपथेचे महत्त्व नाकारले. अखेर दंड भरुन सुटका झाली. पुढे नारो शंकरांच्या बाबतीतही तीच घटना घडली.

इ.स. १७१८ बाळाजीने सय्यदशी तह ठरल्यानंतर तिकडून तोफखाना आणून हिंगणगावास मोर्चा लावून ते ठाणे काबीज केले. थोरातास पकडून पुरंदरावर अटकेत ठेवले.[३६]

### ३.३.७ बंडाचा फैलाव:-

हिंदुराव घोरपडे, संभाजी निंबाळकर व उदाजी चव्हाण सरदारांच्या व्यथा याच स्वरुपाच्या आहेत. बाळाजीने जेव्हा मोगल बादशहाकडून सनदा आणल्या तेव्हाच याचा जोर नरम पडला. परंतु त्याचा बंदोबस्त पूर्णत: झाला नाही. कारण कोल्हापूरचा संभाजी, निजाम आणि पेशव्यांचे इतर हितशत्रू यांचा अशा सरदारांना नेहमी पाठिंबा होता. अशा अराजकातून व बेबंदशाहीतून काही प्रमाणात मराठी शक्ती संघटित करण्यात व टिकविण्यात छ. शाहू व पुढे पेशवे, शिंदे या सरदारांना यश मिळाल्याने मराठ्यांचा उत्कर्ष पुढे शंभर वर्ष होत गेला.

### ३.३.८ कान्होजी आंग्रेचे आव्हान:-

शिवाजी महाराजांनी स्थापन केलेल्या आरमाराचा विकास करुन कान्होजी आंग्रेने पश्चिम किनाऱ्यावर वचक निर्माण केला होता. मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धात त्याने महत्त्वपूर्ण कामगिरी केल्याने राजाराम महाराजांनी त्यास 'सरखेल' हा मानाचा किताब दिला होता.[३७]

कान्होजीच्या आरमाराचे एवढे सामर्थ्य वाढले की सिद्दी, इंग्रज, पोर्तुगीज यांनाही कान्होजीचा धाक वाटत असे. चंद्रसेनाच्या कारस्थानामुळे तो ताराबाईकडे गेला होता व त्याच्या प्रेरणेने कान्होजीने कोकणात शाहू यांच्या फौजेस हुसकावून राजमाची,तुंग, तिकोना आणि लोहगढ हे महत्त्वाचे किल्ले ताब्यात घेवून छ. शाहू यांस आव्हान दिले. तेव्हा कान्होजीचा प्रतिकार करण्यासाठी छ. शाहू यांनी पेशवे बहिरोपंत पिंगळे यास ससैन्य पाठविले परंतु कान्होजीने त्यांचा पराभव करुन इ.स.१८१३ मध्ये पेशव्यास अटक केली. या घटनेने छ. शाहू चिंताग्रस्थ झाले कारण कान्होजीचे हे आव्हान जबरदस्त होते.

अशा वेळी एकही विश्वासू सरदार शाहू जवळ नव्हता. त्यामुळे शाहू यांनी बाळाजी विश्वनाथास ही कामगिरी दिली.

### ३.४ पेशवा बाळाजी विश्वनाथाचा उदय व कामगिरी:-

जवळ-जवळ ४२ वर्ष छ. शाहू यांची कारकीर्द गाजली. तिचा विशेष हा की, तीत राज्यकाभारात लागणारी प्रत्येक पेशातील असंख्य माणसे तयार होवून पूढे आली. राज्य कारभार चालविण्याचा दृष्टीने नव्या दमाची माणसे सदैव हाताशी असणे इष्ट असते. शाहू महाराजाजवळ 'मनुष्य स्वभावाची ऊत्तम पारख' असणारा गुण असल्याने त्यांनी अशी कर्ती माणसे भरपूर प्रमाणात पूढे आनली. त्या माणसात बाळाजी विश्वनाथाचा समावेश होतो.

बाळाजी विश्वनाथ भट हा मुळचा कोकणातील श्रीवर्धन येथील असून त्याच्या घराण्याकडे दंड राजापूरी आणि श्रीवर्धन या परगण्याची देशमुखी वंशपरंपरेने चालत आलेली होती. पुढे जंजीऱ्यात सिद्दीचा उपद्रव वाढल्यामुळे बाळाजी विश्वनाथ कोकण सोडून घाटावर आला.इ.स.१६९६ मध्ये बाळाजीस त्याची देशमुखी व सभासद हे पद होते. इ.स. १६९९ ते १७०२ या काळात ते राजारामाच्या कारकीर्दीत पुणे प्रातांचे सुभेदार होते.

पुढे धनाजी जाधवाकडे कामास रूजू झाला. छ. शाहू विषयी बाळाजी विश्वनाथास विलक्षण आदर वाटत होता. मोघलांच्या कैदेतून सुटून शाहू मराठी मुलखात आले तेव्हा बाळाजीनेच धनाजी जाधवास शाहूंच्या पक्षाकडे वळविले. चंद्रसेन जाधवाच्या बंडखोरी नंतर बाळाजीने छ. शाहू यांना मोलाची मदत करून नवी सेना ऊभारून दिली. या कामगिरीबद्दल ता. २० ऑगस्ट १७११ रोजी शाहू महाराजांनी बाळाजी विश्वनाथला 'सेनापती' ही पदवी दिली.[३८] पुढे बाळाजी याने खटावकर, उदाजी चव्हान व दमाजी थोरात या सरदाराचे बंड मोडून काढून शाहू यांच्या सत्तेचा मार्ग मोकळा केला.

#### ३.४.१ कान्होजी आंग्रे यांच्याशी समझोता

पेशवे बहिरोपंत पिंगळे यांना आंग्रे यांनी अटक केल्याने शाहू महाराजांनी परशुरामपंतास पेशवाई देवून त्याच्यावर कान्होजीच्या बंदोबस्ताची जबाबदारी दिली, परंतु परशुरामपंतानी अनिच्छा दर्शविली. तेव्हा बाळाजी विश्वनाथाने ती कामगिरी

स्वीकारण्याचे कळविले व त्यासाठी आपणास काही हक्क व आधिकार असावा म्हणून पेशवाईची वस्त्रे मिळावित अशी मागणी केली. त्यास परशुरामपंतानी व बाळाजीनीही पाठींबा दिला. तेव्हा शाहू यांनी ता. १६ नोव्हो. १७१३ रोजी बाळाजीस पेशवे पदाची वस्त्रे दिली.[३९]

पेशवे पद प्राप्त झाल्याबरोबर बाळाजीने कान्होजी विरूद्ध मोहिम हाती घेतली कान्होजीवर युद्धाद्वारे वर्चस्व निर्माण करणे शक्य नसल्याने गोडीगुलाबीने त्यांना शाहूंच्या पक्षात आणण्याचे ठरविले. दोघेही एकाच किनारपट्टीचे रहिवासी असल्याने एकमेकांना चांगले परिचीत होते.

स.मा. गर्गे लिहितात, ''बाळाजीने कान्होजीला प्रशंसापत्रे लिहिली आणि त्यात पेशवेपद हे खऱ्या अर्थाने कान्होजीच्याच घराण्याला मिळाले असे सुचवून त्याबरोबर शाहू महाराजांचा पक्ष स्वीकारण्यात व्यापक हिताबरोबर व्यावहारीक हितही कसे हे पटवून दिले. सिद्दी, इंग्रज यांच्या विरुद्ध सत्ता टिकवायची तर त्यासाठी शाहू महाराजांचे पाठबळ आवश्यक आहे हे सुचविले तसेच कान्होजींच्या 'सरखेल' पदाचा अधिकार शाहू महाराजांकडून कायम करून देण्याची हमी देण्यासही बाळाजी विसरला नाही.''[४०]

या सर्व युक्ती वादाने कान्होजी आंग्रे शाहू महाराजांच्या पक्षास मिळाले. बाळाजी व कान्होजी यांची भेट लोणावळाजवळ वळवण येथे इ.स. जाने. १७१४ मध्ये घेऊन ता. २८फेब्रू.१७१४ मध्ये त्यांचा एक करार होवून ताब्यातील प्रदेश ठरविण्यात आला. 'सरखेल' पद कायम केले.

पुढे शाहू व कान्होजी यांची जेजूरी येथे भेट होवून शाहू महाराजांनी कान्होजीचा सत्कार केला. त्यासंबंधीची पत्रे वसंतराव खोजा याचे आहे. ''स्वामीनी आबाजी वाड याजबरोबर आज्ञापत्रे सादर केले की, राज्यश्री कान्होजी आंग्रे यांचे भेटीचा प्रसंग आहे. तरी सनगे तूरे व पदके एकादी पतीची याद पाठविली आहे. त्या प्रमाणे सिद्ध करून पाठीविणे---.''[४१] अशा रीतीने आंग्रे शाहूच्या सहकार्याने पश्चिम किनारा निर्धास्त झाल्यामुळे अन्यत्र मराठ्यांचे पाऊल पुढे पडू शकले.

### ३.४.२ दिल्ली येथे सय्यद बंधूचे राजकारणः छ. शाहू यांचा त्यात सहभागः

दाऊदखान पन्नी, निजाम उत्मुल्क, सय्यद हुसेन अली, आलम आली इत्यादी सरदार बादशहा तर्फे दक्षिणेचे सुभेदार होते. त्यांचे परस्पर सख्य नव्हते. बादशाहातील घडामोडीकडे शाहू महाराजाचे लक्ष नेहमीच असे. मराठी राज्यातील दुफळी मोडण्यासाठी व त्यांचा उत्तम जम बसविण्यासाठी शाहू महाराजास दिल्लीच्या राजकारणात पडावे लागले.

इ.स.१७१२ च्या फेब्रुवारीत बादशहा बहादुरशहा मरण पावला आणि जंहदशाहा तख्तावर आला. पण इ.स. १७१३ च्या जानेवारीला त्याला ठार मारून फारुखशीयर बादशाहा झाला.[४२] या बादशहाला तख्त मिळविण्याच्या कामी सय्यद बंधूचे फार मोठे सहाय्य झाले होते. त्यामुळे त्याचे वर्चस्व इतके वाढले की, पुढे सर्व सत्ताच सय्यद हसन व हूसेन यांच्या हाती गेली आणि बादशहाला त्यांच्याविषयी द्वेष ऊत्पन्न होवून तो त्यांच्या नाशाची खटपट करु लागला, त्यातलाच एक डाव म्हणून, त्या बंधुची जोडी फोडण्यासाठी त्याने हूसेन अलीचा दक्षिणेच्या सूभेदारीवर इ.स. १७१५च्या मे महिन्यात नेमणूक केली. व त्या आधीचा सुभेदार निजाम उत्मुल्कची बदली केली.

#### ३.४.२.१ सय्यद हुसेन याचे दक्षिणेत आगमनः

सय्यद हुसेन हा ही मराठ्यांशी द्वेष ठेवणारा. त्याने मराठ्यांच्या बंदोबस्तासाठी फौज जमविली होती, परंतु फारूख सियरच्या दुटप्पी धोरणामुळे तो मराठ्यांशी चांगले संबंध ठेवून होता. त्याचे दक्षिणेस येणे हे मराठ्यांना अनुकूल झाले व छ. शाहू यांना बाळाजीच्या मुत्सद्देगिरीने त्यांचा उपयोग करुन घेतला.

इकडे सय्यद हूसेनला दक्षिणेच्या सुभेदारीवर पाठवून त्याचा परस्पर काटा काढावा हा हेतू बादशाहाचा होता. हूसेन दक्षिणेस निघाला तेव्हा गुजरात येथे असलेल्या दाऊदखानास बादशाहाने गुप्तपणे हुकूम पाठविला की, त्यास कारभार न देता मारुन टाकावे. त्याप्रमाणे दाऊदखान चालून आला. ता. २६ ऑगस्ट १७१५ रोजी बुऱ्हाणपुराजवळ दाऊदखानचा पराभव होऊन त्याला ठार मारण्यात आले.[४३] नंतर त्याने दक्षिणेस व्यवस्था लावण्याचे काम हाती घेतले व जवळ जवळ दोन वर्ष मराठ्यांचा

प्रतिकार करण्यात गूंतला होता. परंतु पुढे निजामाच्या किर्तीने व दिल्लीतील घडामोडी मुळे तो शाहू महाराजांशी मैत्रीचे संबंध जोडू इच्छित होता व शाहू महाराजांनाही जम बसविण्यासाठी सय्यदशी मैत्रीचे संबंध हवे होते. यात दोघानेही राजकीय मुत्सद्देगिरीचे काम दाखविले.

### ३.४.२.२ चौथाईचा तहः

दिल्लीकडे सय्यदाविरुद्ध फळी ऊभारून फारूखसियरने त्यास असुरक्षित केले तेव्हा हसन सय्यदने हूसेन यास दिल्लीकडे बोलाविले तेव्हा हूसेन याने बादशाहाला शह देण्याचा डाव टाकून क्रांतीकारक निर्णय घेतला. त्याने मराठ्यांचे सहकार्य घेण्याचे ठरविले. इ.स.१७१८ मध्ये हूसेन अलीने शंकरजी मल्हार यांच्या मार्फत शाहू महाराजांबरोबर तह (करार) केला. हा चौथाईचा करार म्हणून ओळखला जातो.[४४] त्यातील प्रमुख कलमे पुढील प्रमाणे- १. छ. शिवाजीच्या वेळेचे स्वराज्य, तमाम गडकोट शाहूच्या हवाली करावे.

२. अलीकडे मराठे सरदारांनी विकलेले प्रदेश म्हणजे खानदेश, गोंडवन, वऱ्हाड, हैद्राबाद, कर्नाटक, या भागातले यादीत नमूद केल्या प्रमाणे मोगलांनी सोडून देऊन ते मराठ्यांच्या स्वराज्यात सामील व्हावे, ३) मोगलांच्या दक्षिणेकडील मुलखावर चौथाई व सरदेशमुखीचा हक्क मराठ्यांनी वसूल करावे. या चौथाईच्या बदल्यात आपली पंधरा हजार फौज मराठ्यांनी बादशहाच्या मदतीस ठेवावी आणि सरदेशमुखीच्या मोगलांच्या मुलूखात मराठ्यांनी दरोडेखोर व चोर याचा बंदोबस्त करावा, ४) कोल्हापूरच्या संभाजीस शाहू यानी त्रास देवू नये, ५) मराठ्यांनी मोगल बादशहास दरसाल दहा लाख रु. खंडणी द्यावी, ६) शाहू महाराजांची मातोश्री, कुटुंब, संभाजीचा दासीपुत्र मदनसिंग वगैरे दिल्लीत बादशहाच्या कबजात आहेत त्यास सोडून स्वदेशी पावते करावे.

स.मा.गर्गे. लिहितात ''वरिल करारातील सर्व अटी लक्षात घेतल्या म्हणजे बादशहा आणि शाहू महाराज दोघेही एकमेकांना मदत करीत होते आणि फसवित होते, असे वाटते. यात त्याचे संबंधही स्पष्ट होतात. त्याचबरोबर आता बादशहाला मराठ्यांना चौथाई व सरदेशमुखीचे अधिकार देण्याचे टाळणे शक्य नव्हते,''[४५]

या करारातील कलमाविषयी स.मा. गर्गे लिहितात. ''या करारातील कलमांचा अर्थ शोधीत आसताना शेवटच्या कलमात नमूद केलेली आनंददायक अट मात्र विसरता येण्यासारखी नाही. ती म्हणजे शाहू यांच्या मातोश्रीच्या सुटके विषयीचा हे कलम अतिशय भावपूर्ण वाटणारे आहे.''[४६] यातून भावना लक्षात येतात.

खाफीखानाच्या माहिती प्रमाणे या तहाला मान्यता मिळण्यापूर्वीच शाहू महाराजांनी चौथाई व सरदेशमुखी वसूल करणारे आपले आधिकार ठिकठिकाणी नेमले.[४७]

सरदेसाई गो. स. लिहितात, ''या तहाने व त्याच्या वाटाघाटीने महाराष्ट्रात शाहूचे वजन वाढून त्यांचा जम बसला. त्यांचे कर्तृत्व लोकांस दिसू लागले. तशी त्यांची इभ्रतही वाढत गेली. अष्टप्रधान व सरदार त्यांचे हुकूम बिनतक्रार पाळू लागले.''[४८]

हुसेन अलीने मराठ्यांबरोबर केलेला तह बादशहाला आवडला नाही. मराठ्यांशी तह करण्यामुळे त्यांचा हेतू आपल्या विरुद्ध कट करण्याचा आहे. असा संशय बादशहास आला. त्याने तह नामंजूर करुन सय्यद बंधू विरुद्ध युद्धाची तयारी केली.

### ३.४.३ बाळाजी विश्वनाथ यांची दिल्ली स्वारी

बादशहाच्या हालचालीचा सुगावा लागताच सय्यदानी मराठ्याची मदत घेवून इ.स. १७१८मध्ये दिल्लीकडे कूच केले. फारुखसिअरने पाटण्याहून सरबुलंद खान,मोरोबाबादहून निजाम आणि गुजरातेतून अजितसिंग यांना बोलावून घेतले. परंतु दिल्लीत येताच या तिघांनी सय्यदाशी हातमिळवणी केली. सय्यद हुसेन अली बरोबर स्वत: बाळाजी विश्वनाथ, खंडो बल्लाळ, खंडेराव दाभाडे, उदाजी, केरोजी आणि तुकोजी पवार, राणोजी आणि संताजी भोसले, शेख मिरा, नारो शंकर इ. मराठे सरदार दिल्लीच्या स्वारीस निघाले. बाळाजीने आपला मुलगा बाजीराव यास आपल्या सोबत घेतले.

सरदेसाई गो.स. लिहितात.''फौजेच्या खर्चाबद्दल नर्मदा नदी उतरल्यापसून परत येइपर्यंत पन्नास हजार रूपये दररोज देण्याचा व बादशहाकडून वरिल तहाचे कबूलीचे जामीन देवविण्याचा हुसेन अलीचा करार होता.''[४९]

यावेळी बादशहातर्फे कोणी सरदार सय्यदापूढे उभे राहू शकले नाही. सय्यद बंधुंनी मराठ्यांची फौज घेवून शहराची नाके बंदी करुन राजवाड्यावर अधिकार करुन

फारुखसिअरला कैद केले. दिल्ली येथील चकमकीत संताजी भोसले व बाळाजीपंत भानू हे सरदार मारले गेले.

देशपांडे प्र.न. लिहितात. "सय्यद बंधुनी फारुखसिअरला पदच्यूत करुन रफी उदराजत याला बादशहा केले अल्प क्वचितच त्यास बाजूस करुन रफीउदाला यास गादीवर बसविला तथापी तो मरण्याच्या बलाने अखेर इ.स. १७१९ मध्ये औरंगजेबाचा पणतू मुहंमद आख्तर यास 'मुहमदशहा' हा किताब देवून दिल्लीच्या तख्तावर बसविले."[५०]

### ३.४.४ बादशहाकडून स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखीच्या सनदाची प्राप्ती:

दिल्लीत क्रांती घडून येत असतानाच सय्यद बंधूनी ता. १३ मार्च १७१९रोजी बादशहाकडून शाहू व हुसेन अली यांच्यामध्ये झालेला तह मंजूर करुन घेतला. छत्रपती शाहूंच्या नावाने सनदा तयार करण्यात आल्या. स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखी यावर बादशहाकडून शिक्का मोर्तब करुन घेतले. चौथाईचा करार ता. २ मार्च १७१९ रोजी व सरदेशमुखीचा करार ता.११ मार्च १७१९ रोजी पूर्ण झाला. हे दोन करार व स्वराज्याचा करार असे तीन करार मराठ्यांच्या हाती आले. तसेच कैदेतील माणसांना सुद्धा बाळाजीच्या हवाली करण्यात आले. ता.२० मार्च १७१९ रोजी बाळाजी विश्वनाथ दिल्ली सोडून परत निघाला बाळाजी पुढे काशीयात्रा करुन जून महिन्यात औरंगाबादेत व जुलैत सातार्‍यावर पोहचला. शाहू महाराजांची मातोश्रीही सातार्‍यावर आली.

बाळाजी विश्वनाथ आणि इतर मराठे सरदार महाराष्ट्रात परत आल्यावर शाहूने त्यांचे सन्मानपुर्वक स्वागत केले. मल्हार रामराव चिटणीस लिहितो,"----बाळाजी व इतर महाराजाशी येवून पावले. महाराजपुढे सामोरे जाऊन सन्मान केला. दिल्ली येथे झालेल्या चकमकीत सुमारे १५०० मराठे धारातिर्थ मरण पावले होते. संताजी भोसले आणि बाळाजी भानू हे मराठा अधिकारी या चकमकीत मृत्यू पावले. बाळाजीने दिल्लीस असतानाच सय्यद बंधुकडून मराठ्यांच्या झालेल्या हानीची नुकसान भरपाई वसूल करुन घेतली होती. तथापि शाहूनेही मृत्यू पावलेल्या आप्तस्वकीयांस वतने, इमानपत्रे, वैगरे देवून कृतज्ञता दाखवली. संताजी भोसले यांच्या भावास (राजोजीस) दिल्लीच्या

बादशहानेच 'सवाई संताजीराव' असा किताब दिला भाचा मुलगा जनार्दन व भाऊ संताजी यांना शाहूने मोजे वाकसई गाव इनाम दिले. सेनापती दाभाडे खंडेराव यास इनाम दिले.''[५१] बाळाजीसही इनाम दिले. या मोहिमेतील सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे मराठ्यांचा जो राजपुत्राशी स्नेह घडून आला हा स्नेह भावी काळात मराठ्यांना काही वर्ष फायद्याचा ठरला.

### ३.४.५ मातोश्री येसूबाई यांची सुटका व महाराष्ट्रात आगमनः

महाराणी येसूबाई यांचे संपूर्ण आयुष्य कठीण प्रसंगाशी झुंज देण्यात गेले, परंतु त्यांचा शेवट मात्र गोड झाला. त्या दक्षिणेत येवून आपल्या मुलाजवळ (शाहू) राहून नंतर मृत्यू पावल्या.

इ.स. १६९० मध्ये येसूबाईला बादशहाने कैद करुन ठेवले. तेव्हा त्या संकटात त्यांनी मोठ्या चतुराईने वर्तन ठेवून इ.स. १७०६ पर्यंत शिताफीने दिवस काढले.

शिवदे स. स. लिहितात, ''येसूबाईच्या बाबतीत बाळाजीने जे कार्य केले ते इतिहास विसरु शकणार नाही. मोगली कैदेत २९ वर्ष खितपत पडलेल्या मराठ्यांच्या महाराणी परत आणण्याचे श्रेय बाळाजी विश्वनाथ यांचेच आहे''[५२] येसूबाईशी शाहू राजे यांचा पत्रव्यवहार होत असल्याचे जासूदांच्या वाटखर्चीच्या टिपणे उपलब्ध आहेत. तसेच शाहूराजे यांचे मातोश्रींच्या सुटके विषयीची पत्रे उपलब्ध आहेत. ती परिशिष्ट मध्ये देण्यात आली आहेत.

येसूबाई साताऱ्यास आल्याचे कोल्हापूरचे संभाजी राजे (दुसरे) यांना समजले. संभाजी आपल्या पत्रात छ. शाहूस लिहितो. ''मातुश्री आऊसाहेब आली, ते वर्तमान अवगत झाले.'' येसूबाई ता. ८ जुलै १७१९ रोजी साताऱ्यास आल्या साताऱ्यास असताना धार्मिक कार्यात सहभाग घेऊन वर्षासने दिली तसेच प्रशासनात देखील सहभाग घेतल्याचा उल्लेख मिळतो. उदा. गृहकलह मिटविण्याच्या बाबतीत येसूबाईंनी पुढाकार घेतला होता.

शिवदे स.स. लिहितात, ''ता. १३ एप्रिल १७३१ रोजी छत्रपती शाहू महाराज व छत्रपती संभाजी महाराज (दुसरे) कोल्हापूरकर यांच्यात वारणेचा तह झाला. त्यानंतर त्यांच्यात दिलजमाई झाली. यात येसूबाईचा सल्ला होता असे म्हटले जाते.''[५३]

येसूबाईचा मृत्यू झाल्यावर कोल्हापूरकर संभाजी राजे यांनी पाठविलेले पत्र,"श्रीमंत सकल तीर्थस्वरुप राजेश्री यांस विराजमान राजर्षी शाहू राजे वडिलांशी सेवेशी अपत्य संभाजी राजे दंडवंत मातोश्री येसूबाई साहेब यांनी वेधा होऊन कैलासवास झाला. हा मार्ग ऐसाच आहे. वडील सर्वज्ञ आहेत. विवेकेकरुन चित्तास सांत्वन होय. ते केले पाहिजे. विशेष लिहावे तरी वडील सूज्ञ आहेत."[५४] महाराणी येसूबाईच्या मृत्यूनंतर त्याचे वृंदावन संगम माहुली येथे छ. शाहू यांनी बांधले आहे.

### ३.४.६ पेशवा बाळाजी विश्वनाथांचा मृत्यू व योग्यता: ता ०२ एप्रिल १७२०:-

राज्याची नवीन व्यवस्था निर्माण केल्यानंतर बाळाजी विश्वनाथ फार दिवस जगला नाही. इ.स. १७१९ मध्ये कोल्हापूरवर स्वारी करुन संभाजीच्या कारवायांना प्रतिबंध करण्याचा प्रयत्न केला. सततच्या पराक्रमामुळे ता. ०२ एप्रिल, १७२० मध्ये बाळाजीचे निधन झाले.[५५]

पेशवा म्हणून बाळाजी विश्वनाथाची कारकीर्द अवघ्या सात वर्षांची झाली. परंतु या अल्पकाळात मराठ्यांच्या सत्तेचा पाया त्याने नव्याने बळकट केला. बाळाजीने कठीण प्रसंगी शाहूस साथ देऊन स्वत: दिल्लीस जाऊन मराठ्यांस नवीन राजकीय मंच उपलब्ध करुन दिला. छत्रपती शाहू महाराजांच्या अधिपत्याखाली मराठा मंडळाची स्थापना केली.

छत्रपती शाहू यांनी बाळाजीचा 'अतूल पराक्रमी सेवक' म्हणून मोठा गौरव केलेला दिसून येतो.

### ३.५ छत्रपती शाहू महाराज व मराठा मंडळाची निर्मिती:-

छत्रपती शाहू महाराजांच्या काळातील सर्वात मोठी महत्त्वपूर्ण राजकीय घटना म्हणजे मराठा मंडळाची किंवा संयुक्त राज्य व्यवस्थेची निर्मिती होय.

शाहू महाराजाने सत्ता हाती आल्यानंतर स्वत:ला राज्यभिषेक करुन घेतला व अष्टप्रधान मंडळाची नेमणूक केली. राज्याची व्यवस्था लावली. परंतु त्या आधी मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या वेळी अष्टप्रधान व्यवस्थेचा बोजवारा उडालेला होता. अमात्य, प्रतिनिधी, सेनापती यासारख्या प्रधानांच्या नेतृत्वाखाली मराठा सरदारांनी मोगलांविरुद्ध लढा दिला असला तरी, याकाळात काही कर्तृत्ववान मराठ्यांनी स्वत:च्या

हिंमतीवर आणि प्रसंगी धोका पत्करुन स्वतंत्रपणे मोगलांशी सामना केला होता. अशा मंडळीचा आत्मविश्वास वाढलेला होता. छत्रपती राजारामाने जहागिरी पद्धतीस प्रोत्साहन देऊन त्यांना लढण्यास प्रवृत्त केले. पुढे वतने मिळावीत अशी प्रवृत्ती मराठा सरदारास झाली. पुढे जेव्हा मोगलाच्या कैदेतून छत्रपती शाहू सुटून आल्यानंतर शाहू ताराबाईच्या संघर्षात मराठा सरदारांना महत्त्व आले. परिस्थिती अवघड झाली. छत्रपती शाहूने राज्यभिषेकानंतर नवे अष्टप्रधान नेमले, परंतु परिस्थिती अभावी परिणामकारक शासनयंत्रणा निर्माण करु शकले नाहीत. बड्या सरदारांपुढे नवे प्रधान निष्क्रीय ठरले. उदा. आंग्रे विरुद्ध बहिरोपंत पिंगळे होय. यामुळे मराठे सरदारांना पराक्रमाचे नवे क्षितीज निर्माण करुन देणे ही काळाची गरज ओळखून छत्रपती शाहू यांनी बाळाजी विश्वनाथाच्या साह्याने 'मराठा मंडळाची' योजना कार्यान्वित केली. या मराठा मंडळाच्या योजनेची माहिती प्रकरण चारमध्ये सविस्तर करण्यात आली आहे.

## ३.६ कोल्हापूरमध्ये राज्यक्रान्ती : इ.स. जुलै १७१४:-

शाहू महाराज आणि ताराबाई यांच्यामध्ये सत्तास्पर्धेचे आणि डावपेचाचे राजकारण चालू असताना यावेळी ताराबाई याच्या मनोरथांना प्रचंड हादरा बसला. तो खुद्द राजघराण्यातील घटनांनी. याविषयी माहिती देतांना गर्गे स.मा. लिहितात, ''या घटना अत्यंत वेगाने घडत असाव्यात. पण त्याची चाहूल मात्र ताराबाईंना लागली नाही. घटनांची परिणीती नाट्यपूर्ण सत्तातंरात झाली. या सत्तांतरामुळे ज्या घटना घडल्या त्या अशा की, ताराबाई व त्यांचे पुत्र शिवाजीराजे यांना राजसबाईच्या कैदेत पडावे लागले. राजसबाई यांचे पुत्र संभाजीराजे कोल्हापूर राज्याच्या गादीवर बसले आणि नवी राजवट सुरु झाली. या संघर्षाच्या ठिणग्या राजघराण्याबाहेर किंवा आत उडालेल्या दिसून येत नाही. त्यामुळे कारभाराच्या घडलेल्या या घटनेला 'रक्तशून्य संत्तातर' असेही म्हणता येतील.''[५६]

वस्तुत: हे सत्तातंर फार मोठे होते. ताराबाईसारख्या शूर स्त्रीच्या विरुद्ध जाऊन त्यांच्या हातातील सत्ता हस्तगत करणे सोपे काम नव्हते. परंतु त्यांना काही समजायच्या आत सत्तांतर झाले हे समजते. सत्तातंराचे प्रत्यक्ष कार्य इ.स. ऑगस्ट-सप्टेंबर १७१४ मध्ये घडले असावे. ता. २ ऑगस्ट १७१४ चे शिवाजी राजे यांचे शेवटचे पत्र आणि

ता. २५ सप्टेंबर १७१४ चे संभाजीराजे यांचे पहिले पत्र अशी दोन पत्रे उपलब्ध आहेत. त्या ५३ दिवसांच्या काळात केव्हातरी प्रत्यक्ष सत्तांतर घडून आले असावे.[५७] अभ्यासांती सत्तांतराची प्रक्रिया अचानक घडत नाही. ती प्रक्रिया इ.स. १७१२ पासूनच सुरु झाली होती. ताराबाई यांना एक-एक मात्तबर सरदार सोडून जावू लागेल. त्यात चंद्रसेन जाधव, दमाजी थोरात, शहाजी निंबाळकर, संताजी पांढरे, कान्होजी आंग्रे, खंडेराव दाभाडे ही मंडळी त्यांना सोडून कोणी निजाम तर कोणी शाहूंकडे गेले. त्यात चंद्रसेन जाधव ताराबाईकडे आला तेव्हा ताराबाई यांनी जुन्या लोकांना तुच्छतापूर्वक वागणूक देवू लागली, तेव्हा ही मंडळीपण नाराज होतीच.

गर्गे स. मा. लिहितात, ''या सत्तांतरात सर्वात महत्त्वाचा हात होता तो रामचद्रंपंताचा.''[५८] त्यांनी राज्य सुरळीत ठेवण्यासाठी हे पाऊल उचलले असे ते म्हणतात, सत्तांतराच्या कारणामागे ताराबाई व शिवाजीराजे यांचे जुलमी वर्तन कारणीभूत होते, हे संभाजी राजे यांनी जुल्फिकारखान यास पाठविलेल्या पत्रावरुन समजते. प्रजेच्या कल्याणासाठी कार्य करणे हे राजाचे कर्तव्य असते. परंतु माझे जेष्ठ बंधू शिवाजीराजे यांनी प्रजेचा छळ केल्याने मी राज्याची राजसूत्रे हाती घेतली आहेत व प्रजेच्या कल्याणासाठी झटत आहे.....''[५९] ही राज्यक्रांती शाहूराजे यांस अनुकूल झाली. यावेळी ताराबाई यांचा त्यांना होणारा उपद्रव थंड पडण्यास कारण झाली.

## ३.७ छत्रपती शाहू महाराज व पेशवा बाजीराव यांच्या नेतृत्वाखाली मराठ्यांचा साम्राज्य विस्तार : इ.स. १७२० ते १७४०

बाळाजी विश्वनाथने मराठा शक्ती काही प्रमाणात संघटित करुन स्वराज्याचे रक्षण केले. दिल्लीहून सनदा आणून त्याला बादशाहीची मान्यता मिळविली व मराठ्यांना शाहू महाराजांच्या नेतृत्वाखाली साम्राज्य विस्तारासाठी नवेनवे कार्यक्षेत्र मिळाले. परंतु यावेळी बाळाजीचा मृत्यू झाल्याने त्या जागी योग्य व्यक्तीची निवड होणे आवश्यक होते. तेव्हा त्या दृष्टीने शाहूमहाराजांनी पाऊल उचलण्यास सुरुवात केली.

### ३.७.१ बाजीराव पहिला यास पेशवेपदाची प्राप्ती : ता. १७ एप्रिल १७२०

बाळाजी विश्वनाथाच्या मृत्यूनंतर पेशवेपद कोणाला मिळेल याविषयी शाहू यांच्या दरबारात चर्चा चालू होती.कारण पेशवेपद वंशपरंपरागत नव्हते.शिवाय बाळाजी विश्वनाथाचा मोठा मुलगा बाजीराव केवळ एकोणावीस वर्षाचा असल्यामुळे पेशवेपदाची जबाबदारी त्याला झेपणार नाही, असे अनेक जेष्ठ मुत्सद्दांचे मत होते. खंडो बल्लाळ, श्रीनिवासराव प्रतिनिधी, खंडेराव दाभाडे, आनंदराव सुमंत, कोन्होजी आंग्रे, चिमणाजी दामोदर इ.अनेक मातब्बर माणसे वयाने आणि अनुभवांनी बाजीरापेक्षा मोठी होती. परंतु छत्रपती शाहूंनी उपयोगी नाही असे दिसल्यास पुढे विचार होईल असे सांगून बाजीरावावर जबाबदारी टाकण्याचे ठरविले. त्याप्रमाणे ता. १७ एप्रिल १७२० रोजी कऱ्हाडजवळील मसूर या ठिकाणी शाहूने पेशवाईची वस्त्रे बाजीरावास दिली.[६०]

बाजीरावास जरी पेशवाईची वस्त्रे मिळाली तरी त्याच्यापुढे अनेक समस्या होत्या.त्यात प्रामुख्याने दक्षिणेच्या सुभ्यातील चौथाईची वसूली बादशहाने जरी सनदा दिल्यातरी त्याचे सुभेदार, सरदार हे मराठ्यांना चौथाई वसूलीत अडथळा निर्माण करीत होते. तेव्हा त्यांचा बंदोबस्त सर्वप्रथम करणे आवश्यक होते. दुसरी गोष्ट म्हणजे निजामाने उभी केलेली अडचण म्हणजे संभाजी-शाहू यांच्यातील आपसातील वादाचा त्याने घेतलेला फायदा होय. थोडक्यात म्हणजे-

सहस्त्रबुद्धे पु. ग. हे महाराष्ट्र संस्कृती या ग्रंथात लिहितात की, ''भारतभर भिन्नभिन्न प्रदेशात सत्ताधारी असलेले मुस्लिम सुभेदार, नवाब ही मराठी साम्राज्य विरोधी अशी पहिली शक्ती. या सरदारांना फितूर होऊन शाहू छत्रपतींना बुडविण्यास सज्ज होणारे मराठा सरदार ही दुसरी शक्ती तिसरी शक्ती, छत्रपती घराण्यातील कौटुंबिक कलह व शाहू छत्रपतीचे प्रतिनिधी, अमात्य, सुमंत, मंत्री, सेनापती इ. पेशवे विरोधी सर्व पिढीजात लोक होते.''[६१]

वरील सर्व आव्हाने ओळखून व या जेष्ठ मंडळीचा विरोध पाहून बाजीरावांनी प्रथमपासून शिंदे, होळकर, पवार ही जिवास जीव देणारी समवयस्क मंडळी आपल्या

भोवताली जमविली. छत्रपती शाहू यांच्या नेतृत्वाखाली मराठा साम्राज्य वाढविण्यास सुरुवात केली.

बाजीरावाचे एकंदर ध्येय धोरणे पाहून मराठ्यांचा पहिला इतिहासकार ग्रॅड डफ म्हणतो, "Bajirao has the head to plan and the hand to execute."[६२]

### ३.७.२ छ. शाहू महाराज व निजाम संबंध:-

निजाम हा फार दिवस दक्षिणेत राहिल्यामुळे त्यास इकडची भाषा, रिवाज, पूर्व इतिहास यांची चांगली माहिती होती. औरंगजेबाच्या राजनितीचे त्यास बाळकडूच होते. दिल्लीतील धामधुमीचा फायदा घेऊन दक्षिणेत स्वतंत्र पंथ काढण्याचा त्याने विचार चालविला, परंतु दुर्दैवाने या प्रसंगी दक्षिणेचा कारभार त्याच्याकडे दोन वर्षांपेक्षा जास्त राहिला नाही. परंतु या दोन वर्षाच्या कालखंडात त्याने मराठ्यांस चौथाई वसूल करू द्यावयाचा नाही असा प्रथम पासून निश्चय करुन त्याप्रमाणे आपला उद्योग सुरु केला.

यावेळी निजामाने शाहू कडील सेनापती चंद्रसेन जाधव, इतर सरदार सर्जेराव घाटगे, रंभाजी निंबाळकर इ.ना. आपल्याकडे वळविले व छ. शाहू यास त्रास देण्यास सुरुवात केली, परंतु शेजवलकर त्र्य.व. लिहितात, "शाहूच्या सुदैवाने स. १७१५ च्या एप्रिलात दक्षिणेतून निजामाची बदली होऊन तो रागारागाने ताबडतोब निघून उत्तरेत गेला,"[६३] औरंगाबाद येथे निजाम मोठ्या थाटमाटाने राहत असे.

### ३.७.२.१ निजामाचा भाग्योदय:-

यावेळी दिल्लीचे राजकारण क्षणाक्षणाला रंग पलटत होते. ते निजाम पाहत होता. दिल्लीत सय्यद बंधुचे वर्चस्व होते. या सय्यदांचे व निजामाचे संबंध चांगले नव्हते. निजामाला दक्षिणेचा कारभार हवा होता, परंतु सय्यदानी त्याची नेमणूक बिहार प्रांतावर केली. निजाम तिकडे गेला नाही. पुढे त्याची नेमणूक माळव्याच्या सुभ्यावर होऊन तो ता. १५ मार्च १७१९ रोजी तो ऊज्जैनला गेला.[६४] यावेळी त्याने माळ्यात मोठी फौज उभारली. याबद्दल सय्यदानी त्यास जाब विचारला तेव्हा निजामाने उत्तर देण्यास टाळाटाळ केली व मराठ्यांचे कारण पुढे दाखविले. तेव्हा सय्यद बंधुनी निजामाचे पारिपत्य करण्यासाठी दिलावर अलीखान त्यानंतर आलमआलीखान यांना पाठविले, परंतु खांडव्याच्या लढाईत (इ.स. जून १७२०) दिलावर आलीखानचा संपूर्ण पराभव

झाला. या लढाईत सय्यदांचे मोठमोठे सरदार मारले गेले. यापुढे सय्यदबंधु घाबरले. नंतर त्यांनी आलमअलीस निजामावर पाठविले. यावेळी मराठ्यांनी पण आलमअलीस मदत दिली त्यात संताजी शिंदे, खंडूजी दाभाडे, शंकरजी मल्हार, कान्होजी भोसले ही मंडळी शाहूच्या हुकूमाने १७-१८ हजार फौजेनिशी आलमअलीच्या मदतीस आली. पुढे बाळापूर येथे लढाई होऊन त्यात आलमअलीचा पराभव होऊन त्यास ठार मारण्यात आले. या लढाईत आलमअलीने उतावीळपणे मराठ्यांस सोबत न घेता घाइघाईने चालून गेला त्यामुळे त्याचा मृत्यु झाला. लढाईत मराठ्यांचे एकंदर ६३४ सैनिक पडले व शंकराजी मल्हार जखमी झाले. परंतु मराठ्यांनी निजामाकडील पुष्कळ खजिना लुटून आणला.

देशपांडे प्र. न. लिहितात, ''त्यानंतर ऑक्टो. १७२० च्या सुमारास निजामाचा बंदोबस्त करण्यासाठी निघालेल्या सय्यद हुसेनचा तुरांनी लोकांनी खून (ता. ९ ऑक्टो. १७२०) केला व नोव्हेंबर मध्ये अब्दुलाला कैदेत टाकून बादशहा सय्यदांच्या वर्चस्वातून मुक्त झाला.''[६५] त्याचप्रमाणे निजामाचा दक्षिणेतील मार्ग निष्कंटक झाला.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''मराठ्यांचा प्रवेश दिल्लीत होऊन त्याची कारस्थाने यशस्वी होण्यास येथील अंतस्थिती अनुकूल होती. बनीया रतनचंद हा अब्दुला सय्यदाचा ऊजवा हात होता व हा हिंदुचा पुरस्कर्ता होता. त्यानेच मराठ्यांस मदत केली.''[६६] परंतु यास बादशहाने सय्यद बंधुच्या उच्चाटनानंतर ता. १३-११-१७२० रोजी ठार मारले.

### ३.७.२.२ बाजीराव व निजाम भेट:-

दक्षिणेतील आपला मार्ग निष्कंटक झाल्यानंतर छत्रपती शाहू विरोधी कारस्थान करण्यास निजामाने प्रारंभ केला.

देशपांडे प्र. न. लिहितात, ''बाळापूरच्या लढाईनंतर चिखलठाणा याठिकाणी जाने. १७२१ रोजी निजाम आणि बाजीराव यांची पहिली भेट झाली. या भेटीत काहीही निष्पन्न झाले नाही.''[६७]

यावेळी छत्रपती शाहू विरोधी निजामाने उपस्थित केलेला मुद्दा मराठेशाहीस आव्हान देणारा होता. तो मुद्दा म्हणजे छ. शाहू व संभाजी यांच्यामध्ये खरा छत्रपती कोण हे निश्चित ठरल्याशिवाय दक्षिणेतील मोगल सुभ्यातून चौथाई वसूल करण्याचा अधिकार

नाही असा निजामाचा दावा होता. परंतु बादशहाने दिलेल्या सनदाप्रमाणे शाहूस मान्यता मिळाली होती. परंतु प्रत्यक्ष मराठ्यांतील दुहीमुळे निजामाने त्यांचा फायदा घेतला व त्यायोगे आपले वर्चस्व प्रस्थापित करावयाचे होते.

### ३.७.२.३ निजामास दिल्लीची वजिरी प्राप्त : इ.स. १७२१:-

निजामाचा चुलतभाऊ आमीनखान सय्यदाच्या पश्चात वजिरीवर होता. तो इ. स. १७२१ च्या फेब्रुवारीत मरण पावला तेव्हा बादशहाने अनेकांचा सल्ला घेऊन त्या जागी निजामास नेमले. तेव्हा निजामास हे पद नको होते. कारण त्या पदाने त्यास फायदा नव्हता. उलट दक्षिणेत त्याचा जम बसत होता. परंतु विचाराअंती त्याने मुबारीजखानास आपला दुय्यम नेमून ता. २१ ऑक्टो. स. १७२१ रोजी औरंगाबादेहून उत्तरेकडे प्रयान केले.[६८] या सर्व बदलावर छ. शाहू व बाजीराव लक्ष ठेवून होते. छत्रपती शाहूने आनंदराव यास निजामाबरोबर दिल्लीस पाठविले.

मुबारीजखानाने मराठ्यांचा उच्छेद चालविला ते पाहून बाजीरावाने निजामाच्या अनुपस्थितीचा लाभ घेऊन चोहीकडे चढाईचे धोरण आखून दहशत निर्माण केली. छत्रपती शाहूंना पण याची चिंता वाटली. त्याने इ. स. १७२२ ला एक खरमरीत पत्र बाजीरावास पाठविले ते असे, "तुम्ही विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. कित्येक निष्ठेचे अर्थ लिहिले, ऐशास, कित्येक अर्थ समक्ष बोलावे म्हणोन तुम्हांसच हुजूर येण्याची आज्ञा करुन वरचेवर पत्रें सादर जालों असतां, अद्याप येण्याचा विचार दिसत नाही. यावरुन काय म्हणावें! निष्ठेचें निदर्शन स्वामींस यावें म्हणोन तुम्हांस वारंवार लिहिलें व भेटीसही येण्याची आज्ञा केली असतां, आळस होऊन दिवस घालवितां. ये गोष्टीचा विचार तुम्हांजवळच असावा. तुम्हींच उद्योग केलीया अगाध नाहीं. परंतु हैगैनें घडत नाहीं. दुसरें, स्वामिसन्निध उभयपक्षींचे कल राखून चालण्यास एक चांगला योजावा म्हणोन लिहिलें, त्याचाही विचार तुम्हींच करावयाचा तोही न घडला. यामुळें कितेक राज्यभारसंबंधी कार्ये तटलीं. तुमचेही प्रत्ययास येऊन, त्याची उत्तरें प्रत्युत्तरें तुम्हींच करितां त्यांची विस्मृति. तेव्हां मुमचे लक्षांत हे गोष्ट नाहींसें वाटतें. हे कच्चे कप्पे वरचेवर लिहून तुम्हांस जागृत करण्याविषयीं स्वामीस आळस नाहीं. तुम्ही आज कराल, उद्यां कराल म्हणोन कालहरणही हुजूरून होत नव्हतें. प्रत्यय तुम्हांस नाही. असें असोन

नबाबाकडीलही बोलणीं पडलीं, याजकरितां सुचविलीं. तथापि तुम्हीं कळकळ धरुन राज्यभार-संरक्षणार्थ सावधता करावयाची हें सदैव पत्री किती लिहावें! यास्तव एक वेळ तुम्हीं येऊन समजोन घेऊन करावें. हें आळस असतां घडत नाहीं, हेंच अश्चर्य करितों. असो. कांहीं दिवस एक वेळ समक्ष झाल्या व्यतिरिक्त कोणतेंही कर्तव्य स्वामीस नाहीं. पुढें तुम्हांपासोन घडतच नाहीं असा निश्चय जालीया, स्वामींस विचार करणें प्राप्त येईल. तो दिवस अवघड वाटेल, मग धावाधाव करुं लागाल, म्हणोन वारंवार सुचवितों. तुमचे वडिलांनी निष्ठा धरुन चालल्या अकल्याण जालें न जालें हे तुम्हींच चित्तांत आणावे. जाणिजे.''[६९]

निजाम आता दिल्लीस जाऊन काय उपदव्याप करतो त्यावरच बाजीरावचे पुढील धोरण अवलंबून होते. परंतु दिल्लीस बादशहा व निमाज यांचे संबंध बिघडले त्यामुळे निजामास वजिरीत रस राहिला नव्हता. तेव्हा निजामाने काही धोरणे आखून गुजरात व माळवा हे दोन प्रांत हाताखाली घेण्यासाठी उत्तरेकडून चालून आला. याचवेळी बाजीरावही इ. स. १७२२ मध्ये खानदेशातून मकडाइवरुन माळव्यात धार बाजूस गेला. इकडे चंद्रसेन सोबतच्या युद्धात संताजी मारला गेल्याने त्याचा वचपा काढण्यासाठी तर ता. २८ जुलै १७३३ रोजी शाहूने सरदारास जाहिर ताकीद पाठविलेली आढळते.[७०]

दिल्ली दरबारी निजामाचे आसन डळमळीत झाले होते. त्यामुळे आणीबाणीच्यावेळी बादशाहीचे शत्रू आपल्या कच्छपी असलेले बरे या उद्देशाने निजामाने झाबवानजीक बदकशा (बोलाशा) येथे बाजीरावाची भेट घेतली ता. १३ फेब्रुवारी ते १९ फेब्रुवारी पर्यंत बोलणी झाली.[७१] यातून काहीही हाती आले नाही. दोघेही आपला अंतस्थ हेतू लपवित होते.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''बादशहास गुजरात, माळवा व दक्षिण हे तीन प्रांत निजामाच्या हाती जाणे आवडले नाही म्हणून बादशहाने निजामाची नेमणूक अयोध्या प्रांतावर केली. त्यामुळे नाराज निजामाने वजीरी सोडून ता. ६ डिसें. १७२३ ला अयोध्येकडे प्रयान केले व रस्त्यातूनच बादशहाच्या विनापरवानगीने बंड करुन दिक्षिणेकडे निघाला व उज्जैनेस आला.''[७२] बाजीरावास या हालचाली कळत होत्या त्यास अटकाव करण्याच्या उद्देशाने तो ता. २६ जाने. १७२४ रोजी उत्तरेकडे निघाला व

पुढे निजामावर टेहळणी ठेवित बढवाह जवळ मुक्काम करुन राहिला. निजामाने आपली छावणी सिहोर येथे ठेवली. बादशहास निजामाचे हे बंड न आवडून त्याचे परिपत्यासाठी मूबारीजखानास दक्षिणेच्या सुभेदारीवर कायम करुन त्यास निजामांवर पाठविले.

रियासतकार सरदेसाई लिहितात की, ''शाहूलाही बादशहाने कळविले 'ही आणीबाणीची वेळ आहे, तुम्ही निजामाचा पाडाव करण्यात सर्वतोपरी आपले साह्य करावे, म्हणजे तुमचे जे काही मनोदय असतील ते सर्व पुरे करु.''[७३] शाहू महाराजांना हा नवीन पेच उत्पन्न झाला. निजामाचेही मदतीविषयी बोलणे आले. दोघेही मराठ्यांचे पक्के विरोधक कोणास मदत करावी हा त्याच्यापुढे प्रश्ना पडला होता. शाहू राजनिशीतील कित्येक कागदे यावेळची शाहू यांची तारांबळ स्पष्ट दाखवितात.'

ता. १७ फेब्रु. १७२४ मध्ये छ. शाहूने सरदारास निकडीची पत्रे पाठवून फौजेनिशी सामील होण्याची आज्ञा दिली आणि भागानगर प्रांती जाण्यास सांगितले. यावरुन मुखारीजखानावर शाहू यांनी चालून जाण्याची तयारी केली होती हे स्पष्ट होते. बाजीराव माळव्यात असताना ता. १८ मे १७२४ रोजी धारेजवळ लालच्छा येथे त्यांची व निजामाची तिसऱ्यांदा भेट झाली.[७४] निजामाने मदतीची मागणी केली असावी. या वेळी मराठी दरबारास निजाम व मुबारिजखान याच्या झगड्यात आपल्या मागण्या मंजूर करावयाच्या होत्या. छ. शाहूंनी ही युक्ती मोठ्या विचाराने काढलेली होती हे समजते.

यावेळी बाजीराव हा निजामास भेटून पुण्यास येऊन राहिला. शाहूस न भेटताच परस्पर पुण्यात गेल्याने शाहू महाराज त्याच्यावर नाराज झाले. त्यांची नाराजी पुढील पत्रातून व्यक्त होते, ''तुम्ही पुण्यास जाऊन राहिला, राजश्री स्वामीचे दर्शनास साताऱ्यास गेला नाही हे कार्याचे नाही याऊपरी दिवसगत लावू नये.''[७५] यावरुन शाहू महाराजाने कारभारातील चोख लक्ष कसे होते व प्रसंगी आपल्या मर्जीतील लोकांसही दरडावीत असे हे समजते.

बाजीरावाने बलाबलतेचा मागोवा घेऊन यावेळी तटस्थ राहावयाचे ठरविले व साताऱ्यास जाऊन महाराजांची भेट घेऊन त्यांची नाराजी दूर केली. ता. २९ जुलै १७२४ रोजी शाहू यांनी कान्होजी भोसल्यास कळविले की ''निजाम उल्मुक व शहमतखान यांनी युद्ध आरंभीले आहे, तर तुम्ही कोणाकडेही न जावे.''[७६] बाजीरावाने

या मोगल यादवीचा फायदा घेऊन दक्षिणेकडील मुख्य ठाणे बुऱ्हाणपूर आटोक्यात आणले.

### ३.७.२.४ साखर खेर्डल्याची लढाई :ऑक्टो. १७२४:-

निजाम व मुबाजारीजखान यांचा संघर्ष निकारावर येत होता. बाजीराव याकडे लक्ष ठेवून होता. निजामाने आपली तयारी करुन बाजीराव व मराठ्यांची फौज जमवली होती. ती बरोबर घेवून ता. ३ सप्टेंबर मध्ये त्यांनी औरंगाबाद सोडले. साखर खेर्डला या गावी दोघांत इ.स. ऑक्टो. १७२४ मध्ये युद्ध होऊन मुबारिजखान मारला गेला आणि निजामाचा जय झाला. निजामाने साखरखेडलेल्या या गावास फत्तेखर्डा हे नाव दिले.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''महत्त्वाचा भाग म्हणजे या लढाईत मराठ्यांनी भाग घेतला की नाही. कारण खूद शाहूची आज्ञा कोणत्याही बाजूस सामील न होण्याची होती. प्रसंगी बादशहास मदत करणे या मुख्य अटींवरच शाहूचे एकंदर अस्तित्व अवलंबून होते. परंतु प्रत्यक्ष जवळ असलेल्या बाजीरावास तटस्थ राहणे शक्य नव्हते.[७७]

यावेळी बाजीरावाचा ओघ निजामाकडे होता कारण मुबारीजखानाने मराठ्यांस दिलेला त्रास, त्याची घमंडी वृत्ती होय. थोडक्यात मराठी फौजांनी मुबारीजखानास साखरखेर्डलयात कोंडले आणि नंतर निजामाच्या सैन्याने त्यांचा फडशा उडविला. मुबारिजखानाचा मोड झाला. त्यात पथके जखमी झाली. त्यांच्या सेवेस खर्च दाखल असून राणोजी शिंद्यास रुपये दहा व राणोजी भोसल्यास रुपये आठ दिलेले आढळतात.

इतिहाससंग्रह पेशवेदप्तरातील माहितीनुसार, ''सरकारचा चाकर बाबाखान युद्धी ठार झाला. त्याच्या मुलास शाहूने इनाम दिले.''[७८] यावरुन आपण बादशहाकडे आहोत हे दाखविणारे त्याचे राजकारणी धोरण होते हे स्पष्ट होते.

निजामाने दूरदृष्टी ठेऊन मुबारिजखानाचा पुत्र, जनानखान, त्याचे साह्यकर्ते यांना प्रेमाने वागविले व त्यांचा लोभ संपादला. देशपांडे प्र. न. लिहितात, ''फारसी ग्रंथकर्माच्या माहितीवरुन 'शहामतपनाह' (शौर्यभूषण) म्हणून निजामाने बाजीरावाचा गौरव केला,''[७९] तसेच औरंगाबादच्या चौथ्या भेटीत यावेळी बाजीरावाचा गौरव करुन त्यास सप्तहजारी मनसबदारी दिली. हत्ती, पोषाख, मुल्यवान वस्तु देवून रवाना केले.

साखरखेर्डल्याचा लढाईमुळे निजामाचे दक्षिणेतील स्थान पक्के झाले व मराठ्यांना निजाम हा कायमची डोके दुखी झाला.

निजाम मोठा कार्यसाधू होता. त्याने बादशहास सौम्य पत्रे लिहून त्याचा रोष दूर केला. तसेच आपण बादशहाचे ताबेदार ही भाषा कधीही सोडली नाही. ही राजकारणी धुर्तता परिणामास आली. बादशहानेही द्वेष नको अशा विवेकाने त्याचे सारे अपराध माफ करुन त्यास 'आसफजहा' ही पदवी दिली व गुजरात प्रांत काढून दक्षिणेच्या प्रांतावर त्याची कायमची नेमणूक केली. पुढे निझाम हैद्राबादेस गेला व हैद्राबाद ही राजधानी निजामाची बनली.

इकडे शाहूचे धोरण होते की, सर्वांना प्रांत वाटून त्यावर नेमावे जेणे करुन आपसातील संबंध चांगले राहतील. त्यानुसार बाजीरावास उत्तरेकडे ठेवावे व दक्षिणेकडे फत्तेसिंग वगैरेना ठेवावे; कारण प्रतिनिधी व बाजीरावाचे पटत नसे. परंतु अपरिहार्य कारणाने बाजीरावास कर्नाटक स्वारीस जावे लागले.

### ३.७.२.५ छ. शाहू यांची कर्नाटकावर स्वारी : निजामाचे मराठे विरोधी धोरणः-

यावेळी कर्नाटकाचे दोन भाग होते बालघाट व पाइनघाट श्रीरंगपट्टम येथे वोडीयार घराण्याचे राजे होते, विजापूर व गोवळकोंडावर मोगलसत्ता होती. परंतु यातील बराच भाग छ. शिवाजी व त्याचे बंधू एकोजी यांच्या ताब्यात होता. पुढे संताजी घोरपड्याच्या कुटुंबाने बराचसा कर्नाटकीय प्रदेश आपल्या ताब्यात आणला. गुत्तीवर मराठेचे मजबूत ठाणे निर्माण केले. अर्काट येथे सादातुल्लाखानाने कायमचे वास्तव्य करुन तेथे अबली नवाबाची राजधानी स्थापन केली. थोडक्यात, यावेळी कर्नाटकात अर्काटकर सादातुल्लाखान व इतर स्थानिक नवाब मुस्लिम पक्षातील व श्रीरंगपट्टणकर वोडियार, तंजावर भोसले, राजे रणे शरफोजी व गुलीकर घोरपडे हिंदू पक्षात होते.

छ. शाहू यानी तिकडे निजामाचे प्रभुत्व न बसता आपले प्रभुत्व बसविण्यासाठी कर्नाटकवर स्वारीची योजना आखली. यावेळी शरफोजीनेही छ. शाहूकडे मदत मागितली होती.

सरदेसाई गो. स. या मोहिमेच्या शाहू महाराजांच्या उद्देशाबद्दल लिहितात, "...मराठी सत्तेचा फैलाव थेट दक्षिणेपर्यंत करणे व शिवाजी महाराजांनी रुजविलेल्या हिंदुपद पातशाहीच्या बीजास खतपाणी घालून वाढविणे हे मुख्य उद्देश साधण्यासाठी शाहूने कर्नाटकात फौज पाठविण्याचे ठरविले. वडिलांचे उद्देश सिद्धिस नेणे हे पवित्र कर्तव्य शाहूस वाटत होते. उगाच असंबंध गोष्टीने कोणतीही गोष्ट व्यवहारात घडत नसते."[८०]

गर्गे स.मा. लिहितात, "या मोहिमेची तयारी म्हणून शाहू यांनी संभाजी महाराजांचा विरोध होऊ नये यासाठी त्यांच्याशी करार करण्याचे ठरविले."[८१]

असा करार ता. ३ डिसे. १७२५ रोजी झाला असा उल्लेख सापडतो. परंतु प्रत्यक्ष करार होऊन दोन्ही बाजूकडून सह्या झाल्या होत्या की, जो केवळ कराराचा मसुदा होता हे समजण्यास मार्ग नाही.

गर्गे स. मा. लिहितात, "या करारानंतर थोडेच दिवसांनी म्हणजे मार्च १७२६ मध्ये साताऱ्याच्या फौजांनी कर्नाटकात प्रवेश केला आणि काही भाग ताब्यात घेऊन मे १७२६ मध्ये फौजा साताऱ्याला परत आल्या. पुन्हा ऑक्टोबर १७२६ मध्ये बाजीराव आणि खंडेराव दाभाडे साताऱ्याहून निघाले. सोघ्याला त्यांनी दहा दिवस मुक्काम केला. फेब्रु. १७२६ मध्ये ते श्रीरंगपट्टणास होते व १७ एप्रिलला साताऱ्यास पोहचले."[८२] या स्वाऱ्यात बाजीराव व आर्काटकर नबाबाचा तह झाला होता. तो नवाबाने पंधरा वर्ष पाळला. या तहान्वये मराठ्यांनी त्या प्रांतात आपले चौथाई आणि सरदेशमुखीचे हक्क लागू केले.

ही सर्व मोहिम पार पडेपर्यंत शाहू महाराजांनी निजामाशी तडजोडीचे धोरण ठेवले होते. पण निजामाला या मोहिमेमुळे मराठ्यांच्या फौजेचे विशेषत: बाजीरावाचे बळ वाढत असल्याची जाणीव झाली आणि त्याने ते बळ खच्ची कसे करता येईल याचे मनसुबे आखण्यास सुरुवात केली. या कामी निजामाने करवीर छत्रपती संभाजीना हाताशी धरले. त्याने चंद्रसेन जाधवास हाताशी घेऊन मराठेशाहीची पोखरणी चालविली. त्याने कर्नाटकात फौजा पाठविल्या तसेच कान्होजी भोसले, सुलतानजी निंबाळकर सरलष्कर यास फितविण्यास सुरुवात केली.

पेशवे दप्तरातील माहिती नुसार ''हैबतराव पुत्र सुलतानजी निंबाळकर हा इ.स. १७१४ पासून सरलष्करीवर होता. इ. स. १७२६ त शाहूला त्याची फितुरी आढळली म्हणून शाहूने प्रथम त्याजवळ आपल्या तर्फेचा नवीन कारभारी नेमिला आणि त्यास आपल्याजवळ बोलाविले परंतु तो निजामाकडे गेला म्हणून सुलतानजीचा भाऊ दिघोजी यास सेवेत घेऊन पुढे त्यास सरलष्करी शाहूने दिली.[८३]

कर्नाटकातील पूर्वेचा भाग राहिल्याने छ. शाहूच्या मनात हुरहुर राहून गेली. इ.स. १७२६ व इ.स. १७२७ च्या दोन्ही स्वाऱ्यात मुरारराव हजर होता. त्याचा विशेष उपयोग झाला. इ.स. १७३० मध्ये मूराररावने साताऱ्यास येऊन शाहूची भेट घेतली. छ. शाहूने त्याचा गौरव केला. नंतर त्याचे वकील छ. शाहूकडे सतत जात येत असत. कर्नाटकात बाजीरावांच्या नेतृत्वाखाली मराठ्यांचे वर्चस्व वाढत असतानाच इ.स. १७२६ नंतर निजामाने चढाई चालविली तिला तोंड देण्यासाठी बाजीरावास परत बोलाविल्याने कर्नाटकाची कामगिरी अर्धवट राहिली. परंतु शाहू यांनी आग्रहधरुन इ.स. १७४० मध्ये तो कार्यभाग पूर्ण केला.

### ३.७.२.६ करवीरकर संभाजी यांचे बंड : छ. शाहू व निजाम संघर्ष :-

मराठ्यांना बलहिन करण्याचे प्रयत्न निजाम करीत होता. सरदेसाई गो. स. लिहितात, ''वास्तविक शाहूची सामवृत्ती एवढी अढळ होती की, एकदम निजामास दुखवू नये, शक्य तितक्या तडजोडीने वागून त्याचा संतोष ठेवावा. पण संभाजीद्वारा प्रत्यक्ष शाहूलाच उखडून काढण्याचा घाट निजामाने अवलंबिला तेव्हा त्याचाही दमखाऊपणा खलास झाला. मात्र परिणाम घडून येण्यास तिनचार वर्ष लागली.''[८४]

संभाजी व त्यांची महाराणी राजसबाई यांचाही समज ताराबाई सारखाच होता. परंतु शाहू महाराजांच्या वर्चस्वामुळे त्यांना नमते घ्यावे लागले, मात्र संधी मिळताच शाहू विरुद्ध उठत. निजामानेही हा अंतर्गत कलह ओळखला होता. त्यानेही संभाजीस पाठबळ दिले. संभाजीराजे यांच्याशी निजामाच्या घातक हालचाली लक्षात घेऊनही शाहू महाराजांनी करारा संबंधी पुढाकार घेतला असावा कारण याचा फायदा निजामास न मिळवू देण्याचा होता. परंतु निजाम व संभाजीराजे यांची चंद्रसेन जाधवामार्फत सलगी चालली होती हे पुढील पत्रावरुन समजते.

संभाजीने निजामाला लिहिलेल्या एका पत्रात म्हटले की, ''तुमचे पत्र मिळाले तुम्ही कारभारी म्हणून दक्षिणेत आला हे कळून समाधान वाटले. शंकराजी पंडीत यांच्यामार्फत मी जी मागणी तुमच्यापाशी केली आहे ती परिपूर्ण होईल.''[८५]

केवळ पत्रोपत्री काम भागणार नाही असे वाटल्यावरच की काय संभाजीराजे यांनी निजामाची प्रत्यक्ष भेट घेण्याची इच्छा व्यक्त केली आहे. ते म्हणतात, ''राय अमरसिंग यांच्याकडून आनंदाची बातमी कळाली की, बादशहानी खास फर्माने काढून तुमचा गौरव केला आहे. तुमच्या आगमनाची मार्गप्रतिष्ठा करीत आहे. हेतु हा की माझी मागणी समक्षच विदीत करावी...''[८६] यावरुन निजाम व संभाजीमहाराज यांची सलगी वाढत होती व निजाम हा संभाजीस पैसा सुद्धा पुरवित होता हे समजते व संभाजीराजे यांचा चंद्रसेन जाधव यावर फार विश्वास होता, याची कल्पना येते.

कडप्याच्या नवाबाला लिहिलेल्या पत्रात निजाम म्हणतो, ''संभाजीची मदत करणे भागच होते आणि तसे केल्यामुळे बाजीरावची कंबर खचली असेल,''[८७] बाजीराव व प्रतिनिधी कर्नाटकात असता संभाजीने शाहूवर चढाई करावी असा घाट निजामाने आखला होता. खुद्द निजाम अदवानी पावेतो गेला होता.

जगाच्या व्यवहारात अंगचा पराक्रम हाच प्रत्येकाचा मुख्य अधार असतो. दुसऱ्याच्या पराक्रमावर अवलंबून राहणाराचे भाग्य वाढत नाही. तसाच प्रकार संभाजीचा झाला. शाहू महाराजांनी नेकीने वागून अनेक पराक्रमी माणसे जमवून स्वराज्य वाढवून राष्ट्रोपयोगी कामे घेतली. सातारा वासीयाकडील तह मोडून स्वार्थ साधावा हा अर्थ निजामाने संभाजीस सांगून पाठविला. तसेच शाहूकडील राजाराम चिमणाजी पंडीत ही संभाजीस जाऊन मिळाला.

अशा प्रकारे इ.स. १७२६ अखेर या कारस्थानाची कथा शाहूच्या कानावर येत गेली. तेव्हा त्यांनी बाजीरावास ताबडतोब परत बोलाविले.

गर्गे स. मा. लिहितात, ''शाहू महाराजांचे प्रयत्न तीन दिशांनी चालू होते. प्रथम राजसबाईकडून संभाजीची समजूत काढणे, दुसरी निजामाविरुद्ध लष्करी तयारी करणे, तिसरी निजामाशी तडजोडी करणे होत.''[८८]

संभाजीस समजाविण्यासाठी राजसबाईस लिहिलेल्या पत्रावरुन शाहू महाराजांची व्यापक भावना लक्षात येते. ती अशी, "आमचे बंधू बाबाजी (संभाजी) यांच्या मनात चंद्रसेनामार्फत निजामाला भेटावयाचे होते आणि त्यांनी तसे केले असे ऐकतो. मोगल हे नेहमी वरचढ होण्यासाठी आणि आपला स्वार्थी हेतू साध्य करण्यासाठी अशा संधीची वाट पाहत असतात. मी त्यांना पुरेपूर ओळखतो. या गोष्टीचा शेवट वाईट होईल कारण त्यात कपट आहे. ते मी आपल्या नजरेस आणतो. दगलबाजी होईल यात शंका नाही. आमच्या घराण्यापैकी मोगलावर कोणीच विश्वास ठेवला नाही, असे असता ही भेट का घडून यावी. बाबाजीचा चंद्रसेनावर विश्वास आहे. पण तो एक दगलबाज मनुष्य आहे. आपल्या वडिलांचा सल्ला मानता तो आम्हास सोडून मोगलास जाऊन मिळाला."[८९] या पत्रावरुन त्याची भावना तसेच मोगलांचे कपट ओळखण्याची बुद्धी, मुत्सद्दीपणा, दूरदृष्टी हे गुण उठून दिसतात.

परंतु भावनात्मक अवाहनाचा परिणाम दिसत नाही ते पाहून अंतर्गत तडजोडी बरोबर बाजीरावास कर्नाटकातून तातडीने बोलाविलेले दिसते. प्रसंग कठीण होता निजाम व चंद्रसेन कारस्थानात कितीही निष्णात असले तरी स्थीर बुद्धी व राजकारणात शाहू व बाजीरावाशी बरोबरी करणारे नव्हते. त्यामुळे निजामाच्या साह्यायाचा संभाजीस फायदा न होता उलट घात मात्र झाला. इ.स. १७२६ च्या दसऱ्या पासून इ.स. १७२८ च्या मार्चपर्यंत म्हणजे पालखेडच्या संग्रामापर्यंत संभाजी निजामाबरोबर होता.

### ३.७.२.७ निजामाचा कारस्थानी उद्योग:-

निजामास मराठ्यांचे खच्चीकरण करावयाचे होते. छ. शाहू यांच्या फौजा कर्नाटकात गेल्याचे पाहून त्याने आपल्या कारस्थानी उद्योग सुरु केला प्रथम उदाजी चव्हानास नोकरीत ठेऊन त्यास तीस हजार मनसब व दहा लक्षाची जागीर देण्याचा ठराव केला. तसेच बाजीरावास त्रास देण्यासाठी त्याने सूमत प्रतिनिधी मार्फत निजाम शाहूस कळवी की आम्ही तुमच्याशी स्नेहभावाने आहोत. मात्र तुमचे पेशवे आमचा उच्छेद करतात, तो बंद ठेवा", निजामाचा हा कांगावा प्रथम सुमंत व शाहू यांना खरा वाटला परंतु नंतर सर्व प्रकार कळाला तेव्हा एक वर्ष गेले.

संभाजी व त्याचा पुत्र जानोजी निंबाळकर हे सातारा प्रांती शाहूचा उच्छेद निजामाच्या आज्ञेने करीत होते. शाहू यांनी त्यास पत्र लिहून दक्षविले की, "गावाचा सत्यनाश व उत्पात करावा हे गोष्टी बरी नव्हे, ऐसी वर्तणूक न करणे."[१०] परंतु छ. शाहू याच्या नम्र स्वभावाने या सरदारानी त्यास जुमानले नाही.

निजामाने छ. शाहू यांच्या सरदारात फितुरी घडवून छ. शाहूवर हल्ले करण्याचा प्रयत्न केला. यावेळी त्याचे सुलतानजी निंबाळकर व चिमणाजी दामोदर यांना आपल्याकडे वळविले.

सरदेसाई गो. स. लिहितात, "शाहू यांनी याचा वचपा काढण्यासाठी चंद्रसेनचा भाऊ शंभूसिंग व कपाशिकर सेनापती पिराजी घोरपडे व त्याचा पदरचे धारराव निंबाळकर यास आपल्या पक्षात आणले."[११]

निजामाने शाहू यास मात देण्यासाठी संभाजीस बरोबर घेऊन शाहूच्या मुलखात संभाजीचा गौरव संभाजीने पूर्ण जिल्ह्यात दौरा काढून तेथील अधिकाऱ्यांना, लोकांना आपल्या नावे सनदा दिल्या.[१२] अर्थात शाहूच्या हक्कावर हे उघड उघड आक्रमण होते. त्यामुळे छ. शाहू यांनी कर्नाटकातून बाजीरावास तर उत्तरेकडून उदाजी पवार, कंठाजी कदम, पिलाजी गायकवाड यांना साताऱ्यास बोलाविले.

छ. शाहू याच्या मन:स्थितीचा फायदा घेण्यासाठी निजामाने आणखी एक कारस्थान खेळले. यावेळी त्याने अशी अफवा उठविली की, पेशवे बाजीराव व सेनापती दाभाडे दोघेही तुम्हास दगा देणार, यामुळे बाजीरावाची पण तारांबळ उडाली होती. यातून निजामाचा कारस्थानी स्वभाव किती खोल होता हे कळून येते.

छ. शाहू यास सवाई जयसिंगकडून मदत मिळू नये यासाठी त्याने जयसिंगास १७२६ मध्ये पत्र लिहिले ते पत्र पगडी सेतु माधवराव यांनी 'महाराष्ट्र व मराठे' या ग्रंथात दिले आहे. ते असे, "राजा शाहूंना अनेकवार पत्रे लिहून आम्हीं कळविलें आहे कीं माळवा व गुजरात प्रातांत तुमचे सरदार जाऊन उच्छेद करतात हें अत्यंत गैर आहे. बादशहांस हा प्रकार बिलकूल खपत नाहीं. तुम्हीं सर्व सरदारांना हुकूम पाठवून नर्मदा उतरुं नये अशी तजवीज करा. पण आमच्या या कानउघडणीचा परिणाम कांही एक घडून आला नाहीं. सरदार लोक शाहूच्या आज्ञा मानीत नाहींत. सबब या बंडखोर सरदारांत

वठणीस आणण्याचा एक उपाय आम्ही हल्लीं चालविला आहे, त्यामुळें तुम्हांस व उदेपूरच्या महाराण्यास मराठ्यांकडून होणारा उपसर्ग बंद होऊन बादशहांनाही आनंद वाटेल शाहूचा प्रतिस्पर्धी कोल्हापुरकर संभाजीराजा यांस आम्ही बोलावून जवळ आणले आहेत, आणि त्यांस साह्य करुन शाहूला गादीवरुन काढण्याचा उद्योग आरंभिला आहे. मराठ्यांच्या सरलष्कर सुलतानजी निंबाळकर आम्हास येऊन मिळाला, त्यास आम्ही संभाजीचा मुख्य सेनापति नेमिलें आहे. ईश्वर कृपेनें दुसरेही शाहूचे सरदार त्यास सोडून आमचे बाजूस येतील आणि शाहूराजा हतबल होईल अशी आमची खात्री आहे.''[९३]

छ.शाहूशी युद्ध करण्याचा निजामाचा निश्चय झाला होता. त्याने छ. शाहू यांना पाठविलेल्या एका पत्रात जवळजवळ निर्वाणीची भाषा केली. ते पत्र असे, ''गेल्यावर्षी बाजीराव मला कर्नाटकात येऊन भेटला. त्याने अयोग्य वागणूक केली. केवळ तुमच्या स्नेहाखातर मी तिकडे कानाडोळा केला. याचे महत्त्व बाजीरावाने ओळखले नाही. निळो पंडितांनी माझा निरोप तुम्हाला कळविलाच होता. आमच्या परवानगीवाचून बाजीरावने कर्नाटकात जाणे योग्य होणार नाही. तुम्हास कळविले ही गोष्ट तुम्ही कबूल केली होती. कर्नाटकात जमीनदारांनी आमचे स्वामीत्व पत्करले आहे. आम्हाला ते खंडणी देत आहेत. आम्हाला त्यांचे अगत्य आहे. बाजीरावाने तिकडे धुमाकूळ घातला आहे. त्याने अनेक गाव आणि खेडी उध्वस्त केली आहेत. बरीच संपत्ती वसूल केली आहे. त्याच्या जुलमामुळे सर्वत्र हाहाकार उडाला आहे. आम्हाला खंडणी देणाऱ्या मांडलीक महाराजांच्या राज्यात बाजीराव आमच्या परवानगीवाचून गेला आहे. बाजीरावाने पन्हाळगडापलीकडे जावू नये असे ठरविले होते. तुमचे म्हणणे त्याने ऐकले नाही. आमच्या मर्जी विरुद्ध तो वागला व तो तुमच्या विरुद्ध वागत आहे.''[९४]

अशाप्रकारे निजाम, चंद्रसेन जाधव आणि संभाजी राजे यांची आघाडी अधिक बळकट झाली होती. त्यांच्या फौजा ता. १८ फेब्रु. १७२७ रोजी पुण्यास जाऊन पोहोचल्या होत्या. त्यामुळे शाहू महाराजांनी प्रतिकार करण्याच्या तयारीने सर्वांना एकत्र बोलाविले व ठिकठिकाणी पत्रे व हुकूम पाठविले. त्यातील एक पत्र पारसनिस द. बा. यांनी दिले ते असे, ''संभाजी राजे व निजाम उल्मूक एकत्र होऊन चालून येत आहेत या करीता गडकरी यांचे कबिले गडावर आणविणे व गडकरी यांच्या गोटाचा गल्ला जसा

असे तसा मळून गडावर चढविणे ये विषयी सुती न करणे. नौबत चौका पहारा खबरदारीने करणे गैर माणूस गडावर न घेणे.''[१५] यासारखी अनेक तातडीची खबरदारी घेण्यात येऊ लागली.

### ३.७.२.८ पालखेड येथे छ. शाहू यांचा विजय व निजामाचा पराभव (फेब्रु. १७२८):-

इ. स. १७२७ या दशकापासून महाराष्ट्राचा नूर त्वरेने पालटत गेला. ''छ. शाहू व पेशवा मनापासून झटतात असे पाहून लहान मोठे सरदार त्यांचे साह्यास धावून आले. निजामानेही युद्धाची तयारी केली.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''या मोहिमेत महत्त्वाची गोष्ट म्हणजे निजामाजवळ तोफखाना होता व मराठ्यांकडे तो नव्हता. त्यामुळे त्यांना गनीमी काव्याने निजामास पराभूत करण्यापलिकडे काहीही नव्हते.''[१६] बाजीरावानेही गनीमी पद्धतीने निजामास पराभूत केले. निजामाने तोफखान्याच्या जोरावर पुणे प्रांतात धुमाकूळ घातला तर बाजीरावाने गोदावरी ते नर्मदेच्या भागात त्याचा वचपा काढला.

छ.शाहू यांच्या आज्ञेने बाजीराव व चिमाजी या दोघा बंधूंनी कार्याची वाटणी केली. उत्तरेकडील बाजू बाजीरावाने आपल्या हाती घेतली व नाशिकपासून सातारा, मिरज पावेतोच्या प्रदेशाची व्यवस्था चिमाजीकडे सोपविली व त्याच्या साह्यास शिंदे, होळकर, पवार यांना नेमले.

ऐवजखानाचा समाचार सिन्नरजवळ तुकोजी पवारने चांगलाच घेतला व चंद्रसेन जाधव याचा पराभव फत्तेसिंग व रघुजी भोसले यांनी केला. पुण्यास निजामाने वर्चस्व निर्माण केले तेव्हा बाजीरावाने गोदावरीकडील निजामाचा प्रदेश लुटून जालना, सिंदखेड हे परगणे बेचिराख केले, बुऱ्हाणपूरास आक्रमणाची आवई उठवून पूर्वेकडे वळून माहूर, मंगरुळ व वाशीम हे तालुके धुळीस मिळविले तेथून गुजरातेत शिरलो.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''बाजीरावाच्या वरील भरारीचा उद्देश हा की, निजामास कोठेतरी दोन फौजाच्या चिमट्यात कोंडावे व उत्तरेकडून निजामास मदत मिळू देऊ नये.''[१७]

अखेर बाजीरावाने फेब्रुवारी १७२८ मध्ये मराठवाड्यातील वैजापूरनजीक पालखेड या गावाजवळ निजामाला कोंडीत पकडले निजामाचा पराभव होऊन तो शरण आला.

पालखेडच्या लढाईसंबंधी फारसी इतिहासकारांनी जी वर्णने दिली आहेत ती कितीही मराठ्यांच्या विरुद्ध असली तरी शेवटी त्यांनाही निजामाचा पराभव व मराठ्यांचा निर्णायक विजय नमूद करावा लागला. एका वर्णनात म्हटले आहे, "बाजीराव कसारी घाटावरुन गंगापूर आणि वैजापूर भागात उतरला. तेथे त्याने उच्छाद मांडला, निजामाच्या फौजे भोवतीचा प्रदेश त्याने उध्द्वस्त केला. फौजेत रसद जावू द्यायचे त्याने थांबविले. घासदाणा तर बंद केलाच पण पिण्याचे पाणीही निजामाच्या सैन्यास मिळू नये असा बंदोबस्त त्याने केला. समोरा-समोर लढण्याचे त्याने टाळून आपल्या गनिमी काव्याने तो लढत राहिला,"[९८]

सरदेसाई गो.स. लिहितात, "निजामाच्या अंगावर डाव ऊलटल्याचे पाहून चंद्रसेन खजील झाला. त्याने बाजीरावास पत्रे लिहून त्यांचे अभिनंदन केले,"[९९]

ऐवजखाना मार्फत तहाचे बोलने करून दोन मात्तबर सरदार मराठ्यांच्या ओलीस पाठविले. ता. ६ मार्च १९२२ रोजी मुंगीशेगावचा तह झाला. या तहाची (एकंदर १३ कलमे होती.) त्यातील प्रमुख कलमे अशी- निजामाने कोल्हापूरच्या संभाजीला आश्रय देवू नये, दक्षिणेतील सहा मोगल सुभ्यांचा कारभार मराठ्यांच्या तंत्राने करावा. चौथाई, सरदेसमुखीच्या कामात निजामाने अडथळे आणू नये, पुणे, बारामती, खेड, तळेगाव आणि निजामाने शाहुच्या प्रदेशातील जिंकलेली इतर ठिकाणे मराठ्यांना परत करावी, संभाजीने बेकायदेशीरपणे गोळा केलेली रक्कम मराठ्यांना परत करावी.

याच तहान्वये कृष्णाजी, ऊदाजी, केरोजी या बंधुना निबोने पेठ्यातील पाच गावाची जहागिर मिळाली. पिलाजी गायकवाडाचा शहागडच्या पाटीलकीचा हक्क कायम केला. पालखेडच्या विजयामुळे निजाम, संभाजी यांचे युतीचे संकट टळले.

छ. शाहू यांच्या कृपेमुळेच संभाजीचे राज्य टिकले. तसेच जुनी मुत्सद्दी मंडळी मागे पडून नवीन सरदार मंडळी उद्यास आली. छ. शाहू यांच्यावर असा आरोप केला जातो की, त्यांनी पालखेडवर निजामास नेस्तनाबूत का केले नाही परंतु त्यावेळेची

परिस्थिती अनुकूल नव्हती तसेच बादशाही अजून मजबूत होती. निजामाचे वर्चस्व सगळीकडे होते. त्यामुळे हे शक्य नव्हते. मात्र या पराभावाने सुद्धा निजामाच्या कारवायांना आळा बसू शकला नाही.

निजाम हा धूर्त राजकरणी असल्यामुळे मराठ्यांचे शत्रू हेरुन नव्याने उद्योग सुरू केला. सेनापती त्रिंबकराव दाभाडे व बाजीरावाचे सख्य नसल्याचे पाहून निजामाने दाभाड्यास बाजीराव विरुद्ध ऊठविले. तसेच ता. १९ मार्च १७३१ रोजी अलाहाबादचा सुभेदार बगणाची भेट घेतली व दाभाड्याच्या साहाय्याने दोघांनी बाजीरावाचा काटा काढावा असा डाव टाकला. परंतु बाजीरावाने अगोदरच ता. १ एप्रिल १७३१ रोजी बडोद्येनजीक डभई या ठिकाणी दाभाड्याचा पूर्ण पराभव केला व निजामाचा डाव ऊलटविला

मराठ्यांचे माळव्यातील व गुजरातेतील वाढते वर्चस्व पाहून बादशहाने निजामाशी सख्य करून त्यास आग्रा व माळव्याची सुभेदारी देवून मराठ्यांना उत्तरेतून हुसकावण्याची सुचना दिली.

### ३.७.२.९ भोपाळ येथे निजामाचा पुन्हा पराभव : डिसेंबर १७३७:-

इ. स. १७३६ दशकानंतर बाजीरावाने उत्तरेत प्रयान केले. मागोमाग निजामाने औरंगाबाद सोडून बुऱ्हाणपूरास तळ दिला. तेथे त्याचा मुक्काम ता. ६ एप्रिल १७३६ पर्यंत झाला. येथे बादशहाचे वकील निजामास बोलावल्याचे फर्मान घेऊन आले. पुढे ता. १० मे १७३६ निजाम नर्मदापार होऊन सिरोजला दाखल झाला. याच वेळी बाजीराव उत्तरेतून परत येतांना धामूणी येथे त्याने पिलाजी जाधवास निजामाच्या भेटीस पाठविले. यावेळी युद्ध झाले नाही कारण बाजीरावची तयारी नव्हती. तसेच निजामाकडून आगळीक घडली नव्हती. त्यांची भेट ता. २८ मे १७३६ रोजी झाली. समाधानाने बोलणे झाले. त्यानंतर ता. २ जुलै १७३६ लॉ निजामाने दिल्लीस दाखल होऊन बादशहाची भेट घेतली. इकडे बाजीराव, शिंदे, होळकर, पिलाजी जाधव पुण्यास येवून पूढील विचारास लागले.

ता. १० ऑगस्ट रोजी व्यंकोजीराव लिहतो, "दिल्लीचा मजकूर की निजामानी पातशहाशी करार केला. जे, आपणास पाच सुभे देणे आणि करोड रूपये देणे, म्हणजे आम्ही हरिभक्तास रेवाप्तर होवू देणार नाही, आणि कदाचित फार शेखी करतील तर

दक्षिणची चौथाही ऊठवून देवू ऐसी बहोत प्रकारे वल्गाना केली ..''[१००] यावरून बाजीराव दिल्ली दरबारातील निजामाच्या कारभाराची माहिती मिळवून तो दक्ष होता दिसून येते.

निजामाच्या अनूपस्थितीत उघड्या पडलेल्या कर्नाटकावर छ. शाहू यांनी रघुजीस रवाना केले. यावरून शाहूची राजकारणातील सुक्ष्म नजर लक्षात येते.

मराठ्यांस माळव्यातून कायमचे हाकलून देण्याची तयारी करून निजाम फौज घेऊन दिल्लीवरून निघाला. त्याने बुंदेलखंड मार्गे माळवा प्रदेशात उतरावयाचे ठरविले. येताना दातीया, वोडसा, छत्रसालचे पुत्र व नासीर इत्यादिंना आपल्या बरोबर घेतले, सादतखानचा भाचा मन्सूर यास घेतले. तर सवाई जयसिंगाने आपला पुत्र व काही लष्कर पाठविले. कोथ्याचा राजा दुर्जनसालही निजामास मिळाला, परंतु हिंदू सारे द्विधा स्थितीत होते.

सरदेसाई गो. स. लिहतात, ''माळव्यात तीस चाळीस वर्षाच्या प्रयत्नाने जमविलेले आद्यान सर्वथा नाहिसी होवून असंख्य सरदार व सैनिकांचा पराक्रम वाया जाण्याचा प्रसंग होता म्हणून बाजीराव व शाहू तयारीस लागले,''[१०१]
इकडे दक्षिणेत निजाम पुत्र नासीर जंग सुद्धा फौज जमवून बापाच्या मदतीस जाण्याचा प्रयत्न करू लागला. परंतु चिमाजी अप्पा तापीतिरी वरणगांव नजिक ठासून बसल्याने त्यास पाऊल पूढे टाकता येईना.
राजवाडे खंड, ६ मंराठयांच्या इतिहासाची साधने- मधील माहिती नुसार छ. शाहूंनी सर्व सरदारास आज्ञा पाठविली की, ''दक्षिणची फौज नवाबास सामील होवू न द्यावी. नवाब भूपाले गडच्या आश्रयास गेला. पंडित प्रधान चौगीर्सी चौक्या देऊन बसले आहेत.''[१०२] नवाबांनी दक्षिणेची फौज टाकोटाक बोलवली आहे. यावरून छ. शाहू महाराजांचे या संग्रामावर बारीक लक्ष होते. ते वेळोवेळी आपल्या सरदारास मार्गदर्शन करित होते. हे समजते.

निजामाच्या दक्षिणेकडील फौजेस चिमाजीने आडविले तर उत्तरेकडून येणाऱ्या फौजेचा नाश शिंदे-होळकरांनी करून ते परत बाजीरावला येवून मिळाले. सुजायतखानास रघूजी भोसलेने ठार मारले. यामुळे निजाम चांगलाच अडचणीत आला.

सरदेसाई गो. स. लिहितात, "बाजीरावाच्या अचानक हल्ल्याने निजामाची तारांबळ उडाली. युद्धाचा निकाल मुख्यत: डावपेचाच्या कौशल्यावर अवलंबून असतो. या बाबतीत निजाम बाजीरावापुढे फार हलका पडला,"[१०३] मराठ्यांनी निजामास जेव्हा घेरले तेव्हा निजामाने भोपाळच्या किल्ल्याचा आश्रय घेवून तोफखानाच्या संरक्षणाखाली राहिला. मराठ्यांनी त्यास चोहिकडून घेरून अन्न-पाणी बंद केले. तेव्हा निजामाच्या फौजेत अन्नधान्य टंचाई होवून लोक, जनावरे यांचा मृत्यू होऊ लागला. राजपूत, जाट, राजे हवालदिल होऊन निजामास सोडून जाण्याच्या बेतात आले. चार दिवस वेढ्यात निजामाने कसेबसे काढून नंतर लोकांच्या साहाय्याने फळी फोडण्याचा प्रयत्न केला. नाईलाजाने त्याने आनंदराव सुमंतास बाजीरावाकडे पाठवून तहाची याचना केली.

नवाबाच्या तर्फे आब्दुलशेरखान, सय्यद लष्कर खान व अन्वर बोलले की, "निजामाची बे आब्रु होवू नये, आब्रु राखली तर सर्व मतलब नवाब मान्य करतील," या धोरणानुसार तह झाला. हा तह ता. ६ जाने १७३८ ला भोपाळपासून नैऋत्येला २० मैलावर असलेल्या दुराहसराइ या ठिकाणी झाला. यातील प्रमुख कलमे अशी- माळवा प्रांत देणे, नर्मदा व चंबळ यामधील मुलूख देणे, यादोहाबद्दल बादशहीची सनद आणून देणे, मराठ्यांच्या खर्चाचे ५० लाख रू. बादशहाकडून आणून देणे.

या तहाने नर्मदा व चंबळ या नद्या दरम्यानचा मुलूख स्वराज्यात दाखल झाला. हे होय. तसेच निजाम वठणीवर आला व उत्तर भारतात बाजीरावचा दरारा निर्माण झाला. यावेळी निजामास बुडविण्याची बाजीरावास संधी नव्हती. कारण एक तर तो मोगलांचा प्रतिनिधीत्व करणारा होता व इतर हिंदू सरदारही त्याच्या सोबत होते.

भोपाळच्या युद्धानंतर दोन वर्षांनी म्हणजे जानेवारी १७४० मध्ये निजामाचा मुलगा नासीरजंग यांच्या विरूद्ध बाजीरावाने मोहिम काढून त्याचा पराभव केला व मुंगीशेवगांव येथे तह लादला देशपांडे प्र. न. लिहितात, "या तहाने नर्मदेच्या दक्षिणेकडील हंडीया आणि खरगोण हे दोन जिल्हे नासीरजंगाने बाजीरावास दिले."[१०४]

फाटक न. र. लिहितात, "बाजीराव-निजाम यांच्या संघर्षाचा इतिहास पाहता. मुसलमान सरदारावर जय मिळविलेल्या निजामाची मात्र बाजीराव समोर एकदाही चालली नाही हे लक्षात ठेवणे आहे."[१०५]

## ३.८ छ. शाहू यांचे मार्गदर्शन व बाजीराव यांच्या नेतृत्वाखाली मराठ्यांचा माळवा आणि बुंदेलखंडात प्रवेश व वर्चस्वः-

उत्तर हिंदुस्थानातील राजकारणाच्या दृष्टीने माळवा प्रदेशाला अनन्यसाधारण महत्त्व होते. उत्तर आणि दक्षिण भारताला जोडणारा मार्ग याच प्रदेशातून जात होता. मराठ्यांनी औरंगजेबापासूनच माळव्यात स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. दरम्यान मोगलांनी माळव्यावर आपले वर्चस्व पूर्णतः निर्माण केले.

डॉ. सहस्त्रबुद्धे पु. गो. लिहितात, ''शाहू छत्रपतीची सत्ता स्थापन झाल्यावर त्यांनी वरील प्रदेशात आपले सरदार पाठविण्यास योजनापूर्वक प्रारंभ केला.''[१०६] यावरुन मराठ्यांचे माळव्यावरील वर्चस्व हे छ. शाहू यांनी योजनापूर्वक टाकलेले पाऊल होते व ते त्यांच्या पूर्वजाच्या परंपरेनुसार होते हे समजून येते.

पुढे बाजीरावाने स्वतः फेब्रुवारी १७२३ व मे १७२४ मध्ये माळव्यावर स्वारी करुन चौथाई वसूल केली. पालखेडच्या लढाईत निजामाचा पराभव झाल्याने त्याचाही अडथळा मराठ्यांसाठी नाहीसा झाला. त्यात दिल्लीतील अंतर्गत कटकटीने मराठ्यांस अनुकूल स्थिती निर्माण झाली.

दिगे व्ही. जी. यांनी म्हटल्याप्रमाणे, "While the Marathas were altacking Malawa and Gujrat the Imperial Court occpied itself in right levels and excassions to gardens."[१०७] अशी परिस्थिती निर्माण झाली होती.

इ. स. १७२८ च्या अखेरीस उत्तर भारतावर मोठे आक्रमण करण्याची योजना आखून बाजीरावाने स्वतः प्रचंड फौज घेऊन बुंदेलखंडात उतरला तर चिमाजीआप्पाच्या नेतृत्वाखालील फौज माळव्यात उतरली.

यावेळी माळव्यातील राजपूत सरदार व लोक मराठ्यांस अनुकूल होते. सवाई जयसिंग हा पण मराठ्यांस अनुकूल होता. त्यात मडलोइ, अनुपसिंग या सरदारानी तर चिमाजीअप्पास प्रत्यक्ष सहाय्य केले. कारण येथील रयत गिरिधर बहादूर व दया बहादूर या मोगल अंमलदारास त्रासून गेले होते.

सहस्त्रबुद्धे पु.गो. लिहितात, ''माळवा बुंदेलखंडाच्या या स्वारीत उदाजी पवाराचे मोठे साह्य झाले. बाजीवाच्या आज्ञेवरुन तो इ.स.१७२८ पासून माळव्यात संचार करीत होता. इ.स. १७२४ ला त्याने धारला आपले ठाणेही बसविले आणि तेथून तो गुजरात,

काठेवाड, मारवाड, बुंदी कोश व बुंदेलखंड एवढ्या टापूस संचार करी.''[१०८] परंतु नंतर बाजीराव व त्याचे बिनसल्याने बाजीरावाने त्याचे महत्त्व कमी केले.

### ३.८.१ माळव्यावर मराठयांचा ताबाः आझमऱ्याच्या युद्धात दया बहाद्रूराचा पराभवः-

इ.स. १७१९ मध्ये सुरु झालेले चौथाई-सरदेशमुखीच्या प्रश्नाचा निकाल इ.स. १७२८ मध्ये चिमाजी अप्पाने केलेल्या शेवटच्या स्वारीत कायमचा लागला. या खेपेस बाजीरावाच्या खांद्याला खांदा लावून लढणारे बाजी रेठणकर, राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर, गणपतराव मेहंदळे मंडळी होती. तसेच भोसले, ढमढेरे, घोरपडे, पवार, निकम, चिमळकर इ.येवून मिळाले व ता.२९ नोव्हें. १७२८ ला धारजवळ आजमेर या ठिकाणी उभयपक्षात युद्ध होऊन दयाबहाद्रूर मारला गेला. त्यास जगदेव पवारने मारले.[१०९]

या युद्धानंतर चिमाजी अप्पाने मंदसोर, सालम, जावदा या बाजूने फौज फिरवित गुजरातेत उतरला. अशा रीतीने २०० मैल लांब व २०० मैल रुंद विस्तृत प्रदेश मराठ्यांच्या अमलाखाली आला. या नवीन प्रदेशाची वाटणी अशी झाली. ''निम्मे स्वराज्याचा अंमल पेशव्यांच्या मार्फत सरकारात यावा, निम्मे फौजेचा खर्च करुन, पेषकशी (नजराना) येईल ते हुजूर यांनी ऐसे तह करुन दिले. शिंदे, होळकर व पवार या सर्वांशी तह केला, की जो मुलूख सरकारात येईल त्याचे हिस्से करुन फौज करुन एकविचारे चालावे हिस्से केले त्यात शेकडा ३९रु. सरकार एक हिस्सा, शिंदेस ३० एक हिस्सा, होळकर ३० एक हिस्सा, पवार रु. ९ या प्रमाणे करार करुन तो नंतर फेरफार झाले तरी मूळ तह कायम राहिले.[११०] चिमाजी अप्पाच्या या यशाने सर्व देश अवाक् झाला.

या स्वारीनंतरही दिल्ली दरबार या प्रदेशातील आपले सर्वस्व सोडायास तयार नव्हता. इ.स. १७२८ ते १७३६ पर्यंत या प्रांतावर अंबरचा राजा जयसिंग बंगष यांची मक्तेदारी होती. इ.स. १७३० ते १७३२ पर्यंत बंगषाने मराठ्यांना हुसकावण्याचा प्रयत्न केला. नंतर जयसिंग सूभेदार झाल्यावर त्याने समोपचाराचे धोरण स्विकारले. परंतु यश आले नाही.

देशपांडे प्र. न. लिहितात, "इ.स. १७३२ मध्ये राणोजी शिंदे आणि मल्हारराव होळकर यांनी गुजरात मधून पश्चिम माळव्यावर स्वारी केली व थेट बुंदेलखंड मार्गे ग्वाल्हेर आणि गोहदपर्यंत गेले. तेव्हा इ.स. १७३३ मध्ये सवाई जयसिंग मंदोसर या ठिकाणी शरण आला व ६ लाख रु. खंडणी दिली. इ.स. १७३४ मध्ये मराठ्यांनी बुंदी हे ठिकाण जिंकून घेतले."[१११]

पुढे मराठ्यांच्या वाढत्या आक्रमणाला आळा घालण्यासाठी इ.स.१७३५ मध्ये दिल्लीचा वजीर कमरुद्दीन चालून आला. परंतु जवळच असलेल्या पिलाजी गायकवाडाने त्याचा पराजय करुन ५ लाख रुपयावर त्याची सुटका केली. नंतर खानदौर मीरबक्षी हा माळव्यावर चालून आला तेव्हा राणोजी व मल्हारावने त्याची कोंडी केली व तहानुसार त्यास ता. २४ मार्च १७३५ ला मराठयांची चौथाई म्हणून २२ लाख देण्याचे कबूल केले. अशाप्रकारे माळव्यावर मराठ्यांचे कायमचे वर्चस्व होऊन दिल्ली दरबारास ते मान्य करावे लागले.

### ३.८.२ बाजीराव व छत्रसाल:-

मराठ्यांचे वाढते वर्चस्व पाहून यावेळी रजपूताप्रमाणे बुंदेलेही मराठ्यास सामील झाले. त्यांचा राजा छत्रसाल व छत्रपती शिवाजी यांची मैत्री होतीच. छत्रपती शिवाजी महाराजा पासून प्रेरणा घेऊन छत्रसालने पन्ना येथे स्वतंत्र राज्य स्थापन केले. अनेक राजकारण करुन त्याने इ.स. १६७० ते १७३१ पर्यंत राज्याचे रक्षण केले. आणीबाणीचा प्रसंग पाहून बादशहाने अलाहाबादचा सुभेदार बंगष यास मराठे व छत्रसाल यांच्या पारीपत्यास पाठविले. बंगषाने राजा छत्रसालावर इ.स.१७२८ मध्ये स्वारी करुन छत्रसालाचा जैथपूर नजीक पराभव केला. वयाच्या ७८ व्या वर्षी छत्रसालने हिंमत न हारता रक्षणासाठी बाजीरावास हाक घातली. ती सर्वश्रृत आहे. बाजीराव यावेळी देवगड या ठिकाणी होता. बाजीरावबरोबर यावेळी पिलाजी जाधव, नारो शंकर, तुकोजी पवार वगैरे मिळून पंचवीस हजार फौज होती. ता. १२ मार्च रोजी महोब्यानजीक छत्रसालच्या पुत्राने बाजीरावाची भेट घेतली.[११२] छत्रसालची मदत करण्याच्या हेतूने बाजीराव त्वरेने बुंदेलखंडावर चालून गेला. जैथपूर या ठिकाणी बंगषचा मुलगा कयाम खान आणि बाजीराव यांच्यामध्ये इ.स. १७२९ ला युद्ध होऊन कयाम खानाचा पराभव झाला.

अखेर महंमद बंगषाने बाजीरावास शरण येऊन पुन्हा बुंदेलखंडात हस्तक्षेप न करण्याचे वचन दिले.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''बाजीरावास बुंदेलखंडातील पुष्कळ मुलूख राजा छत्रसालने दिला. त्यात काल्पी, हट्टा, सागर, झांशी, सिरोज, कुंच, गडकोठा, हरदे नगर इ. प्रांत होत. तसेच बाजीराव व त्याच्या दोन पुत्रात बंधु भावाप्रमाणे वागून एकमेकांना मदत करण्याचा करार झाला.''[११३] या प्रदेश प्राप्तीमुळे पुढे मराठ्यांस आग्रा, दुआब, दिल्लीकडे आक्रमणास उपयोग झाला. मराठ्यांचे बुंदेलखंडात कायमचे ठाणे झाले.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''दोन बंधु अपूर्व विजय पदरात घेऊन सन १७२९ ला पावसाळ्यात महाराजांच्या दर्शनास साताऱ्यास दाखल झाले त्यावेळी राजधानीचा आनंदोत्सव बघण्यासारखा होता.''[११४]

## ३.९ छत्रपती शाहू व संभाजी : वारणेचा तह : एप्रिल १७३१:-

इ.स. १७३० साली मराठ्यांच्या इतिहासात एवढ्या प्रचंड घटनांच्या घडामोडी सुरु झाल्या की, सर्वांची गुंतागुंत एकमेकात दिसते. माळवा, गुजरातेतील छ. शाहूला मराठ्याच्या वर्चस्वाने बादशहा, निजाम व स्वकीय अस्वस्थ झाले. बादशहाने जयसिंगास सल्ला दिला की कोणी मुत्सद्दी माणूस पाठवून छ. शाहूच्याकडील माळव्या संबंधी पुढील राजकारण काय याचा शोध घेण्यास सांगितले. तेव्हा जयसिंहाने दिपसिंह, मनसाराम व बागजी हे तीन वकील साताऱ्यास गेले. तेथे सर्वांशी भेट घेऊन परिस्थिती आजमावली पुढे निजामाशीही भेट घेऊन परतले. मानसरामची भक्ती शाहूवर एवढी बसली की तो पुढे साताऱ्यासच राहिला. या वकीलातीचा परिणाम मराठ्यांस अनुकूलच झाला.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''शाहू व त्याचे सरदार यांचे हेतू उदात्त व धर्मसंवर्धक असून ऊगाच दुसऱ्यांना बुडवून त्रास द्यावा अशी भावना कोणाची नाही. सर्वांची इच्छा बादशहाशी, राजपुतांशी व निजामाशी सुद्धा स्नेहवृत्तीने राहावे अशी असून माळवा आणि गुजरात या दोन प्रांताबद्दल अनुक्रमे अकरा लाख व पंधरा लाख रु.मराठ्यांस अविरत मिळावे व ते या प्रांताच्या वाटे जाणार नाही. आपल्या फौजा ठेवून ते त्याचे रक्षण करतील अशी वलिकांची खात्री पटून असा करार त्यांनी बादशहाकडून मंजूर

करण्याचे ठरविले."[११५] यावरुन छ. शाहूच्या व्यक्तीमत्त्वाचा प्रभाव या वकीलांवर पडलेला दिसून येतो. पुढे या दिपसिंहाने निजामास शाहूस त्रास न देण्याविषयी समजाविले. परंतु निजामाचे मत तर शाहूचे राज्य नष्ट करण्याचे होते. त्याचा हेतू दिपसिंहाने बाजीरावास कळविलेला दिसतो.

इकडे पालखेडच्या लढाईत निजामाचा पराभव झाल्याने कोल्हापूरकरांचा आश्रय सुटला. परंतु पुढे उदाजी चव्हाण व इतर मराठे सरदारांच्या प्रोत्साहनामुळे व निजामाच्या अप्रत्यक्ष पाठिंब्याने संभाजीने पुन्हा शाहू विरोधी भूमिका घेतली, छत्रपती शाहूंनी पुष्कळ समजाविण्याचा प्रयत्न केल्याचे दिसून येते.

छ. शाहूंच्या प्रदेशावर उदाजीच्या उपद्रवामुळे शाहू महाराजांनी सेनापती त्र्यंबकराव दाभाडे यास ता. ८-३-१७२८ ला पाठविलेल्या पत्रात लिहिले की, "उदाजी चव्हानाची बातमी राखून वळवळ करील तर नतिजा देणे." या कडक बंदोबस्तामुळे उदाजी चव्हाणाच्या हालचाली थंडावल्या.

इ.स. १७२९ मध्ये बाजीराव व चिमाजी दोघे माळव्यात गेलेले पाहून उदाजी चव्हानाने पुन्हा छत्रपती शाहूंच्या मुलूखात हल्ल्यास सुरुवात केली. संभाजीने त्यास सेनापती नेमले, तेव्हा छत्रपती शाहू यांनी संभाजी व उदाजी यास पकडण्यासाठी स्वत:च पुष्कळ सरदार बरोबर घेऊन इ.स. १७३० चे आरंभी दक्षिणेकडे निघाले. तेंव्हा शिकारीसाठी गेले असताना छ. शाहूस उदाजी या भागात आहे हे कळले. त्यांनी त्यास अभय देऊन भेटीस बोलविले. तो भेटून परत गेला मात्र छ. शाहू विरोधी धोरण सोडले नाही. पुढे एके दिवशी छ. शाहूंना आलेले मारेकरी जंगलात भेटले तेव्हा छ. शाहू यांनी त्यास जिवंत सोडले. तेव्हापासून लोक त्यांना अजातशत्रू म्हणत."[११६] या मारेकऱ्यास संभाजी व उदाजीने पाठविल्याचे कळल्यावर शाहूनी त्याचे पारिपत्य करण्याचे ठरविले.

इ.स. १७२९ पासून ते फेब्रु. १७३० पर्यंत म्हणजे सहा महिने या मोहिमेची शाहूंनी तयारी केली. त्र्यंबकराव दाभाडे यास शाहूने आज्ञा दिली की, 'हेरले येथील वाडा घेऊन कोल्हापूर भोवती राहून चव्हाणास तंबी पोहचविणे, लांब न जाणे, तसेच बाजीराव, शंभुसिंग जाधव, सिधोजीराव निंबाळकर, शेखोजी आंग्रे, पिलाजी जाधव, प्रतिनिधी सर्वांस पत्र पाठवून मोहिमेस बोलविले. शाहूंनी स्वत: वारणा नदीच्या बाजूने तळ दिला.

इकडे संभाजीनेही लढाईची जय्यत तयारी केली. व्यंकटराव घोरपडे व भगवंतराव पंत अमात्य यांनी आपल्या फौजा घेऊन युद्धाच्या तयारीने शाहू महाराजांच्या फौजे समोर तळ दिला.''[११७]

या लढाईसंबंधी आणखी एक हकीकत पुढीलप्रमाणे नमूद आहे. ''शाहू महाराज आणि संभाजी अशा दोन्ही पक्षाची लढाई सुरु झाली. शाहू महाराजांचा मुक्काम उम्रजेस होता. त्याचे सरदार कोल्हापूर राज्याच्या सिमेत घुसून दंगा करीत असत. त्यांना पिटाळून लावण्याच्या उद्देशाने संभाजी व चव्हाण यांनी सैन्याची जमवाजमव केली. २० ते २५ हजार फौज घेऊन संभाजीनी वारणेकडे कूच केले. जमल्यास वारणेच्या काठाणे चढून साताऱ्यापर्यंत फौज न्याव्यात असा संभाजी राजे व उदाजी चव्हाणांनी बेत केला. त्याला अनुसरुन कोल्हापूरच्या फौजेने शाहूच्या ठाण्याला वेढा दिला. उदाजीराव चव्हाण घुमटात गेले ते बाहेर आले शाहूच्या फौजेनी वडगाव येथे कोल्हापूरकरांच्या फौजांना गाठले, फोजी बेसावध होती. प्रतिनिधीच्या पुढाकाराने तिच्यावर जबरदस्त हल्ला केला. त्यामुळे कोल्हापूरकरांची दाणादाण उडाली. शेकडो लोक प्रतिनिधींच्या हाती पडले. संभाजीराजे व उदाजीराव मात्र निसटले व पन्हाळ्यास गेले. ताराबाई, राजसबाई व जिजाबाई व्यंकटराव घोरपडे, भगवंतराव पंत, आमात्य ही मंडळी प्रतिनिधीच्या हातात पडली. त्याशिवाय इतर लुट मिळाली.''[११८]

यापैकी राजसबाई व संभाजीची बायको यांना पन्हाळ्यास पोहचून बाकीच्यांना शाहू महाराज साताऱ्यास घेऊन आले. ताराबाईसही परत पाठविण्याचा विचार शाहूचा होता. परंतु ताराबाईने नकार दिला व म्हणाल्या 'मला कोठेही कैदेतच राहण्याचे तेव्हा तुम्हाजवळ राहू.' पुढे संभाजीने दंड भरुन पंतास सोडविले. छ. शाहूच्या झपाटयाने पन्हाळाही शाहूच्या हाती पडला व विशाळगडही जाण्याच्या मागे लागला हे पाहून संभाजीने छ. शाहूस शरण जाण्याचे ठरवून प्रधान निलकंठ त्र्यंबकास तहाची बोलणी करण्याची आज्ञा ता. ८ ऑगस्ट १७३० रोजी केली.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''शाहूस विजय मिळण्याचे कारण म्हणजे शाहूंचा मनमिळावू स्वभाव, शत्रुससुद्धा क्षमा करुन घेण्याची हातोटी, लोकांस संतुष्ठ ठेवण्याची त्यांची कळकळ आणि त्यांच्या सरदाराचे पराक्रम.''[११९] इ. कारणानी संभाजीचे तेज

कमी होत गेले. यावेळी दोघांच्या वाटाघाटीने भांडण मिटण्यास अनुकूल वातावरण तयार झाले व तह ठरविण्याचा उपक्रम सुरु झाला.

यावेळी संभाजीस तहाची निकड होती म्हणून त्यांनी दुय्यमपणा स्वीकारला व समेटाची तयारी केली. प्रतिनिधी, भगवंतराव, ताराबाई इ. च्या मध्यस्थीने सख्य घडून आले.

### ३.९.१ छ. शाहू व संभाजी भेट व तहः-

इ.स. १७३० च्या आश्विन कार्तिकात साताऱ्याहून संभाजीस अणण्याकरिता फत्तेसिंग भोसले, श्रीपतराव प्रतिनिधी, नारो राम मंत्री, बाळाजी बाजीराव, भवानीशंकर मोरेश्वर, आबाजी पुरंदरे इ. नामी सरदार फौजसहित पन्हाळा मुक्कामी आले ते ता. १७-१२-१७३० रोजी.''[१२०]

जाखणवाडीच्या मैदानात भेटीची जागा ठरली होती. त्याची पूर्ण व्यवस्था लावण्यासाठी श्रीपतराव प्रतिनिधी आणि नारो राम मंत्री वाठराहून पुढे गेले. शाहू महाराजही साताऱ्याहून निघून कऱ्हाडला आले.

या भेटीविषयी माहिती देताना गर्गे स.मा. लिहितात, ''जाखणवाडी ते वाठारापावेतो उभयताकडील संपूर्ण सरदार वगैरे मिळून दोन लक्ष पावेतो जथा जाहला. ऊभय महाराजांच्या स्वाऱ्या हत्तीवर बसून बिछायतीवरुन मोठ्या मिरवणुकीने लोकांचे मुजरे घेत-घेत भेटीच्या जागे पावेतो आले. थोडे अंतर राहिल्यावर उभयता महाराज हत्तीवरुन उतरुन स्वार झाले. नजीक आल्यावर घोड्यावरुन उतरले. संभाजीने शाहूंच्या पायावर डोके ठेविले. शाहूनी त्यास ऊठवून आलींगण दिले. उभयताच्या भेटी होऊन आनंद झाला.''[१२१] मोडक लिहितात, ''पहिली भेट ता. २६ फेब्रुवारी १७३१ ला मध्यान्हास झाली. कऱ्हाड व जाखनवाडीमध्ये माळावर दुसरी भेट झाली. श्रीकृष्णाजी तिरी मुक्काम केले. नंतर शाहू महाराजांनी संभाजी राजे यांचा हात धरुन उभयता बंधू एका हत्तीवर बसले. खवासखान्यात शंभूसिंग जाधव दोन मोचले घेऊन बसले. नंतर संपूर्ण लोकांचे मुजरे घेत स्वाऱ्या मुक्कामाच्या डेऱ्यावर आल्या. तेथे बहुत प्रकारे बोलणे झाले. आणि हत्ती, घोडे, सामान, जवाहीर, कोठार शाहू महाराजांनी संभाजी राजे यास दिले. पुढे कऱ्हाडहून उम्रजेस उभयता महाराजाच्या सड्या स्वाऱ्या आल्या. तेथे मेजवान्या,

उंब्रज

भोजणे झाली. साताऱ्यास शिमगी पोर्णिमा न्हावी म्हणून ममतायुक्त आग्रहाने बोलावून साताऱ्यास घेऊन आले.''[१२२] साताऱ्यास दोघा बंधुंना पाहण्यासाठी व दर्शनासाठी खूप गर्दी झाली होती. संभाजी राजे यांचा साताऱ्याला दोन महिने मुक्काम होता. नंतर स्वत: शाहू महाराज चारकोस पावेतो जावून संभाजीराजे यांना पन्हाळ्यास रवाना केले.

शाहू महाराज आणि संभाजी राजे यांचा प्रसिद्ध 'वारणा तह' याच मुक्कामी चैत्र वैद्य द्वितीया शके १६५६ (ता. १३ एप्रिल. १७३१) रोजी झाला. या तहात एकूण नऊ कलमे आहेत. त्यातील कलमे प्रकरण चार मध्ये दिली आहेत. या कराराप्रमाणे सर्व गोष्टी प्रत्यक्षात आलेल्या आहेत असे नाही. कलम ५ व ८ ही दोन सामान्य व्यवस्थेची कलमे अंमलात आली. कलम ३ ही अमलात आले. कलम २ प्रमाणे तुंगभद्रेच्या पलिकडे अनेक स्वाऱ्या झाल्या, त्यात कोल्हापूरकरांनी भाग घेतला नाही. कलम ६ प्रमाणे वारणेपासून तुंगभद्रेपावेतोच्या मुलूखापैकी जो प्रत्यक्ष संभाजीच्या ताब्यात नव्हता तो शाहू व पेशव्याने जिंकून घेतला. संभाजीला मिळाला नाही. कलम ७ ची हीच व्यवस्था कलम ९ प्रमाणे मिरज ठाणी उदाजी चव्हाणाच्या ताब्यात होती. ती संभाजीने शाहूस दिली नव्हती तथापि या तऱ्हेने संभाजीच्या राज्यात वाढ झाली नाही.

सरदेसाई गो. स लिहितात, ''ममताळू अंत:करणाचे गुण व दोष दोन्ही शाहूच्या कारभारात दिसतात. खासगी दरबारात अशी दया शोभते. पण राजकीय व्यवहारात त्यामुळे ढिलाई होऊन राज्याची कलमे बिघडतात. संभाजीने कितीही विरोध केला तरी शाहूने त्याला कठोरपणा दाखविला नाही. कसा झाला तरी संभाजी आपला भाऊ त्याचाही राज्यावर हक्क आहे हे शाहू विसरला नाही. तसेच इतरांनी संभाजीच्या वाटेस जाऊ नये असा सक्त बंदोबस्त शाहूंचा होता.''[१२३] यावरुन संभाजीचे राज्य शाहू महाराजांच्या मर्जीवर अवलंबून होते.

छ. शाहू कधी संभाजीच्या भेटीस गेले नाही. परंतु संभाजीला वारंवार त्यांनी आदरपूर्वक बोलावणी पाठवून आपल्या भेटीस साताऱ्यास आणले आणि महाबळेश्वर, प्रतापगड, जेजुरी, शंभूमहादेव, इत्यादी ठिकाणे नेऊन त्यांच्याकडून तिर्थयात्रा, शिकार वेळोवेळी करवून घेतले. इ.स. १७३१ च्या वारणेच्या तहानंतर शाहू व संभाजी यांच्या भेटीचे उल्लेख मिळतात खालील प्रमाणे-

पहिली भेट ता. २६ नोव्हेंबर स.१७३२, नंतरची भेट ही ता. ६ डिसेंबर १७३४ (पे.४, १८, १.३), तिसरी भेट ता. १८ एप्रिल १७३५ ला झाली. चौथी भेट ता. २६ एप्रिल १७३६ ला झाली. पाचवी भेट ही सहा महिन्याची होती आणि ती महत्त्वाची होती. शाहूच्या पश्चात संभाजीला गादी देऊन छत्रपतीची दुही मिटविण्याचा प्रयत्न नानासाहेबांनी केला. त्यास शाहूचा विरोध होता. म्हणून नानासाहेबांनी संभाजीशी गुप्त करार केला. परंतु हा बेत अंमलात आला नाही.

शाहूंच्या पश्चात अखेरची भेट इ.स. १७४७ ला झाली. अखेर संभाजी राजे ता. २० डिसेंबर १७६० रोजी मृत्यू पावले. ''संभाजीची स्वारी कसबे वडगाव येथे होती. तेथे प्रकृती जड जाहली. टोपनजीक माळावर कैलासवास झाला. संभापूर नाव ठेविले. गाव वाशविल्य. त्यांचे दहन कोल्हापूर येथे पंचगंगेच्या काठी झाले.''[१२४]

अशाप्रकारे एका कालखंडाची समाप्ती झाली. त्यांनी एकूण ४६ वर्षे राज्य केले.

### ३.१० दाभाडे : पेशवे संघर्ष : छत्रपती शाहूंची मध्यस्थी:-

इ.स. १७२६ च्या सुमारास आणखी एक गृहकलह निर्माण झाला. तो म्हणजे दाभाडे-पेशवे कलह होय. परंतु या संघर्षात अप्रत्यक्ष हात निजामाचा होता. त्यास पेशवा बाजीरावाचे वर्चस्व सहन होत नव्हते. म्हणून त्याने दाभाड्याच्या व बाजीरावाच्या बनावाचा फायदा घेऊन दाभाड्यास भडकावून बाजीरावाविरुद्ध उभे केले.

खरे तर राजाच्या संकटकाळी दाभाडे कुटुंबाने अमौलिक सेवा केल्यावरुन ता. २९ ऑक्टों. १६९८ रोजी राजाराम छत्रपतीने प्रांत जुन्नर सरकार मधील ७९५ गावांचे पाटीलकीचे वतन वंश परंपरेने इनाम दिले. पुढे खंडेरावांची भरभराट होऊन ता. ११ जानेवारी १७१७ रोजी त्यास शाहूने 'सेनापती' पद देऊन गुजरातेत मोहिम करुन तो प्रांत सर करण्याचा हुकूम दिला. तो वयोवृद्ध झाल्यावर त्र्यंबकराव दाभाडे व पिलाजी गायकवाड गुजरातेत अंमल बसवू लागले. खंडेराव आजारी पडल्यावर घरातील सर्व कारभारी झाले. बाजीरावाच्या वर्चस्वाबद्दल ज्यास वैषम्य वाटे त्यात खंडेराव दाभाडेही होता. पुढे त्र्यंबकराव दाभाडे व बाजीरावांचेही स्वारस्य जमले नाही. समजुतीसाठी पेशव्याने भेटण्यास बोलावले तेव्हा त्याने गोड भाषणे केली. ता. २७ सप्टें. १७२९ ला खंडेराव दाभाडेचा मृत्यू झाला.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''शाहूने ता. ८ जानेवारी १७३० रोजी खंडेरावपुत्र त्र्यंबकरावास सेनापतीची वस्त्रे तर यशवंतरावास सेनासरखेलची वस्त्रे दिली.''[१२५]

पुढे सेनापती त्र्यंबकराव दाभाडे यास गुजरातेत सत्ताविस्ताराची मुभा मिळाली होती. त्याप्रमाणे त्याचे हस्तक पिलाजी गायकवाड व कंठाजी कदम बांडे गुजरातमध्ये शिरुन चौथाई वसूल करण्याचे कार्य करीत होते. यावेळी सरबुलंखान गुजरातच्या सुभेदारीवर होता.

गुजरातेतील चौथाईचा उद्योग शाहूंच्या विशिष्ट योजनेत सिद्ध झाला होता. कर्नाटक, माळवा, गुजरात या प्रांतात मराठ्यांची मुलूखगिरी शाहूंच्या आज्ञेने एकसमान चालू होती. यावेळेच्या आज्ञापत्रात छत्रपती शाहूने सरदारास दिलेले प्रोत्साहन व्यक्त होते. कंठाजी कदम, कृष्णाजी दाभाडे, रघुजी कदम व पिलाजी गायकवाड यांनी कळविले की, ''तुमचे विषयी राजश्री सेनापती यांनी सांगितले ते कळले सर्व प्रकारे तुमचे आगत्य आहे. स्वामी तुमचे अंतीम करणे ते करतील.''[१२६] सरबुलंखानाने मराठ्यांच्या त्रासातून मुक्त होण्यासाठी आपणहूनच चौथाईचे हक्क देण्याचे मराठ्यास कबूल करुन दिले.

इ.स. १७२६ मध्ये पेशव्यांच्या वतीने चिमाजी अप्पाने गुजरातेवर स्वारी करुन चौथाई वसूल केली. त्यातून पेशवे- दाभाडे वाद निर्माण झाला. सरदेसाई गो. स. लिहितात, ''सेनापतीस गुजरातच्या मुलूखगिरीची व बाजीरावास माळव्याच्या मुलूखगिरीची अशी वाटणी महाराजांची असता बाजीरावाने सेनापतीस बोलणे लावले की, गुजरातेतील महाल निम्मे आम्हाला दयावे व माळव्यातील निम्मे महाल तुम्ही घ्यावे. तेव्हा सेनापती म्हणाले, तुमचा कारभार तुम्ही करावा, आमचा कारभार आम्ही करु वाटणी करु नये.''[१२७] यातून तंटा वाढला. पेशव्यास शाहूंची मुलूखगिरीची व्यवस्था मान्य नव्हती. त्यांच्यामते यामुळे मराठे सरदार स्वतंत्र होऊन अलग पडतील, एकजूट राहणार नाही. त्यायोगे मुख्य प्रधानाची हुकूमत व देखरेख चालावी. पेशवे व महाराज मिळून मध्यवर्ती सरकार अशी पेशव्यांची भावना होती. गुजरातेत बांडे व पवार हे शाहू तर्फे होते व पिलाजी गायकवाड सेनापतीच्या वतीने होता. बांडे व पिलाजी यांच्यात तंटा होऊन युद्ध झाले. पेशवे-दाभाडे यांची भांडणे त्यांच्या हस्तकांनी उचलले, हे छत्रपती शाहूस उद्वेगाकारक वाटले. त्यामुळे ते आपणहून तडजोड ठरवित होते.

यादरम्यान कंठाजी व पिलाजींनी एक होऊन पेशव्यांचे प्रतिनिधी उदाजी पवार यास गुजरातमधून हुसकावून लावले. यावेळी गुजरातचा निम्मा मुलूख चिमाजी अप्पाकडे होता. तो छत्रपती शाहूंनी दाभाडेकडे बेगमीवर दिला. तरीही दाभाडेंनी पेशव्यांच्या मुलूखावर हात मारला. शाहूंनी या आगळीकीबद्दल ता. २१ मे १७२८ ला दाभाड्यास जरब दिली." तुम्हास माळवे प्रांती जावून धामधूम करुन फौजा घ्यावयास, मुलूख खराब करावयास गरज काय..."[१२८] परंतु या जरबेने कलह थांबला नाही.

इ.स. १७२९ मध्ये चिमाजी अप्पाने गुजरातेवर स्वारी करुन गायकवाड व कदम बांडे यास जरब बसविली. त्यानंतर पटेलदा धोलका, हमादी ही शहरे लुटून सरबुलंदखानास नव्याने तह करावयास लावला. गुजरातची चौथाई, सरदेशमुखी छ. शाहू महाराजांच्या कराराने लिहून घेतली.

दाभाडे यांचा गुजरातवर हक्क असल्याने वरील तह त्यास अपमानास्पद वाटला. बाजीराव सेनापतीपेक्षा श्रेष्ठ समजतो असा गृह दाभाड्यांचा झाला. छत्रपती शाहू समजूतीच्या मार्गाने तंटा मिटविण्याचा प्रयत्न करीत होते. छत्रपती शाहूंनी बाजीरावास सुचविले की, गुजरात दाभाड्यांच्या हवाली करुन कलह मिटवावा. यावर चिमाजीरावाने बाजीरावास कळविले की, दाभाड्यांनी कब्जा केला तर तो आम्ही सांभाळतो त्याची काळजी करु नये. पण ते जर निजामास जाऊन भेटले तर त्यांचा हुद्दा पिरिच्छिन्न दूर करावा एवढी गोष्ट महाराजांशी पक्की करुन मग दाभाड्यांना गुजरातच्या सनदा द्याव्यात.

त्यामुळे दाभाडे पेशव्याविरुद्ध बंडास तयार झाले. त्यास गायकवाड, कदम बांडे, उदाजी पवार सामील झाले. प्रतिनिधींचा पाठिंबा मिळाला. बाजू भक्कम करण्यासाठी दाभाडेंनी निजामाचे साह्य घेण्याचे ठरविले. निजाम या संधीचीच वाट पाहत होता. त्याने साह्य करण्यास कबूल केले. या बंडाचा सुगावा लागताच बाजीरावाने छत्रपती शाहूस कळवून त्वरेने गुजरातकडे निघाला. छत्रपती शाहूने बाजीरावास कळविले की, सेनापतीस समजावून साताऱ्यास आणावे, परंतु सेनापतीने बाजीरावास गुजरातकडे येण्यास नाकारले व लढाई सुरु केली.

देशपांडे प्र. न. लिहितात, "त्वरेने बडोदयापर्यंत मजल मारुन बाजीरावाने दाभाड्यास चकित केले. दाभाड्यांने १० हजारांची फौज बरोबर घेऊन डभई या ठिकाणी

बाजीरावास गाठले. ता.१ एप्रिल १७३१ या रोजी युद्ध होऊन त्र्यंबकराव दाभाडे गोळी लागून ठार झाला. दाभाड्याचा पराभव झाला त्यामुळे सरदारांवर वचक बसला.''[१२९]

महाराजास हे समजताच त्यांनी म्हटले, ''अविवेक करुन नवाबाशी राजकारण केले. दुर्बुद्धी धरुन आगळीक करुन आपणातच लढाई केली. त्याचे फळ झाले...''[१३०]

बाजीरावाचीही परिस्थिती कठीण होती. उमाबाईंनी आकांड तांडव केले. त्यावरुन खूद्द छ. शाहूंनी तळेगावास जाऊन उमाबाईस समजूतीसाठी साताऱ्यास आणले. यशवंतराव दाभाडे यास सेनापती करुन दाभाडे-पेशवे संबंध चांगले करण्याचा प्रयत्न केला. बाजीराव व चिमाजीस ऊमाबाईच्या पदरी घालून त्यास एक केले. यावरुन छ. शाहूचे वजन किती होते हे कळते. तसेच सेनापतींनी पेशव्यांच्या आज्ञेत चालावे हा ठराव केला. गुजरातची वाटणी केली. सेनापतीस सामील झालेल्यांना क्षमा केली. सेनापतीच्या प्रकरणाने बऱ्याच गोष्टीचा निकाल लागला. डोईजड सरदारांना नरम करण्यास छ. शाहू कमी करीत नाही याची इतरांना खात्री पटली. यावरुन छ. शाहूंची धमक व्यक्त होते.

### ३.११ जंजीरा मोहिम : सिद्दीचे पारिपत्य:-

जंजिऱ्याच्या स्वारीचा उद्भव ब्रम्हेंद्रस्वामीमुळे झाला. राजाराम महाराजांनी या स्वामीस कोकणात धामणी गाव इनाम दिले होते. तेथे त्यांच्या तपश्चर्यामुळे स्वामी पुढे प्रसिद्ध झाले. पेशवा बाळाजी विश्वनाथही त्यांच्या भजनी लागला. बाळाजीस हाबशी व आंग्रे यांच्या भांडणात पडावे लागले.

जंजीऱ्यावर सिद्धीचे वर्चस्व होते. तो मराठ्यांचा कट्टर शत्रू होता. सिद्दीचे वर्चस्व मान्य केले होते. कान्होजी आंग्रेच्या मृत्युमुळे सिद्धीस जोर चढला होता. कोकणातील परशुराम क्षेत्रात स्वामींचे वास्तव्य होते. यावेळी सीद्दी रसूल याकूदखान जंजिऱ्याचा कारभारी होता. तोही स्वामीचा भक्त होता. त्याने स्वामीच्या परशुराम येथील देवालयाच्या खर्चासाठी पेढे व अंबडास हे दोन गावे इनाम दिली. परंतु अंजनवेल ठाण्यास उपद्व्यापी सिद्दीसात हा अधिकारी होता. त्यास कर्नाटक नवाबाकडून हत्ती मिळाला होता. त्याने हत्तीस आणण्याची जबाबदारी स्वामीस दिली. परंतु वाटेत आंग्रेंच्या लोकांनी विनापरवानगीमुळे हत्तीस पकडले. त्यामुळे सिद्दीसातचा गृह झाला की यामागे स्वामीचा

हात आहे. त्यामुळे त्याने परशुराम क्षेत्राचा नाश केला. यामुळे स्वामींनी रागाने सिद्दीसाठ्याच्या पाडावासाठी अनुकूल करुन जंजीरा काबीज करण्याची खटपट सुरू केली.

इ.स.१७३३ नंतर छ. शाहू यांनी ही मोहिम आखली. कान्होजीच्या मृत्यूनंतर त्याच्या पश्चात सेखोजी आंग्रे यास शाहूंनी सरखेलीचा कारभार दिला. ता. १२ फेब्रुवारी १७३२ रोजी बाजीराव कुलाब्यास गेला होता. याविषयी सेखोजी लिहितो, ''त्याच्या आमच्या परस्पर भेटी झाल्या उत्तम प्रतीने सौरस्य जाहले.''[१३१] या भेटीत जंजीऱ्याच्या मोहिमेची वाटाघाट करुन एकमेकास साह्य करण्याचे निश्चित केले. या मोहिमेवर बाजीराव, प्रतिनिधी, सेखोजी आंग्रे व इतर मराठा सरदारास नेमले होते.

इ.स. १७३३ ला प्रत्यक्ष जंजीऱ्याला एक क्रांतीकारक घटना घडली. सिद्दी प्रमुख रसूलखान याचा फेब्रुवारी १७३३ मध्ये मृत्यू झाला. त्याचा मुलगा अब्दुल्ला मराठ्यांचा प्रतिस्पर्धी आहे म्हणून त्याला गादी मिळू नये असा प्रयत्न सिद्दी गोटात होता. तेव्हा अब्दुल्लाचा मुलगा सिद्दी रहमान याने मराठ्यांकडे मदत मागितली. ही गोष्ट छत्रपती शाहूस कळताच त्यांनी ताबडतोब बाजीरावास साताऱ्यास बोलावून फौजेसह कोकणात उतरवले.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''यावेळी शाहूने लढण्याची तयारी फार चांगली केली होती. दाभाडे, आंग्रे, गायकवाड या सर्वांस बाजीरावाची कुमक करण्याची आज्ञा दिली. सुरतेहून सिद्दीस मदत मिळू न देण्याविषयी दाभाडेस लिहिले''[१३२] परंतु बाजीराव-दाभाडे वादामुळे त्यांनी वरवरची मदत दाखविल्याने सिद्दीस सुरतेहून मदत मिळाली.

पेशवे बाजीरावाने सिद्दीच्या यादवीचा फायदा घेऊन वेगाने राजापूरीवर गेला व राजपूरी, खोकरी, तळे, छेसाठे, बिरवाडी इ. ठिकाणे सर केली. तसेच अब्दुल रहेमान व सेखोजी मराठ्यांना येऊन मिळाले. राजपूरीतील बालरोझा मशीदीजवळ छावणी करुन पेशव्याने जंजीरा किल्यावर हल्ला करण्याची तयारी केली. यावेळी चकमकीत बाजीरावाचा जय झाला. तेव्हा सिद्दीने पाण्यातून लढण्याची तयारी केली. बाजीरावचे व सेखोजी आंग्र्यांचे संगनमत होते. त्यांनी सिद्दीच्या नाक्याच्या जागेवर हल्ले सुरु केले.

सुवर्णदुर्गचा किल्लेदार बालाजी नाईक याने बाणकोट व मंडणगड ही मोक्याची ठिकाणे हस्तगत केली. तर जयगडच्या किल्लेदाराने विजयगडचा ताबा घेतला.

कोकणातील ही मोहिम त्वरेने संपविण्यासाठी शाहू महाराजांनी ता २० मेच्या सुमारास श्रीनिवास प्रतिनिधी, आनंदराव सोमवंशी सुरलष्कर, कृष्णाजी दाभाडे सरदारास फौज देऊन कोकणात पाठविले व उदाजी चव्हाण, शंभूसिंग जाधव व सचिव यांनाही फौज पाठविण्यास आज्ञा दिली.[१३३]

छ. शाहूच्या हुकूमाप्रमाणे प्रतिनिधी मे महिन्यात कोकणात उतरले. बाजीरावास न कळविता प्रतिनिधीने वेगळेच कारस्थान रचून इतिहासप्रसिद्ध किल्ला मराठ्यांच्या 'तख्ताची जागा' ता. ८ जून रोजी सर केला. यामुळे प्रतिनिधीची दरबारात वाहवाह झाली. परंतु त्यामुळे पेशवे संतप्त झाले. कारण त्यांना भेटून प्रतिनिधींनी ही योजना आखावयास होती. कारण पेशवे व प्रतिनिधींची मने साफ नव्हती. त्यांच्या या कृत्याने पुढे द्वेषभाव वाढत जाऊन मोहिमेस म्हणावे तसे यश आले नाही.

सहस्त्रबुद्धे पु.गो. लिहितात, ''सेखोजी आंग्रे यांचा सरदार बंकाजी नाईक याने सिद्दी खानाचा पाडाव करुन त्याला गोवळकोटपर्यंत मागे रेटीत नेले. आता गोवळकोंडा पडला असता. पण प्रतिनिधीने लढाई अमान्य करुन वाटाघाटी सुरु केल्या, त्यामुळे नाईक परत गेला.''[१३४] परंतु प्रतिनिधीस वाटाघाटीस यश आले नाही.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''या मोहिमेत शाहूचे लक्ष किती होते आणि तो सरदाराची समजूत कशी काढत होता, हे त्याने बाजीरावास लिहिलेल्या पत्रावरुन कळते. सहा किल्ले फत्ते झाले उत्तम गोष्ट झाली. तुम्ही कार्यकर्ते बुद्धीमंत सेवक आहा, कार्यसिद्धी घेऊन ये, तोच अर्थ संपादाल हा स्वामीस निशा आहे. तुम्ही साम,दाम, भेद , बुद्धी कर्तव्य तैसी करुन महद यश संपादले. सर्वांचे मनोधारण करुन कार्यसिद्धी करणे. रा. श्रीनिवास प्रतिनिधीकडील जमाव व सचिव पंताकडील जमाव तुम्हा संनिध आहे त्यांचा व जे मराठे लोक भेटले असतिल त्यांचा बहुत प्रकारे दिलदिलासा करुन खर्चा वेचास देत जाणे....''[१३५] निरनिराळ्या सरदारातील असंख्य चुरस असून त्याचा परिणाम अनिष्ठ होईल असा शाहूंच्या मनातील ध्वनी पत्रातून व्यक्त होतो.

इकडे सिद्दीने चोहिकडे कारस्थान लावले. आंग्रे यांची सरशी होत जाऊ लागली. तेव्हा इंग्रजास ते कठीण वाटले. रेवस, थळ, चील ही बंदरे आंग्रेकडे गेली व अंदेरी हे बेट जर आंग्रेकडे गेले तर आपला व्यापार बसेल यामुळे इंग्रजांनी सिद्दीस मदत देवून ऊदेरीचा ताबा घेतला. तेव्हा मराठ्यांनी खंदेरीवरुन ऊदेरीवर हल्ला केला छ. शाहूसही इंग्रजांची ही आगळीक आवडली नाही.[१३६]

बाजीरावाची जंजिऱ्याची मोहिम हे सेखोजी आंग्रेच्यांवर अवलंबवून होती. परंतु त्याचा इ.स. १७३३ ला मृत्यू झाल्याने त्याचे बंधु संभाजी व मानाजीत वैर असल्याने ही मोहिम ढिली पडली. छ. शाहूंनी संभाजीस सरखेलीचे पद दिले. परंतु त्यास झेपले नाही. अखेर या मोहिमेतून बाजीरावाने अंग काढून ता. १७३३ ला सिद्दीशी तसा तह करुन बाजीराव साताऱ्यास आला. तहानुसार सीद्दी आब्दुल रहमान यास जंजिऱ्यात तख्तावर बसवून किल्ले घेतले, त्यापैकी रायगड व महाड हुजूर महाराणी ठेवून वरकड किल्ल्याचा बंदोबस्त बाजीरावसाहेबांनी केला. साडेपाच महाल दारास देवून वरकट सरकारात घेतले हा तह ताळीबागनजीक नवदरे येथे झाला.[१३७]

### ३.११.१ सिद्दीसातचा पाडाव : ता. १९ एप्रिल १७३६:-

बाजीरावाने अंग काढून घेतल्यावर मोहिम अयशस्वी व्हावयास हवी होती परंतु छ. शाहूंनी आपला जोर लावून धरला. संभाजी आंग्रे यास मोहिम सुरु ठेवण्याची आज्ञा शाहूंनी दिली. यावेळी छ.शाहूंनी सर्व सरदारांना फौज जमविण्याविषयी जिवतोडून आज्ञा दिलेल्या आढळतात. अंजनवेल व गोवळकोट ही हस्तगत करण्यासाठी जातीने लक्ष घातले. तसेच सिद्दी सातास फितविण्याचा उद्योग सुरु केला.

यावेळी छ. शाहूंनी धोरणात्मक पाऊल उचलत चिमाजीअप्पास कोकणात पाठविले. अखेर रेवासनजीक श्रीगाव येथे सीद्दीची व मराठ्यांची लढाई झाली. त्याचे १३०० लोक मेले. मराठ्यांचे ८०० माणूस कामास आले. मानाजी आंग्रेच्या उरास गोळी लागली. सिद्दीसातास नानाजीराव सुर्वे याने स्वत: ठार केला. त्यात त्याला २७ जखमा झाल्या. ह्याबद्दल त्यास कुसगांव इनाम मिळाले. या लढाईत सिद्दी सातास उंदेरीचा सिद्दी याकूब, ठार झाले अशा प्रकारे चिमाजी अप्पास यश आले. अखेरीस सिद्दी

रहेमान याने पेशव्याशी पूर्वीचा तह कायम करुन युद्ध थांबविले. तूर्त ही गोवळकोट व अंजनवेल हबशाकडे राहिली.

पुढे तुळजीच्या आंग्रेच्या काळात ता. २३ जाने १७४५ रोजी अंजनवेल नगर गोवळकोट दोन्हीही क्षेत्र मराठ्यांनी घेतली. अखेरीस या मोहिमेत मराठ्यांस अल्पसे का होईना यश आले. ते छ. शाहू महाराजांच्या धर्मशाली स्वभामुळे हे समजून येते.

### ३.१२ पेशवा बाजीरावची दिल्लीवर स्वारी : मार्च १७३६-उत्तर दिग्वीजय:-

बाजीरावच्या उत्तरेकडील स्वारीच्या आधी म्हणजे मधल्या काळात बाजीरावाची आई राधाबाई. जयपूर, मथुरा, वृंदावन, कुरुक्षेत्र, प्रयाग, काशी, गया इ. ठिकाणी तिर्थयात्रा करुन परतली. जागोजागी तिचे सत्कार झाले.

इ.स. १७३५ चा पावसाळा दिल्लीस बादशहाच्या दरबारास व साताऱ्यास छ. शाहूंच्या दरबारात मोठा खळबळीचा गेला. बादशहास मराठ्यांचे वर्चस्व सहन होत नव्हते. मात्र तो स्वत: दुबळा असल्यामुळे त्याच्या दरबारात मराठ्यांच्या धोरणा विषयी दोन पक्ष झाले होते. जयसिंग आणि खान दौरान हा एक पक्ष व सादतखान, कमरुदिनखान व महमंद खान बंगश हा दुसरा पक्ष. पहिल्या पक्षाचे म्हणणे होते की, मराठ्यांबरोबर मैत्रीचे धोरण ठेवून त्यांच्यावर संरक्षणाची जबाबदारी टाकणे तर दुसऱ्या पक्षाचे म्हणणे होते की, आम्हाला सत्ता द्या, निजामास बोलवा आम्ही मराठ्यांस नष्ट करु. बादशहाला कोणताच निर्णय पक्का होईना. मोगल सरदारांनी जयसिंहाच्या निष्ठेविषयी शंका घेतली. जयसिंहानेही बाजीरावाशी गुप्त करार करुन बाजीरावास बोलाविले होतेच. त्यात सादतखानाचे बळ कमी झाल्याने बादशहाने जयसिंगास बाजीरावाशी भेट घेऊन तह ठरवून सख्य जोडण्याविषयी सांगितले. बाजीरावही इ.स.१७३५ ला धनत्रयोदशीस उत्तरेकडे जाण्यास निघाला.

### ३.१२.१ पेशवा बाजीराव व सवाई जयसिंग भेट :-

जयसिंगाने बाजीरावास भेटण्याची जबाबदारी स्वीकारली व बाजीरावास प्रत्यक्ष भेटीस बोलाविले. बाजीराव येत असताना तो राजपूतांचा सत्कार स्वीकारीत उदेपूर,

नायद्वारावरुन जयपूरास गेला. प्रवास करताना लहान मोठ्या रजपूत सत्ताधिशांनी पेशव्यांची भेट घेऊन सत्कार केला.[१३८]

उदेपूर हे मुख्य संस्थान त्याने मैत्रीचा हात पुढे करुन त्याच्या स्वागतासाठी सुवर्ण सिंहासन केले व त्यावर बसण्याची विनंती केली. यावर बाजीराव म्हणाला 'आपण चक्रवर्ती, मी आपल्या बरोबरीने बसणे योग्य नाही.' या कृतीने राजपूतांची मने बाजीरावाने जिंकली. उदेपूर राजाने सालीना दीड लाख रुपये चौथाई देण्याचे कबूल केले.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''४ मार्चला बाजीराव व जयसिंग यांची भेट किशनगडनजीक बेंभोला येथे झाली.''[१३९] प्रत्यक्ष भेटीमध्ये सवाई जयसिंगाने माळवा प्रदेशातील चौथाईचा हक्क त्याचप्रमाणे बुंदी ते भडवार दरम्यान असलेल्या राजपूत राज्यावरील चौथाईचा हक्क बादशहाकडून देण्याचे कबूल केले. तसेच बादशहाची भेट घडविण्याचे ठरविले.

आता बाजीराव व बादशहाची भेट होणार या वर्तमानाने सर्वत्र खळबळ उडाली. बादशहाही बुचकळ्यात पडला. निजामानेही बादशहास भेट न घेण्याची सूचना केली. त्यामुळे बादशहाने काही अटी मान्य करुन आजचे मरण उदयावर ढकलले. परंतु दुसऱ्या पक्षाच्या विरोधाने वेळ जाऊन मे महिना उजाडल्याने बाजीरावास परत फिरावे लागले. मात्र परतताना त्याने मराठी फौजास माळव्यात छावणी करून राहण्यास सांगितले व पुन्हा दिल्लीवर येण्याची योजना आखली.

### ३.१२.२ दिल्लीवर चढाई:-

बाजीरावाच्या आक्रमक धोरणातून युद्धाचा प्रसंग उद्भवणार याची दिल्ली दरबाराला खात्री होती. दरम्यान मराठी फौजा चंबळ खोऱ्यात जमा झाल्या तेव्हा बादशहाने सर्व सरदारांना एकत्र बोलावून युद्धाची तयारी सुरु केली व निजामासही मदतीस बोलाविले. तेव्हा बाजीरावाने पुन्हा दिल्लीस जाण्याचे ठरविले. ही मोहिम अगदी जगडण्याळ होती. १००० मैल लांब व ५०० मैल रुंद विस्तृत प्रदेशात युद्धाचा भडका झाला होता. भोपाळ, भोलसा, बोडशा, दातिया, भदावर, अटेर, दुआब व शेवटी दिल्ली असे हे संग्राम झाले. प्रत्येक ठिकाणी मराठ्यास विजय मिळाला. परंतु एकदा मात्र दुआबात होळकरांचा पराभव झाला. परंतु तेवढ्यावरुन सादतखानाने आपण मराठ्यांस

बुडविले. अशी बादशहापाशी फुशारकी मारली तेव्हा बादशहाने त्याचा सत्कार करुन वस्त्रे पाठविली.[१४०]

सरदेसाई गो. स. लिहितात, "इकडे बाजीरावाने बादशहास धडा शिकविण्यासाठी ता. २८ मार्च १७३६ रोजी फत्तेपूर साक्री व दिग यांचे दरम्यान मोगल फौजांच्या मधून त्यास चुकवून बाजीरावं एकदम दिल्लीवर हल्ला करुन दहशत निर्माण केली."[१४१] यानंतर बाजीराव परत फिरला कारण त्यास बादशहास त्रास देण्याचा विचार नव्हता फक्त त्यास मराठ्यांचे अस्तित्व बादशहास दाखवायचे होते. परतीच्या वाटेवर एकदोन चकमकी होऊन तो पावसाळाच्या प्रारंभी दक्षिणेला आला. त्याला अडविण्यासाठी निजाम आला होता. मात्र त्यास चुकवून बाजीराव खाली आला कारण त्यावेळी त्यास संग्रामाची इच्छा नव्हती. कारण त्याचे सैनिक थकलेले होते. परंतु लवकरच भोपाळ येथे निजामाचा पराभव करुन दिल्ली दरबारातील मुत्सद्याचा भ्रम दूर केला.

बाजीरावाच्या या स्वारीवर छ. शाहूंनी किती भिस्त ठेवली होती हे शाहूच्या पत्रातून व्यक्त होते."...कोठे आहा, काय विचार, पुढे कोठपर्यंत जाणार, मुगल अमीरसहवर्तमान काय करीत आहेत, हे सविस्तर दिनप्रतिदिन लिहित जाणे, पलिकडे भेटीचा विचार घडणार म्हणून परस्पर ऐकिवतो. ऐशियास मोगली मनसुबा, इमान देऊन आपला मतलब साधतील, त्याचा विश्वास मानावा असा अर्थ नाही, याजकडील शहरात जाऊन भेट घ्यावयाचा मनसुबा करीत असतिल तर सर्वथा न कळले. भेट न घेता दुरुनच ज्याचे हाते तुमचे राजकारण असेल त्यापासून आपले मतलब सादावयाचे असणे ते साधने ...आणि निजाम इकडून फारच वळवळ करुन त्या प्रांते येत आहेत. त्याचा विचार काही करत नाही तरी बहुत सावधपणे मनसुबा करणे..."[१४२] यावरुन छ. शाहूंची बाजीरावास मार्गदर्शनपर पत्रे जात होती. यातून मोगलांचा स्वार्थी व घातकी कावा छ. शाहूस माहित होता. त्यामुळे ते बाजीरावास वेळोवेळी सावध करीत होते.

### ३.१३ वसईची मोहिम : पोर्तुगीजांचा बंदोबस्तः-

कोकणातील साष्टीच्या प्रांतावर पोर्तुगीजांचा ताबा होता ते तेथील हिंदुवर जुलूम करीत असत अखेर हिंदू प्रजेनी छ. शाहू व पेशवे याकडे आपली गाऱ्हाणी मांडली.

छ. शाहू यांनी बाजीरावास बोलावून आज्ञा दिली की, "जे कोकण प्रांती फिरंगी यांजकडे साष्टी, वसई वगैरे तालुका मधीच राहिला, तिकडे फौजसुद्धा हाशम वगैरे घेऊन जाऊन, मसलत करुन ते जागा घ्यावे. कोकणप्रांत निवैध करावा. अखेर छ. शाहूच्या आज्ञेने तसेच त्यांच्या हाताखाली, शिंदे, होळकर, बाजी भिवराव, तुकोजी व भिकाजी पवार इ. सरदार दिले. त्यात सिद्दीशी तह झाल्याने छ. शाहूंना या मोहिमेवर लक्ष देता आले."

छ. शाहू महाराजांनी जंजिऱ्याच्या मोहिमेचा अनुभव घेऊन त्यावेळी त्यांनी चिमाजी अप्पास मोहिमेचे पूर्ण स्वातंत्र्य देऊन त्यांच्यावर संपूर्ण जबाबदारी टाकली हे विशेष होय.

पाश्चात्य युद्धपातळीवर मराठे विजय मिळवितील असे कोणासही वाटले नाही परंतु मराठ्यांनी पाश्चात्य युद्धपद्धतीवर विजय मिळवून सर्व परकीय सत्ताधिशांस जरब दिला. या मोहिमेतील यशाने इंग्रजही नरम पडले हे विशेष.

सहस्त्रबुद्धे पु. गो. लिहितात, "इंग्रजांनी बाजीरावाची मर्जी सांभाळण्याकरिता 'चौल' हे महत्त्वाचे ठिकाण ताब्यात दिले."[१४३] यामुळे इंग्रजावर मराठ्यांची मर्जी प्रसन्न राहिल असा अंदाज होता.

इ.स. १७३८ च्या डिसेंबरला चिमाजीअप्पा कोकणात उतरला. त्या आधीच ठाण्याचा किल्ला मराठ्यांनी घेतला त्यामुळे मराठ्यांची बाजू बळकट झाली. चिमाजीअप्पा आल्यावर माहिम, तारापूर, वेसावे, मठ अशा अनेक लढाया झाल्या. त्या सर्व मराठ्यांनी जिंकल्या वसईला तिन महिने वेढा दिला. गोव्याकडून मदत मिळू नये म्हणून अप्पाने व्यंकटराव यास पाठविले. त्याने मोठा पराक्रम करुन गोवा पादाक्रांत आला. अखेर पोर्तुगीजांनी शरण येऊन वसई ताब्यात दिली.

मे १७३९ मध्ये चिमाजी अप्पाने परमहंस स्वामीस लिहिलेल्या एका पत्रात वसईच्या मोहिमेचा तपशील आढळतो. तो इतिहास लेखसंग्रहामध्ये दिला आहे. त्यातील उदगार,"टोपीकर म्लानवत झाले." असे अभिमानाचे हे दिसते. जून अखेर चिमाजी साताऱ्यास छ. शाहूच्या दर्शनास आला. छ. शाहूंनी त्याचा गौरव केला.

अशा पद्धतीने छ. शाहूंच्या मार्गदर्शनाखाली व चिमाजी अप्पांच्या नेतृत्वाखाली मराठ्यांनी आपल्या शिरपेचात आणखी एक यशस्वी मोती खोवला आहे.

## ३.१४ कान्होजी भोसले यांचे बंड : छ. शाहू यांची मध्यस्थी:-

बादशहाच्या कैदेतून सुटका होवून छ. शाहू दक्षिणेत आला. तेव्हा त्यास पहिली मोठी मदत परसोजी भोसल्याची मिळाली. ती मिळाली नसती तर छ. शाहूंचा जमच बसला नसता. परसोजी भोसले हा छ. शिवाजीच्या तालमीत झालेला सरदार होता. परसोजी वारल्यावर त्याचा अधिकार कान्होजीस मिळाला. तो अधिकार त्याने इ.स. १७२९ पर्यंत चांगला बजावला. कान्होजीने मुलगा नसल्याने आपल्या चुलत भावाचा मुलगा रघुजी जवळ ठेवला परंतु त्यास पुत्र झाल्यावर त्याकडे लक्ष कमी केले.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''या रघुजीने साताऱ्यास असता छ. शाहूस शिकारीवर असताना वाघाच्या हल्ल्यापासून वाचविले होते.[१४४]

छ. शाहूंनी वऱ्हाड, खानदेस, नेमाड, हेव्या, माळवा, भागानगर या प्रदेशाचा मोकासा ता. २४ जाने. १७१७ रोजी कान्होजीस दिला होता. कान्होजीचे वास्तव्य नागपुरात होते. त्यावर कोणाचे नियंत्रण नव्हते. बाजीराव सत्तेवर आल्यानंतर त्याने मुलूखगिरीस सुरुवात केली. तेव्हा कान्होजीशी त्याचे वैर उत्पन्न झाले.

यावेळी चांदाचे आर्धेराज्य कान्होजीने जिंकले होते. ते राज्य खंडणी घेऊन. चांदेकरास परत करावे असे हुकूम शाहूंनी ता. ११ मे १७२२ रोजी कान्होजीस दिले. परंतु कान्होजीने लक्ष दिले नाही. कान्होजी निजामाकडे संगनमत करतो यामुळे त्यास खडसाविले. परंतु काही काळाने त्याने पुन्हा तोच उद्योग सुरू केल्याने छ. शाहूंनी स्वत: इ.स. १७२९ ला त्याच्यावर स्वारी केली. तेव्हा तो शरण आला. त्यास शाहूंनी बाजीराव बरोबर कर्नाटकात पाठविले.

दरम्यान कान्होजी व रघुजी या चुलत्या-पुतण्यात संघर्ष झाल्याने. छ. शाहूंनी आधी इ.स.१७१३ व नंतर इ.स.१७२६ ला त्यांच्या सरंजामाचे तीन हिस्से कान्होजीस व चौथा हिस्सा रघुजीस विभागून त्यांची गोडी निर्माण केली.

बाजीरावाशी सहकार्य करण्याविषयी छ. शाहूने कान्होजीस समजाविले. परंतु त्याने ऐकले नाही. अखेरीस छ. शाहूंनी रघुजीस त्याजवर पाठवून इ.स. १७३० ला त्यास पकडून साताऱ्याच्या किल्ल्यावर ठेवले. पुढे तेथेच तो मरण पावला.[१४५]

सरदेसाई गो. स. लिहितात, "कान्होजीवर जरी शाहूंची इतराजी झाली तरी, त्याचे माणसावर व साथीदारावर दुसऱ्यांनी सूड घ्यावा हे कधीच संमत नव्हते. जे करणे ते आपण करणे. तो इतराचे अधिकार नाही अशी भावना होती."[१४६] यातून छ. शाहूंचा मृदू स्वभाव व आपल्या अधिकारात कोणाचीही ढवळा ढवळ न खपवून घेण्याचा बाणा दिसतो.

## ३.१५ छत्रपती शाहूंची मिरज स्वारी : इ.स. १७३६-३९:-

छत्रपती शाहू यांनी बादशहाच्या कैदेतून आल्यानंतर पहिल्या दोनचार वर्षानंतर रणभूमीवर स्वत: पाय ठेवला नाही. त्यांनी सर्व मोठमोठी कामे पराक्रमी सेवकांकडून पार पाडली म्हणून लोक त्यांना अवतारी पुरुष म्हणत असत. मात्र महाराज स्वारीस जात नाही याची चर्चा त्यांच्या कानावर येत असे. यात लहान बंडखोरावर स्वत: छत्रपतींनी जाणे शोभण्यासारखे नव्हते. परंतु पेशव्यांच्या पराक्रमाने त्यांचे तेज निष्प्रभ बनत होते. त्यामुळे त्यांनी इ.स. १७३६ ला स्वारीस जाण्याचे ठरविले. यावेळी त्यांनी उदाजी चव्हाणाचा बंदोबस्त व शेजारी मिरजेचे प्राचीन ठाणे मोगलांकडे होते ते काबीज करण्याचे ठरविले. त्यांनी उंब्रजवर छावणी करुन दोन अडीच वर्ष या तळावरुन ते बाहेर संचार करत होते. व इ.स. १७३९ला स्वत: मिरजेवर जाऊन ते स्थळ प्राप्त केले. नंतर साताऱ्यास वापस आले."[१४७]

मिरज वरील मोहिमेचे वर्णन सरदेसाई गो. स. यांनी आपल्या 'मराठी रियासत' भाग-३ या ग्रंथात पृ. ५६५ यावर सविस्तर दिल्याचे दिसून येते. यातून त्यांची ऐश्वर्याची व मानसिक भावना दिसून येते.

या स्वारीतून छ. शाहूंनी आपली धमक, अंगचा प्रभाव व ऐश्वर्य मराठा मंडळास प्रकट करुन विजयाचे लोण दक्षिणेस पोहचविले. पुढे कर्नाटक स्वारीचा उद्भवही या स्वारीतून झाला. तसेच छ. शाहूंनी आंग्रे कुटुंबातील वाद सोडविण्याचा प्रयत्न केल्याचे दिसून येते.

### ३.१५.१ पेशवा बाजीरावाचा मृत्यू : ता. २८ एप्रिल १७४०:-

बाजीरावाने नासरीजंगचा पाडाव केल्यानंतर नर्मदेकाठी काही नवीन परगणे मिळाले होते. त्यांचा ताबा घेण्यासाठी खरगोण परगण्यात गेला. तेथून नर्मदेच्याकाठी रावेरखेडीस येत असताना ता.२८ एप्रिल १७४० रोजी त्याला मृत्यू आला.

छ. शाहूंच्या मार्गदर्शन व छायेखाली पेशवेपदाच्या वीस वर्षाच्या कारकीर्दीत बाजीरावाने मराठ्यास साऱ्या भारतात प्रतिष्ठा मिळवून दिली, हे त्यांचे मोठे योगदान होते.

''पराक्रमाच्या दृष्टीने छ. शिवाजीनंतर बाजीराव निर्माण झाला.''[१४८] असे न्या. रानडे म्हणतात.

### ३.१६ छ. शाहू महाराज व पेशवा नानासाहेब यांच्या नेतृत्वाखाली मराठ्यांचा साम्राज्य विस्तार (इ.स. १७४०-१७४९):-

पे. बाजीरावाचा मृत्यू झाल्याने त्यावेळी त्याचे वडील, मुलगा बाळजी व बंधु चिमाजी अप्पा हे कुलाब्यास मानाजी आंग्रे यांच्या सहाय्यास गेले होते. तेथे त्यास बाजीरावाच्या मृत्यूची खबर मे महिन्याच्या आरंभी कळाली. तेव्हा त्यांनी आंग्रेचे प्रकरण मिटवून कुलाबा सोडून ते ता. २६ मे ला पुण्यास आले.

### ३.१६.१ नानासाहेबास पेशवाई प्राप्त (ता. २५ जून १७४०):-

नानासाहेब यास पेशवाई मिळण्यात अडचणी निर्माण झाल्या त्यात बाबूजी नाईक हा होता.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''नानासाहेबास पेशवाई पद न देता ते बाबूजी नाईक बारामतीकरास द्यावे, अशी खटपट बाजीरावाच्या मृत्यूनंतर रघुजी भोसल्याने केली.''[१४९] यावेळी कर्नाटकात तो होता त्याने ती स्वारी तशीच टाकून पेशवाईच्या खटपटीसाठी साताऱ्यास आला होता. तसेच बाबूजीस पेशवाई देण्यासाठी ताराबाईचेही अंग होते.

परंतु शाहू यास बाबूजी पसंत नव्हता. त्यांनी ता. २५ जूनलाच म्हणजे बाजीरावाच्या मृत्यूनंतर दोन महिन्यांनी बाळाजीस वस्त्रे दिली.[१५०] साताऱ्यास बाळाजीस आणण्यासाठी विश्वासातील इसम शाहूंनी पुण्यास पाठविले व वस्त्रे दिली.

सरदेसाई गो. स. लिहितात, "शाहूला मनुष्याची पारख होती; किंबहुना प्रत्येकाची योग्यता ओळखून त्याजकडून योग्य ती कामगिरी घेऊन राज्याचा परिपोष करणे हेच काम त्याने चोख केले."[१५१] छ. शाहूंनी नवीन पेशव्यास एकंदर ३० गावे मुफासे म्हणून ठिकठिकाणी नेमणं दिली. नेमूण

वस्त्रे देताना शाहूने बाळाजीस आज्ञा केली की, "बाजीरावांनी थोरले बाळाजीपंत यांचे मागे बहुत सेवा निष्ठेने करुन मोठ-मोठी कार्य करुन दाखविली. शेवटी इराणीचे पारिपत्य करुन बादशाही स्थापावी म्हणोन रवाना केले. तेथे आयुष्य थोडे झाले. त्यात त्याचे पुत्र तुम्ही. पातशाही रक्षून हिंदुस्थान सर्व आपले करावे ऐशी अदा करुन पुण्यास जावयास निरोप दिला."[१५२]

यावेळी मराठेशाहीचा व्याप वाढला होता म्हणून छ. शाहू यांनी नानासाहेबांची पेशवा पदी नेमणूक केली होती. यावेळी पुन्हा मराठ्यांस दु:खद घटना घडली. नानासाहेबास पेशवेपद मिळाल्यानंतर केवळ सहाच महिन्यांनी ता. १८ डिसेंबर १७४० रोजी पुण्यास चिमाजी अप्पाचा मृत्यू झाला. यामुळे छ. शाहू यांचा फार मोठा आधार तुटला.

### ३.१६.२ सातारकर व कोल्हापूरकर सत्तांचे एकत्रीकरणाचा प्रयत्न :-

नानासाहेबास पेशवाई मिळाली त्या सुमारास कोल्हापूरचे संभाजी महाराज छ. शाहूच्या भेटीस आले होते. तेव्हा नानासाहेबांनी या गोष्टीचा फायदा घेऊन सत्तेच्या एकीकरणाचे प्रयत्न केले. सरदेसाई गो. स. लिहितात, या भेटीत शाहूच्या पश्चात संभाजीने गादीवर बसावे, असा बारा कलमांचा गुप्त करार संभाजी व नानासाहेब यांच्यात झाला.[१५३]

कारण दोन घराण्यातील गृहकलहाने राज्याचा विनाश होत होता. निष्ठावंतात फितुरी होत होती. अर्थात हा करार शाहू महाराजांच्या अपरोक्ष झाला असला पाहिजे. कारण याची खबर छ. शाहूस मिळली असती तर त्यांनी नानासाहेबांस क्षमा केली असती असे वाटत नाही. कारण संभाजीने आपल्या पश्चात गादीवर बसणे छ. शाहूस पसंत नव्हते.

छ. शाहूच्या मृत्युपूर्वी नऊ वर्ष आधी पेशव्यांनी हा ठराव केला होता. परंतु छ. शाहूच्या मृत्युनंतर तो अंमलात आणणे शक्य झाले नाही.

### ३.१६.३ बाबुजी नायकाचे उच्चाटनः-

पेशव्याच्या विरुद्ध वागणारा एक पक्ष पुण्यात व छ. शाहू महाराजांच्या सान्निध्यात साताऱ्यास होता. पेशव्यांनी अनेकांना संधी देऊन त्यांना योग्यतेस आणल्याने ही मंडळी पेशव्यांच्या तंत्राने चालत होती. मात्र मंत्री, सुमंत, प्रतिनिधी पेशवे विरोधी होती. गायकवाड, दाभाडे, भोसले हे स्वपराक्रमाने पुढे येत असल्याने त्यांची पेशव्याशी आस्था नव्हती. त्यात पेशव्यांचा आप्त बाबूजी नाईक सावकारी पेशाचा मनुष्य. अंगी पराक्रम नाही पण घमेंड मोठी. त्याचे पेशव्याशी न जमल्याने त्याने रघुजीचा आश्रय घेतला. बाजीरावाच्या मृत्यूनंतर पेशवाई मिळविण्यासाठी याने खटापट केली. त्यासही शिंदे-होळकर व रघुजीप्रमाणे मुलूखगिरी करुन मोठा प्रांत हाताखाली घेण्याची हाव होती. परंतु नानासाहेबांनी त्याचे चालू दिले नाही.

पेशव्यांनी त्याचे कर्ज घेतल्याने त्यांनी कर्जवसुलीचे शस्त्र दाखवून पेशव्यांची अडवणूक सुरु केली. अखेर महादजी अंबाजीने पैसे देऊन पेशव्यांची सुटका केली. नाईकाने शाहूचा आश्रय घेतला. संकट समयी नायकाने व त्याच्या वडिलांनी द्रव्यसाह्य दिलेले होते. ते छ. शाहू कधी विसरले नाही. त्यांनी पेशव्यास न जुमानता नायकास बारामती येथे जहागीर देऊन त्याची व्यवस्था लावून दिली. इ.स. १७४३ ते वाडा बांधून राहू लागला.

ता. १९ जून १७४३ ची छ. शाहूंची नायकास दिलेली सनद पुढीलप्रमाणे, ''स्वामीस सर्व प्रकारे तुमचा अभिमान आहे. कर्नाटक प्रांत विजापूर व प्रांत भागानगर अहद तुंगभद्रा दक्षिण तीर रामेश्वर हरदू सूभ्यांचा तालुका तुमचे स्वाधीण करुन दरसाल साठ लाख प्रमाणे पाच साल मुक्रर केला आहे. साल मजकूरा पासून वसूल आवास्त तह तुम्ही मान्य केला आहे. ऐवज पाठवून अंमल करणे. घालमेल होणार नाही येविशी समाधान असो देणे. सेवा करुन स्वामी संतोषी होत ते करणे.''[१५३(अ)]

### ३.१६.४ नानासाहेब आणि निजामः-

नानासाहेब पेशवेपदी आले तेव्हा माळवाप्रदेश मराठ्यांच्या वर्चस्वाखाली होता. भोपाळच्या पराभवाने निजामाच्या कारवायांना आळा बसून दिल्ली दरबारातून त्याचे वजन कमी झाले होते. यावेळी त्याचा मुलगा नासीरजंग बंड करुन उठला होता. त्यामुळे

निजामाने नानासाहेबांकडे मदतीची याचना केली. उत्तरेतील राजकारणांच्या दृष्टीने निजामाबरोबर सलोख्याचे संबंध असणे उचित वाटल्याने त्यांनी पूर्णा नदी काठी एदलाबाद या ठिकाणी निजामाची भेट घेतली व ता. १७ जानेवारी १७४१ ला त्यास मदतीचे वचन दिले.[१५४]

### ३.१६.५ नानासाहेबांच्या उत्तरेकडील मोहिमा : इ. स. १७४१-४८:-

### ३.१६.५.१ नानासाहेबांची उत्तरेकडील पहिली मोहिम : इ. स. १७४१:-

नानासाहेबाने पहिल्या आठ वर्षात उत्तरेत चार स्वाऱ्या केल्या. त्यातील पहिली मोहिम ही इ.स. १७४० पासून ते १७४१ च्या मे महिन्यात धवलपूर येथे सवाई जयसिंगची भेट घेऊन जयसिंहाने १५ लाख रु. खंडणी देवून माळव्याच्या सुभेदारीची सनद देण्याचे वचन दिले व पेशव्यानेही ४,००० फौजेसह बादशहाच्या खिदमतीला राहील. तसेच माळवा प्रांत सोडून दुसऱ्या प्रांतावर हल्ला करणार नाही या अटी मान्य केल्या. त्याप्रमाणे सप्टें. १७४१ मध्ये माळव्याच्या सुभेदारीची सनद नानासाहेबास दिली.[१५५]

माळव्याप्रमाणे गुजरातच्या सनदा आल्या नाही, परंतु पुढे गुजरात मराठ्यांचे प्रत्यक्ष ताब्यात आल्याने त्या सनदेची आवश्यकता उरली नाही. पुढे जयसिंहाच्या मृत्युनंतर राजपूतही अंतर्गत भांडणामुळे मराठ्यांच्या आश्रयास आले जेणेकरुन राजपुतावरही मराठ्यांचे वर्चस्व निर्माण झाले.

### ३.१६.५.२ नानासाहेबाची उत्तरेकडील दुसरी मोहिम : इ.स. १७४१ ते १७४३:-

नानासाहेब पेशव्याची ही स्वारी सर्वात दीर्घ अशी होती. यावेळी पेशव्याला माळवा बुंदेलखंडात पाया मजबूत करायचा होता. जेणे करुन निजामास दिल्लीकडील आश्रय मिळू नये. माळव्यात जम बसल्याने द्रव्यबळ वाढविण्यासाठी सुपीक बंगाल पर्यंत झडप मारण्याची आवश्यकता निर्माण झाली. परंतु या कारणाने त्यांचा व रघुजी भोसले यांचा संघर्ष सुरु झाला.

बाजीराव पेशवा असतानाही त्याचे व रघुजीचे संबंध चांगले नव्हते. पुढे रघुजीने नानासाहेबास पेशवा बनण्यास विरोध केल्याने नानासाहेबांच्या मनात रघुजीबद्दल आढी होतीच.

इ.स. १७४१ च्या पावसाळ्यात पेशवा उत्तर हिंदुस्थानातून व रघुजी कर्नाटकातून चंदासाहेबासह जवळ-जवळ बरोबरच साताऱ्यास आले. रघुजीने छ. शाहूची भेट घेऊन शाबासकी मिळविली.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''राजश्रीने बहुत खुषी मानून सेनासाहेबास बहुमान वस्त्रे देऊन गौरव केला.''[१५६] पुढे संपन्न बंगाल प्रांतावर पेशवा व रघुजीची नजर होती. दोघांनीही मनाशी बेत रचून छ.शाहूची परवानगी मिळवून मुलूखगिरी स्वीकारली. यावेळी बंगाल प्रांतावर अलीवर्दीखानची सुभेदारी होती. ती त्याने जबरदस्तीने मिळविलेली होती. त्यामुळे अंतर्गत भांडणे होतीच.

इ.स. १७३८ मध्ये छ. शाहू यांनी रघुजीस मुलूखगिरीची सनद दिली. 'सूभा, लखनौ, बेदर, मुकसूदाबाद, बुंदेलखंड, अलाहाबाद, पाटणा व डाका अशी त्याच्या क्षेत्राची फोड होती.'[१५७] यावेळी रघुजीच्या पराक्रमाची किर्ती चहुकडे पसरली होती. इकडे बंगाल मध्ये अलीवर्दीचा विरोधक मीर हबीब याने त्याचा पाडाव करण्यासाठी गुप्त कारस्थान आखून रघुजीची मदत घेण्यास दूत पाठविला. रघुजीस ही गोष्ट इष्ट वाटून त्याचे साह्याचे वचन दिले.

''इ.स. १७४१ ला रघुजी याने भास्कर मामा यास पाठविले. भास्करमामा यांनी अलीवर्दीखानास ओरीसा प्रांती पराभव करुन घेरले व मोठी लूट मिळविली. ता. ६ मे १७४२ ला मुर्शीदाबादही ताब्यात घेतले हे सर्व मिर हबीबच्या साहयाने केले. तसेच ओरिसाचे बंदर 'वालेश्वर' मराठयांनी घेतले व हुगळी शहरही ताब्यात घेतले.''

सरदेसाई गो. स. लिहितात, ''हुगळी शहर मराठ्यांनी घेतल्याने मराठ्यांच्या या आक्रमणाची दहशत इंग्रजांना देखील एवढी बसली की त्यांनी कलकत्याच्या बळकटीसाठी आपल्या वखारीच्या सभोवार मोठा किल्ला बांधला व एक मोठा खंदक खोदून त्यास 'मराठा डिच' नाव दिले.''[१५८] अशा प्रकारे भास्करराव यांनी बंगाल प्रांतावर वर्चस्व स्थापण्यास सुरुवात केली. परंतु चोहीकडे अंमल बसविण्याच्या नादात

भास्कररावची फौज पांगल्याचा फायदा घेऊन व दुर्गापूजेच्या उत्सवाचा फायदा घेऊन नवाबाने पंताच्या छावणीवर अकस्मात हल्ला करुन त्यांना पळवून लावले. तरी पंतानी न डगमगता धैर्याने धावपळीचे युद्ध लढवून नवाबांचा जोर थोपविला. त्यानंतर रघुजीही मोठे सैन्य घेऊन बंगाल प्रांतावर गेले.

### ३.१६.५.३ पेशवा-रघुजी भोसले तेढ व संघर्ष : छ. शाहू यांची मध्यस्थी :-

पेशव्याच्या मनातही बंगालकडे जाण्याचा बेत होता. स्वारीनुसार बेत आखण्याचे ठरविले. यावेळी पेशव्यांनी बुंदेलखंडात प्रवेश करुन पावसाळ्याची छावणी औच्छी येथे करुन शिंदे-होळकरास चौथाईच्या वसूलीस पाठविले.

इकडे पेशव्यांनी आपल्या क्षेत्रावर आक्रमण करुन गुढा, मडंळा ही स्थळे काबीज केली आणि पुढे बंगल्याकडेही आपणास शह देणार हे प्रकार पाहून रघुजीचा मनस्ताप वाढून त्याने ता. ४ मे १७४२ ला महाराजांकडे तक्रार केली. यामुळे पेशवा-रघुजीची भांडणे वाढत जाऊन दोघेही आपापल्या परीने निकालाची तयारी करत राहिले.

रघुजीने बंगल्यात जाण्यापूर्वी पेशव्याचा उद्देश समजावा म्हणून ३० सप्टेंबरच्या पत्रांत पेशव्यास विचारले, ''उंदेरीहून कूच करुन आम्ही देवगड प्रांतात चाललो आहोत. पुढे भास्कर मामाकडे जाण्याचा इरादा आहे. आपण काय योजले आहे ते आम्हास कळावे.''[१५९] परंतु यावर पेशव्याच्या उत्तराची माहिती मिळत नाही.

दरम्यान अलीवर्दीखान स्वस्थ बसला नाही. त्याने सैन्य उभारुन बादशहासही मदतीची विनंती केली. यावेळी पेशवा बुंदेलखंडातून माळवा, अलाहबाद इ. प्रांताच्या चौथाईची मागणी बादशहाकडे करीत होता. तेव्हा ते मान्य करुन अलवर्दीखानचे सरंक्षण करण्याचे काम बादशहाने पेशव्यावर सोपविले. अलीवर्दीखानानेही पेशवा-रघुजीच्या वैमन्यस्याविषयी माहिती होती म्हणून त्यानेही सरळ पेशव्यांकडे रघुजीच्या पारिपत्यासाठी मदतीची मागणी केली. नानासाहेबाने ती स्विकारुन पेशवा बंगालकडे निघाला.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''तथापि आपसातील वैर माजविणे अनुचित ही भावना पक्षात असून समोपचाराने प्रकरण मिटविण्याचे प्रयत्न करण्यात आले.[१६०]

इतकेच नव्हे तर गयेपलीकडे चाळीस कोसावर पेशव्यांचे लष्कर असता रघुजी सडे स्वारीने गयेस येऊन पेशव्यास भेटला. चार दिवस राहून प्रश्न निकालात निघत नाही असे पाहून तो परत आपल्या सैन्यात गेला.[१६१]

मार्ग काही न निघता अखेर नानासाहेब व अलिवर्दीखानाची भेट प्लासी नजीक ता. ३१ मार्चला होऊन अलीवर्दीखानाने छ. शाहूंना चौथाई देण्याचे मान्य केले व पेशव्यास २२ लाख रु. खंडणी देण्याचे मान्य केले.[१६२]

भेटीनंतर नवाब व पेशवा उभयंता रघुजीवर चालून गेले. पेशव्यांच्या व रघुजीच्या लहान सहान चकमकी झाल्या. ता. २० जूनच्या पत्रात राणोजी शिंदे लिहितो, ''आमची स्वारी मकसुदाबादेस गेली होती. तेथे रघुजी भोसल्यांची गाठ घालून त्यांचा पराभव करुन माघारे मावळे प्रांती आलो,''[१६३]

शाहू महाराजांच्या चिटणिसी चरित्रात या प्रकरणाचा संक्षिप्त गोषवारा दिलेला बिनचूक दिसतो. ''रघुजी भोसले यांनी कटक, जगन्नाथ घेऊन पुढे हिंदुस्थान आयोध्येपर्यंत स्वारी करितात, खंडण्या घेतात. हे पाहून हिंदुस्थान प्रांत आपणाकडे स्वारीस महाराजांनी नेमून दिलेला आहे. म्हणून त्या प्रांती पेशवे निघून गेले. भोसल्यांचे म्हणणे असे की तुम्हास जेथपर्यंत साधेल ते तुम्ही घ्यावे, आम्हास जेथपर्यंत साधेल ते आम्ही घेऊ ऐसी बोलणी पडली. : उभयंताही त्या प्रांती चालून गेले त्यात कटकटी वाढली. लढाई झाली. ते सामान घेऊन उभयंतास सरोन राहिले. आपसात कलह करणे नीट नव्हे, उभयतांनी महाराजास लिहावे, तेथून आज्ञा होईल त्याप्रमाणे चालावे, ऐसे ठरून पत्र लिहिली त्यावरुन महाराजांनी लिहिले जे तुम्ही आपणातच कलह वाढविला ही गोष्ट चांगली केलेली नाही. उभयतांही हुजूर यावे. उभयतांची बोलणी ऐकून घेऊन प्रांत व हद्द नेमून देऊन त्याप्रमाणे हद्दीतून खंडण्या घेत जाव्यात.''[१६४] यावरुन नानासाहेब छ. शाहू यांनी बोलाविल्यामुळे परत आले. रघुजीला समजून चुकले की आपसात लढण्याने शत्रुचे फावते त्यामुळे रधुजीने पेशव्यांशी नमते घेऊन त्याचे वर्चस्व मान्य केले. पेशव्यासही जास्त विरोध करणे सोयीचे न वाटल्याने त्यांनी नमते घेऊन दोघात समेटाचे बोलणे सुरु झाले. अखेर महाराजांनी बोलावून घेऊन समेट करुन दोघांची कार्यक्षेत्र आखून दिली वऱ्हाडपासून कटकपर्यंतचा सर्व मुलूख व बंगाल बिहार व लखनौ एवढ्या

भागात पेशव्याने ढवळा ढवळ करु नये व अजमेर, आग्रा, प्रयाग व माळवा हे प्रांत पेशव्यांचे म्हणून ठरवून दिले. याप्रमाणे रघुजीने बंगालातील चढाईस पेशव्यांची संमती मिळविली. हा सलोखा ता. ३१ ऑगस्ट १७४३ ला झाला.

चिटणीस सांगतो, ''उभयतांचे सख्य करुन मेजवान्या करविल्या विकल्प ठेवणे असे पायावर हात ठेवून घेतले. उभयतांनी सरकारात मेजवान्या केल्या. ठरावांचे ऐवज दिले. महाराजांनी उभयतांस मेजवानी बहुमान देऊन निरोप दिला.''[१६५]

छत्रपती शाहूंच्या मध्यस्तीने हे प्रकरण मिटले यावरुन छत्रपती शाहूंचे मराठा मंडळावरील वजन किती होते असे दिसून येते व सर्व सरदार त्यास वचकून होते. छत्रपती शाहू बद्दल त्यांच्या मनातील आदर व मान दिसून येतो. तसेच छत्रपती शाहू यांची मराठा मंडळातील सरदारांवर नियंत्रण ठेवण्याची वृत्ती व चोख राज्यकारभार यांचा प्रत्यय येतो.

यावेळी रघुजीनी भास्कर पंताच्या नेतृत्वाखाली पुन: बंगालवर फौज पाठविली हताश अलिवर्दीखानाने कपट करुन ता. ३१ मार्च १७४४ ला तहाचे निमित्त करुन भास्करमामास बोलाविले व ठार मारले.[१६६]

भास्करमामाच्या खुनाचा बदला घेण्यासाठी पूर्ण तयारीनिशी रघुजी त्वेशाने बंगालवर चालून गेला. इ.स. १७४५ ला कटक घेतले व डिसेंबर १७४५ पर्यंत मुर्शिदाबादपर्यंत धडक मारली. अखेर सततच्या युद्धाला कंटाळून अलिवर्दीखानाने रघुजीशी तह इ.स. १७५१ मध्ये करुन ओरिसावरील भोसल्याचे वर्चस्व मान्य केले, त्याशिवाय बंगालची चौथाई म्हणून बारा लाख देण्याचे कबूल केले. एकंदरित संकटांनी हताश न होता रघुजीने धैर्य व चिकाटी दाखविली ती प्रशंसनीय मानली पाहिजे.

### ३.१६.५.४ नानासाहेबांची उत्तरेस तिसरी मोहिम :ता. २० नोव्हेंबर १७४४ ते इ.स. १७४५:-

नानासाहेब पेशव्यास इ.स. १७४४ मध्ये पुन्हा उत्तरेस जावे लागले. कारण बुंदेलखंडातील राज्यकर्त्यांनी चौथाई देण्यास नकार देऊन मराठ्यांविरुद्ध बंड पुकारले. नानासाहेबांनी स्वत: या बंडाचा बिमोड करुन झाशी आणि सागर या ठिकाणी लष्करी तळ स्थापन केला व इ.स. १७४५ मध्ये भोपाळच्या नवाबाकडून 'भेलसा' हे महत्त्वाचे

केंद्र ताब्यात घेतले.[१६७] त्यानंतर इ.स. १७४६ च्या मे महिन्यात बुंदेल्यांचे क्रांती केंद्र जयपूर उध्वस्त करुन परत आले.

### ३.१६.५.५ नानासाहेबांची उत्तरेस चौथी मोहिम किंवा नेवाईची मोहिमः इ.स. १७४८:-

नानासाहेब पेशव्यांनी इ.स. १७४८ मध्ये उत्तरेकडील शेवटची स्वारी केली. या सुमारास अब्दाली याने पंजाबवर आक्रमण केले होते. त्याशिवाय जयपुरचा राजा जयसिंग याच्या मृत्युनंतर त्यांच्या मुलांत गादीसाठी संघर्ष सुरु झाला होता. खरे तर जयसिंह मराठ्यांचा मित्र परंतु नानासाहेबांस राजपुतांची मर्जी संपादन आली नाही.

सवाई जयसिंगाच्या मृत्युनंतर त्याचा मोठा मुलगा परंपरेनुसार जयपुरच्या गादीवर आला परंतु त्यांचा भाऊ उदयपुरकरांच्या साह्याने बंड पुकारुन जयपूरवर हल्ला केला. तेव्हा ईश्वरसिंगाने शिंदे-होळकरांची मदत घेऊन माधवसिंगाचा प्रतिकार केला. दरम्यान माधवसिंगाने होळकराकडे स्वतंत्र बोलणे लावून लाच देऊन आपणाकडे वळविले. जयप्पा मात्र ईश्वरसिंगास पाठिंबा देत राहिला. यामुळे शिंदे-होळकरांतच बेबनाव होऊ लागला. हे प्रकरण निस्तारण्यासाठी नानासाहेब स्वत: राजपुतान्यात आले व जवळपास सहा महिने ते नेवाई भागात छावणी करुन होते म्हणून यास 'नेवाईची स्वारी' असे म्हणतात.[१६८]

नानासाहेबांनी दोघांची भेट घेऊन ठरविले की, जयपूर राज्याचे विभाजन करावे आणि पन्नास लाख रुपये खंडणीची मागणी केली. हो, नाही करत ईश्वरसिंगाने मान्य केले परंतु यामुळे राजपुतांची मने दुखावली गेली. नानासाहेब ता. ९ जुलै १७४८ ला पुण्यास परत आले.

परंतु नानासाहेबांच्या पश्चात राजपूत मराठे यांचे वैर वाढून ते एकमेकांचे शत्रू बनले.

### ३.१६.६ कर्नाटकातील राजकारण:-

बाजीराव पेशवा असताना इ.स. १७३९ मध्ये रघुजी आणि फतेसिंग भोसले यांनी कर्नाटकावर स्वारी करुन वर्चस्व प्रस्थापित केले होते. त्यानंतर अर्काटचा नवाब दोस्त अली आणि जावई चंदासाहेब यांनी कर्नाटकात हस्तक्षेप करण्यास सुरूवात केली.

इ.स. १७४० च्या दलचेरीच्या लढाईत मराठ्यांस विजय मिळून लढाईत अर्काटचा नवाब ठार झाला त्यानंतर त्याचा मुलगा सफदरजंग व चंदासाहेब यांच्या बेबनाव निर्माण झाल्याने सफदरजंगाने मराठ्यांची मदत घेऊन नोव्हेंबर १७४० मध्ये त्रिचंन्नापल्ली जिंकून घेतले व मराठ्यांना एक कोटी रुपये बक्षिस दिले. मुरारराव घोरपडे यास गुत्ती हे ठाणे मिळाले. त्यानंतर इ.स. १७४२ मध्ये सफदरजंगाचा खून करुन मुर्तजाअली अर्काटचा नवाब बनला. निजामाने ही संधी साधून मुरारराव घोरपड्याकडून त्रिचंन्नापल्ली ताब्यात घेतली.[१६९] कारण यावेळी रघुजी व पेशवे उत्तरेकडे गुंतले होते म्हणून घोरपड्यांनी निजामास दुखवले नाही.

छत्रपती शाहू यांनी बाबा नाईक यास कर्नाटकावर पाठविले. परंतु नाईकांच्याने कर्नाटक मोहिम अयशस्वी झाली. तेव्हा छ. शाहू यांनी सदाशिवराव भाऊस कर्नाटक मोहिमेवर पाठविले. सदाशिवरावांनी तुंगभद्रेपर्यंत मजल मारुन अर्काटचे ३६ परगणे वर्चस्वाखाली आणले. त्रिचंन्नापल्ली मात्र मराठ्यांस मिळू शकली नाही.

दक्षिण उत्तरेकडे पेशव्याच्या मोहिमा व राजकारण चालू होते. परंतु यावेळी साताऱ्यात छत्रपती शाहू यांची प्रकृती गंभीर झाल्याने सर्व सरदार व पेशव्यांच्या मोहिमा थंड पडून त्यांचे बबगअंतर्गत लक्ष छत्रपती शाहूकडे लागले. म्हणून दरम्यानच्या काळात एकही महत्त्वाची कामगिरी झाली नाही. अंतर्गत समस्येत छ. शाहू यांचा वारस ठरविणे, दत्तक प्रकरण, राण्यांची भांडणे, सरदारांचा बेबनाव, छ. शाहू यांचा मृत्यू व बाळाजी पेशव्यास सर्व अधिकार अशा अनेक भानगडी व राजकारणे झाली. त्यांची चर्चा पुढीलप्रमाणे-

### ३.१७ छत्रपती शाहू महाराज यांची अखेरची वर्षे : दत्तक प्रकरणः-

इ.स. १७४३ पासून छत्रपती शाहूंची प्रकृती बरीच ढासळली होती. यावेळी त्यांचे वय ६१ वर्षांचे होते. लवकरच त्यांच्या प्रकृतीत फरक पडून ते दरबारास येऊ लागले. परंतु हे दुखणे म्हणजे छत्रपती शाहूंच्या उतारवयाचे पूर्वचिन्ह होते. तसेच छत्रपती शाहूस पुत्र संतान नसल्याने त्यांच्या मनात व मराठा मंडळास भावी स्थिती संबंधाने मोठी चिंता उत्पन्न होऊन त्यांचे लक्ष बाहेरील राजकारणावरून निघून ते अंतर्गत राजकारणावर लागले. यामुळे काही काळ स्वराज्याच्या प्रगतीचा आलेख कमी झाल्याचे दिसून येते.

इ.स. १७४६ हे वर्ष नानासाहेबांनी बहुतेक साताऱ्यासच काढले. कारण त्यांचेही लक्ष अंतर्गत खटपटीकडे होते. त्यावेळच्या स्थितीविषयी त्यांनी ता. २१ ऑक्टो. १७४६ ला रामचंद्र बाबास लिहिलेल्या पत्रावरून समजते की, "...आमचा गुंता दरबारात व्हावयास कारण रा. स्वामिचे सरकार कर्जदार झाले; राज्याचे खर्च अनिवार, नित्य, खतळे यास्तव राजश्रीने आपले कारभाऱ्यास ताकीद करुन बंदोबस्त करतात, घरच्याच कारभारात राजश्री स्वामी दंग आहेत, त्यांनी होऊन आम्हास निरोप दिला ते आपल्या कारभारात निमग्न....निरोपासच किती दिवस लागतील हे नकळे."[१७०] यावरुन नानासाहेब पेशवे हे शाहूंची प्रकृती व अंतर्गत अडचणींमुळे साताऱ्यास अडकून पडले होते. त्यात राण्यांची भांडणे, कर्ज यामुळे छत्रपती शाहू हैराण झाले होते, हे कळून येते.

### ३.१७.१ छत्रपती शाहू महाराजांची उदास वृत्ती:-

अंतर्गत घटनांनी छत्रपती शाहू महाराजांचे मन उदास होऊ लागले. त्यांच्या मनाची उद्विग्नता वाटू लागली. त्यांच्या उदासीनतेत भर पाडणारी घटना म्हणजे ता. २५ नोव्हेंबर १७४६ ला श्रीपतराव प्रतिनिधी साताऱ्यास मरण पावले. त्यांच्यावर छत्रपती शाहूंचा फार जीव होता, आपला जुना व घरोब्याचा सोबती गेल्यामुळे त्यांना दु:ख झाले. आता आपलीही इहलोकाची यात्रा संपली असे त्यांना वाटू लागले. प्रतिनिधीचे पद छत्रपती शाहू यांनी श्रीपतीचा धाकटा भाऊ जगजीवनराम यास दिले व यमाजी शिवदेव यास त्याचा मुतालिक नेमले. हा यमाजी पेशव्यांचा विरोधक होता. तसेच जिवाजी खंडेराव ता. ६ जानेवारी १७४३ ला वारला.[१७१] त्या आधी त्यांची विरूबाई (रक्षा) शरीरपीडा होऊन ता. २४ डिसेंबर १७४० ला वारली होती व तिच्यानंतर महालात इतर राण्यांच्या भांडणामुळे तर त्यांची वृत्ती अधिकच उदास होत गेली. त्यांचा आवडता मदारी म्हणून हत्ती होता तोही विहिरीत पडून मेल्याने महाराज खिन्न झाले.

दोन बायकांच्या कलहात छत्रपती शाहूंची त्रेधा कशी उडत असे त्याचे वर्णन एका पत्रात महादोबा पुरंदरे यांनी पेशव्यास लिहिले आहे ते पुढीलप्रमाणे- "सांप्रत राजश्री स्वामीचे प्रकृती तरी तिसरे प्रहरापासून अंग मोडून येत असे. पोटावर बिब्याच्या फुल्या घातल्या आहेत. ऐसे ही असता, दोन्ही ही वाड्यातील नित्य एक दूसरा कजीया

ठेवलेलाच आहे. कजीया असा जालियास असे घाबरे होतात की, गर्भगळीत देव मरण लवकर देईल तर उत्तम म्हणतात. शरीरास उपाय करावयाची उपेक्षा करतात....''[१७२]

वर ज्या दोन राण्यांचा उल्लेख केला आहे. त्यात थोरली सकवार बाई शिर्के घराण्यातील व धाकटी सगुणाबाई कदम बांडे घराण्यातील होती. सकवारबाईचा प्रभाव छत्रपती शाहू महाराजांच्यावर होता. छत्रपती शाहूंच्या शेवटच्या दिवसांत तर या दोन राण्यांची सत्तास्पर्धा वाढली होती. परंतु ता. २५ ऑगस्ट १७४२ ला सगुणाबाईचे निधन झाल्याने छत्रपती शाहू महाराजांची मन:स्थिती कष्टी होऊन त्यांनी हळूहळू आपले लक्ष महालाच्या कटकटीतून काढून घेतलेले दिसते. ते साताऱ्याबाहेर नदीच्या काठी ''तृणगृह'' बांधून राहू लागले. त्याला वनवासवाडी असे नाव पुढे मिळाले. ''पुन्हा साताऱ्यास रहावयास जावयाचे नाही. श्रीकृष्ण तीरीच वास करावयाचा म्हणून सातारा व माहुली यांचे दरम्यान छप्परबंदी करून राहू लागले. त्यास वनवासवाडी म्हणतात.''[१७३]

### ३.१७.२ छत्रपती शाहू यांनी नानासाहेब यास पेशवेपदावरून काढले:-

छत्रपती दरबाराच्या अशा स्थितीत भावी राज्यव्यवस्थेच्या राज्यसंबंधाने मंडळींची मने चिंताक्रांत होऊन नाना प्रकारच्या खटपटी सुरु झाल्या. छत्रपती शाहूंच्या मनातून पेशव्यांचा पगडा कमी करण्याच्या हेतूने एक पक्ष निर्माण झाला. त्यात रघुजी भोसले, राणी सकवारबाई, प्रतिनिधीचा मुतालिक यमाजी शिवदेव, दाभाडे व गायकवाड कित्येक सरदार पेशव्यांविरुद्ध होते.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''रघुजीच्या शासंक वृत्तीसंबंधाने वर स्वत: नानासाहेबांनीच उल्लेख केला आहे व इ.स. १७४५ च्या ऑगस्टपासून पुढे दोन वर्ष नानासाहेब लांब कुठे न जाता साताऱ्याच्या बाजूसच राहीले.''[१७४] यावरुन नानासाहेबासही आपले पद जाण्याविषयी भीती वाटत होती. छत्रपती शाहू यांनी नानासाहेबाविषयी आरोपांची शहानिशा करून अखेर त्यांनी व्यग्र मन:स्थितीत नानासाहेबांस पेशवेपदावरून दूर केले.

गर्गे स. मा. लिहितात, ''त्यावेळच्या राजकारणात ही घटना खळबळ निर्माण करणारी होती.''[१७५] यावरुन छत्रपती शाहू महाराज वेळ आली तर प्रत्यक्ष पेशव्यास पदावरून काढण्यास मागे पुढे पाहत नव्हते यातून त्यांची खंबीर व न्यायाची वृत्ती दिसून

येते. खरे तर छत्रपती शाहूंच्या नंतर कोणीही गादीवर बसले तरी सत्ता पेशव्यांच्या हातात जाणार होती. सर्व सरदार मंडळ छत्रपती शाहूंची आज्ञा मानण्यास तयार होते, परंतु पेशव्यांची नाही. तसेच राण्यांची भांडणे, बाबूजी नाईकास पेशव्याने दिलेला शह व छत्रपती शाहूंचे कर्ज एकदम वारण्याची पेशव्यांची असमर्थता या तीन गोष्टींमुळे छत्रपती शाहूंचे मन बाळाजीवर रुष्ठ झाले. त्यात प्रतिस्पर्ध्यांनी भर घातली होती ती निराळीच.

मध्यंतरीच्या काळात शाहू महाराजांनीही पंतप्रधानाचा अधिकार इतर कोणी स्वीकारु शकतो की काय याचाही अंदाज घेतला. त्यांनी नागपूरहून रघुजी भोसले यांना साताऱ्यास बोलाविले पण रघुजीने पंतप्रधानपद स्वीकारण्याचे नाकारले. नंतर ते आपले पुत्र मुधोजी सह मे १७४७ ला साताऱ्यास येऊन पोहोचले. पण शाहू महाराजांनी त्यापूर्वीच म्हणजे एप्रिल १७४७ मध्ये पेशवे पद नानासाहेब यांना पुन्हा बहाल केले. कारण इतर कोणीही पद घेण्यास पुढे आले नाही, त्यात कोकणात आंग्रे बंधुच्या कारवाया, निजामाच्या खटपटी, शिंदे होळकरांनी राजपुतान्यात घेतलेल्या नवीन जोखिमा या सर्व गोष्टींमुळे पेशवेपद मोकळे राहणे धोकादायक वाटून छत्रपती शाहूंनी ते नानासाहेबांस दिले.

### ३.१७.३ छत्रपती शाहू महाराजांचा वारस शोधण्याचा प्रयत्नः दत्तक प्रकरणः-

इतर समस्यांबरोबरच छत्रपती शाहूंना संपादिलेल्या राज्याचे संरक्षण कसे होईल याची ही चिंता होती. कारण त्यांना पुत्र संतान नव्हते. त्यात कोल्हापूरकडील संभाजी राजेही वृद्ध असून त्यांनाही पुत्र संतान नव्हते. यामुळे शाहू महाराजांनी दत्तक पुत्र घेण्याचा विचार केला. परंतु दत्तक कोणाला घ्यावे याविषयी महालात व महालाबाहेर बरीच कारस्थाने सुरु झाली.

गर्गे स. मा. लिहितात, ''मोठी राणी सकवारबाई नागपूरकर भोसल्यांना हाताशी धरून कारभार करू इच्छित होती. कोल्हापूरचे संभाजी राजे इ.स. १७४० साली पेशव्यांशी झालेल्या गुप्त करारानुसार साताऱ्याची गादी आपल्याला मिळेल असे धरून चालत होते. पेशव्यांचाही दोन गादया एकत्र करण्याचा विचार चालू होता. नंतर सकवारबाईही संभाजी राजे यांना गादीवर बसविण्याच्या विचारात होती.''[१७६] अशाप्रकारे

साताऱ्याच्या गादीचे भवितव्य ठरविण्यासंबंधी निरनिराळ्या शक्ती आणि व्यक्ती आपआपल्या परीने अंतस्थसूत्रे हलवित होत्या. पण त्या सर्वांवर काहीशा अनपेक्षितपणे मात करून ताराबाईनेच परिस्थितीवर विजय मिळविला आणि आपल्या पसंतीचा वारस शाहू महाराजांना मान्य करावयास लावला.

यावेळी ताराबाई किल्ल्यावर नजर कैदेत होती. त्यांनी सांगून पाठविले की, दुसरे मुल का पाहता! माझे पुत्र शिवाजी राजे यांचा मुल मी गुप्तरुपे ठेविला असून राज्यास धनी करावा.[१७७] यावरुन राज्याला आवरणारा योग्य धनी शोधण्यात छत्रपती शाहूंनी अतोनात कष्ट घेतले तसेच राजपुतांचा एखादा मुलगा वारस करून घेण्याचीही खटपट केली होती परंतु त्यास यश आले नाही.

संभाजी राजांकडे साताऱ्याची सत्ता सोपविणे शक्य असतानाही शाहू महाराजांनी इतर ठिकाणी शोधाशोध का केली? याचे कारण या बखरीत दिले आहे की, शाहू महाराजांचे मत म्हणून दिले आहे की, ''संभाजी राज्यात आवर शक्ती व बुद्धीवैभव नाही याकरिता दत्तक पुत्र घेणे प्राप्त सबब ताराबाईसाहेबांनी मुल गुप्त रुपे ठेविले आहे, त्याचा शोध आणविणे बाहेरचा केल्यास पुढे निभावणीस कलह पडतील.''[१७८]

यावेळीस शहानिशेसाठी चावडेकर भगवंतराव अमात्यास आणिले यशवंतराव पोतनीस व गोविंदराव चिटणीस यास पाठवून भगवंतरावांची खातरजमा करविली. श्रीकृष्णेसनिध त्यास शपथ घालून विचारले मुल खरा अशी खातरजमा झाली त्यावर बोलले आमचे मागे या मुलास धनी करून त्यांच्या आज्ञेत चालून राज्य रक्षावे हे वर्तमान सकवारबाईस समजल्यावर त्यांनी विरोध केला. त्यांनी म्हटले की, ताराबाईचा नातू खोटा आहे त्यांचे हे थोतांड आहे. परंतु महाराजांनी विश्वासू कारकून पानगावास रवाना केले. त्यामुळे सकवारबाई रागावल्या, फौज जमा करण्याच्या विचारात होत्या. महाराजांनी समय कठीण पाहून प्रधान पंतास एकांती बोलावून आपल्या हातची यादी लिहून गोविंदराय विद्यमाने ठराव करून दिली.

इकडे पेशवे सावध होते. त्यांनीही शिंदे होळकरास बोलावून फौजेसह साताऱ्यास गेले. शाहूंनी रामराजास गादीवर बसविण्याविषयी पेशव्यांचे मत घेतले पेशवे अनुकूल होते, परंतु महाराजांनी पेशवे विरोधकांचेही मत जाणून घेण्याचा प्रयत्न गोविंदराव

चिटणीसांमार्फत घेतला. त्यांनीही उघड विरोध केला नाही तरी सकवारबाईंचा विरोध कायम होताच. त्यांनी संभाजी राजांना फौजेसह येण्याचे आमंत्रण दिले. संभाजी राजे साताऱ्यास जाण्यासही निघाले. यावेळी पेशव्यांनीही फौज पाठवून त्यांना वारणेवरच रोखण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे संभाजी राजे माघारी गेले. अखेर कटकटी टाळण्यासाठी छत्रपती शाहू महाराजांनी पेशव्यास दोन यादी लिहून दिल्या. त्या महत्त्वाच्या असल्याने या यादीस इ.स. १७४९ च्या नवरात्रास ता. १ ऑक्टोबरच्या सुमारास लिहिल्याचे अनुमान निघते.

या दोन याद्या म्हणजे मराठेशाहीच्या सूत्र चालकत्वाची छत्रपती शाहूंनी पेशव्यास करून दिलेली सनद होय. वरील उल्लेख केलेल्या दोन यादया मराठ्यांच्या इतिहासात अनेक अर्थांनी वादग्रस्त ठरल्या. रामराजास दत्तक घेण्यास आज्ञा होती. पेशव्यास सर्व राज्यकारभाराची आणि सैन्याची सूत्रे हाती घ्यावीत असा अधिकारही मिळाला. छत्रपती कोणीही विराजमान झाले तरी पेशव्यांच्या धोरणात व कामकाजात हस्तक्षेप करू नये असे सुचविले आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे कोल्हापूरकर राजाला साताऱ्यास आणू नये असे फर्मान पेशव्यास बजावले. या आज्ञा व सूचना म्हणजेच पेशव्यास अमर्याद सत्तेची सनद होत्या.

या फर्मानामुळे छत्रपतीचे सिंहासन नामधारी बनून खरी सत्ता साताऱ्याहून पुण्यास गेली आणि नंतरच्या काळात कोणताही छत्रपती ते सत्तेचे केंद्र पुण्याहून साताऱ्यास आणू शकला नाही. उलट शाहू महाराजांच्या निधनानंतर ताराबाई आणि रामराजे यांची भांडणे छत्रपती पदाची प्रतिष्ठा कमी करणारे ठरले. यानंतर छत्रपती शाहू महाराजांचा मृत्यू ता. १५ डिसेंबर १७४९ रोजी सातारा येथे झाला.

**संदर्भ :-**


१) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ. २५.

२) फाटक न. र. (अनुवादक), मराठी सत्तेचा उत्कर्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य मंडळ, मुंबई, १९६४,पृ.१०२.

३) वाड ग. चि. (संपा.), शाहू महाराज यांची रोजनिशी (मराठी), डेक्कन व्हन्सक्यिुअर ट्रान्सलेशन सोसायटी, पुणे, १९०६, पृ. १९८.

४) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड ३, उपरोक्त, पृ. ३६.

५) पगडी सेतुमाधवराव (भाषांतकार), मराठ्यांचे स्वातंत्र्य युद्ध, जोशी-लोखंडे प्रकाशन, पुणे, १९६२, पृ. ३९५.

६) पुरंदरे कृ. वा.(संपा.), पुरंदरे दप्तर, भाग-१, भा.इ.सं.मं., पुणे, १९२९, ले. २३१, पृ. १६७.

७) पारसनिस द.ब. (संपा.), ऐतिहासिक टिपणे, भाग-१, निर्णयसागर प्रकाशन, मुंबई,१९०८, ले. ५८, पृ. ३६.

८) सरदेसाई गो स., मराठी रियासत, खंड-३, इरोक्त, पृ. ४०. उपरोक्त

९) बेन्द्रे वा. सी. ,श्री. छत्रपती राजाराम महाराज आणि नेतृत्वहीन 'हिंदवी स्वराज्याचा मोगलांशी झगडा', लोक वाङ्मयग्रह, मुंबई, १९७५, पृ. ४३०.

१०) भीमराव कुलकर्णी (संपा.), सभासद बखर, प्रकाशक नंदुरबारकर, मो. द., पुणे, १७८७, पृ. ९.

११) हेरवाडकर र. वि. (संपा.), मल्हार रामराव चिटणीस-विरचित थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९७६, पृ. १०-११.

१२) आप्पासाहेब पवार (संपा.), ताराबाई कालीन कागदपत्रे, खंड-२,३, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर, १९६९, ले. ३,४,९.

१३) हेरवाडकर र. वि. (संपा.), थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, उपरोक्त, पृ. १०.

१४) कित्ता, पृ. ११

१५) पगडी सेतुमाधवराव (भाषांतकार), मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध, उपरोक्त, पृ. ३९८.

१६) पारसनीस द.ब., इतिहास संग्रह, ऐतिहासिक टिपणे, उपरोक्त, पृ. १२.

१७) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. १२.

१८) हेरवाडकर र. वि. (संपा.), थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, उपरोक्त, पृ. १३ व बेन्द्रे वा. सी., छ. राजाराम महाराज, उपरोक्त, पृ. ४३२.

१९) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ४६.

२०) साने का. ना. (संपा.), काव्येतिहास संग्रह, ऐतिहासिक पत्रे, याद्या वगैरे, १९३०, ले. ४१४, पृ. ९८.

२१) कुलकर्णी अ. रा., खरे ग. ह. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड-२, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९८५, पृ. ५.

२२) वाड ग. चि., पारसनिस, द. ब. (संपा.), इतिहास संग्रह पेशवे दप्तरातील सनदापत्रातील माहिती, निर्णय सागर प्रेस, मुंबई, १९१७, पृ. ३३.

२३) साने का. ना. (संपा.), काव्येतिहास संग्रह, ऐतिहासिक पत्रे, याद्या वगैरे, डेक्कन कॉलेज प्रकाशन, पुणे, १९३०, ले. ४९५, पृ. ९९.

२४) भावे वि. ल., मराठी दप्तर रुमाल, खंड-१, मराठी दप्तर संस्था, ठाणे, १९३२, पृ. ११८.

२५) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ५.

२६) राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड-८, श्री. समर्थप्रसाद प्रेस, कोल्हापूर, १९०३, ले. ५४, पृ. ५७.

२७) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ३८.

२८) गर्गे स. मा., करवीर रियासत, श्री. शहाजी छत्रपती म्युझियम ट्रस्ट, कोल्हापूर, २००३, पृ. ९४.

२९) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ७९.

३०) कित्ता, पृ. ७६.

३१) गर्गे स. मा., करवीर रियासत, उपरोक्त, पृ. ९९.

३२) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ७३.

३३) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-७, गव्हर्नमेंट सेन्ट्रल प्रेस, मुंबई, १९३०, पृ. १२.

३४) वाड ग. ची, पारसनिस द.ब. (संपा.), इतिहास संग्रह पेशवे दप्तरातीदल सनदापत्रातील माहिती, निर्णयसागर प्रेस, मंबई, १९१७, ले. १८, पृ. १३.

३५) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ९७,

३६) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-३०, गव्हर्नमेंट सेन्ट्रल प्रेस, मुंबई, १९३०, पृ. २४५.

३७) कुलकर्णी अ. रा., खरे ग. ह. (संपा.) मराठ्यांचा इतिहास, खंड-२, उपरोक्त, पृ. ९.

३८) कित्ता, पृ. १०.

३९) गर्गे स. मा., करवीर रियासत, उपरोक्त, पृ. १३८.

४०) कित्ता, पृ. १३८.

४१) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-७, उपरोक्त, ले.-२१,

४२) देशपांडे प्र. न., अर्वाचीन भारत, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, १९७६, पृ. ४५.

४३) डॉ. सहस्त्रबुद्धे पु. ग., महाराष्ट्र संस्कृती, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, १९७९, पृ. ५१६.

४४) वाड ग. ची, तह व करारमदार, पु. वि. मावजी, मुंबई, १९१७, पृ. १.

४५) गर्गे स.मा., करवीर रियासत, उपरोक्त, पृ. १६४.

४६) कित्ता, पृ. १६५.

४७) पगडी सेतुमाधवराव (भाषांतकार), मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध, उपरोक्त, पृ. ६४.

४८) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. १४९.

४९) कित्ता , पृ. १४५.

५०) कुलकर्णी अ. रा., खरे ग. ह. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड-२, उपरोक्त, पृ. १६.

५१) हेरवाडकर र. वि. (संपा.), थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, उपरोक्त, पृ. ९७.

५२) डॉ. शिवदे स. स., महाराज्ञी येसुबाई, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००४, पृ. १३८.

५३) कित्ता, पृ. १५५.

५४) गर्गे स. मा., करवीर रियासत, उपरोक्त, पृ. १४१.

५५) कुलकर्णी अ. रा., खरे ग. ह. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड-२, उपरोक्त, पृ. २४.

५६) गर्गे स. मा., करवीर रियासत, उपरोक्त, पृ. १३९.

५७) अप्पासाहेब पवार (संपा.), ताराबाई कागदपत्रे, खंड पहिला, शिवाजी विद्यापीठ कोल्हापूर, १९६९, पृ. ४१६, ४२१.

५८) गर्गे स.मा., करवीर रियासत, उपरोक्त, पृ. १४७.

५९) Shivaji University, Tarabai Paper's Shivaji University Press, Kolhapur, 1968, P.169.

६०) देशपांडे पृ. न. आर्वाचीन भारत, कॉन्टिनेंन्टल प्रकाशन, पुणे, १९७६, पृ. १३.

६१) सहस्त्रबुद्धे पु.ग., महाराष्ट्र संस्कृती, उपरोक्त, पृ. ५२४.

६२) Duff Grant, History of Maratha, Vol. 3, Oxford University Press, London, P. 145.

६३) शेजवलकर त्र्यं. श., मराठी निजाम संबंध, पुणे विद्यापीठ, पुणे, १९६३, पृ. २१.

६४) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, पृ. २४२.

६५) देशपांडे प्र. न., आर्वाचीन भारत, उपरोक्त, पृ. ३८.

६६) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, पृ. २५०.

६७) देशपांडे प्र. न., आर्वाचीन भारत, उपरोक्त, पृ. १५

६८) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, पृ. २१३.

६९) राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने, भाग-६, पृ. १६.

७०) वाड ग. चि. (संपा.), शाहू महाराज यांची रोजनिशी, उपरोक्त, पृ. ९.

७१) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-१०, गव्हर्नमेंट सेंट्रल प्रेस, मुंबई, १९३०, ले. २५.

७२) सरदेसाई गो. स. (संपा.), मराठी रिसायत, खंड-३, उपरोक्त, पृ. २५८.

७३) कित्ता, पृ. २५८.

७४) देशपांडे प्र. न., आर्वाचीन भारत, उपरोक्त, पृ. १६.

७५) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, भाग- १७, उपरोक्त, ले. २.

७६) वाड ग. चि. (संपा.), शाहू महाराज यांची रोजनिशी, उपरोक्त, ले. २२.

७७) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, पृ. २६४.

७८) वाड ग. चि., पारसनिस द. ब. (संपा.), इतिहास संग्रह पेशवे दप्तरातील माहिती, उपरोक्त, ले. २०.

७९) देशपांडे प्र. न., आर्वाचीन भारत, उपरोक्त, पृ. १६.

८०) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. २७९.

८१) गर्गे स. मा., करवीर रियासत, उपरोक्त, पृ. १७०.

८२) कित्ता, पृ. १७०.

८३) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-१२, उपरोक्त, ले. १४.

८४) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, पृ. २८१.

८५) Shivaji University, Tarabai Paper's Shivaji University Press, Kolhapur, P.18.

८६) कित्ता, पृ १९.

८७) पगडी सेतुमाधवराव, निजामाची अप्रकाशित पत्रे, भारत टाईम्स, पृ. ९८.

८८) गर्गे स. मा., करवीर रियासत, उपरोक्त, पृ. ७३.

८९) Shivaji University, Tarabai Paper's Shivaji University Press, Kolhapur, L.-137.

९०) वाड ग. चि. (संपा.), शाहू महाराज यांची रोजनिशी, उपरोक्त, पृ. २०२.

९१) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. २८६.

९२) सरदेसाई गो. स. (संपा.), इतिहास संग्रह, पेशवे दप्तर ले. १२४, पृ. १३.

९३) पगडी सेतुमाधवराव, महाराष्ट्र आणि मराठे, जोशी-लोखंडे प्रकाशन, पुणे, १९६३, पृ. १६७.

९४) पगडी सेतुमाधवराव, निजामाची अप्रकाशितपत्रे, उपरोक्त, पृ. १८०.

९५) वाड. ग. चि., पेशवे दप्तरातील सनदापत्रातील माहिती, तुकाराम जावजी, मुंबई, १९१७, पृ. २३-२४.

९६) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. २१२.
९७) कित्ता, पृ. २९५.
९८) पगडी सेतुमाधवराव, मराठे निजाम, मु.म. ग्र.स., मुंबई, १९६१, पृ. ९८.
९९) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. २९८.
१००) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-१५, उपरोक्त, ले. १३.
१०१) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ५०६.
१०२) राजवाडे वि. का., खंड-६, जोशी श. न., पुणे, १९०५, ले. १०७.
१०३) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ५०८.
१०४) देशपांडे प्र. न., अर्वाचीन भारत, उपरोक्त, पृ. २२.
१०५) फाटक न. र. (अनुवादक), मराठी सत्तेचा उत्कर्ष, उपरोक्त, पृ. २०.
१०६) सहस्त्रबुद्धे पू. गो., मराठी संस्कृती, उपरोक्त, पृ. ३३.
१०७) DIGHE V. G., Peshwa Bajirao I and Maratha Expansion Karanatak Pub. House, Bombay, 1944, P. 77.
१०८) सहस्त्रबुद्धे पू. ग., मराठी संस्कृती, उपरोक्त, पृ. ४२०.
१०९) पंडित भवानीशंकर, महाराष्ट्र जीवनातील स्थित्यंतरे, पुणे विद्यापीठ, पुणे, पृ. १४९.
११०) नातू वी. र., माधवराव ऊर्फ महादजी शिंदे यांचे चरित्र व कारकीर्द, बेळगाव समाचार, बेळगाव, १८९४, पृ. ४२.
१११) देशपांडे प्र. न., अर्वाचीन भारत, उपरोक्त, पृ. २४.
११२) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-३८, उपरोक्त, ले. ३६.
११३) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड - ३, उपरोक्त, पृ. ३३२.
११४) कित्ता, पृ. ३३३.
११५) कित्ता, ३३४.
११६) हेरवाडकर र. वि. (संपा.), थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, उपरोक्त, पृ. ८६.
११७) साने का. ना., काव्योतिहास संग्रह, ऐतिहासिक पत्रे, याद्या वगैरे, उपरोक्त, ले.-२४२.
११८) मोडक बा. पृ., कोल्हापूर राज्याचा इतिहास, भाग-१, शिकाजी हरी सामंत, बेळगाव, १८८६, पृ. ५३३.

११९) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ३५५.
१२०) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-११, उपरोक्त, ले. २०
१२१) गर्गे स.मा., करवीर रियासत, उपरोक्त, पृ. १५८.
१२२) मोडक बा. प्र., कोल्हापूर राज्याचा इतिहास, भाग-१, उपरोक्त, पृ. ४३.
१२३) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ३६०.
१२४) गर्गे स. मा., करविर रियासत, उपरोक्त, पृ. १६०.
१२५) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ३६०.
१२६) वाड. ग. चि. (संपा.), शाहू महाराज यांची रोजनिशी, उपरोक्त, ले. १६०.
१२७) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ३८५.
१२८) वाड. ग. चि. (संपा.), शाहू महाराज यांची रोजनिशी, उपरोक्त, ले. २१४.
१२९) देशपांडे प्र. न., अर्वाचीन भारत, उपरोक्त, पृ. २१.
१३०) हेरवाडकर र. वि., थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, उपरोक्त, पृ. ७५.
१३१) राजवाडे वि. का., खंड-३,जोशी श. न., पुणे १९०१, ले. २४४.
१३२) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ४०८.
१३३) साने का. ना. (संपा.), काव्येतिहास संग्रह, ऐतिहासिक पत्रे याद्या वगैरे, उपरोक्त, ले.२२.
१३४) डॉ. सहस्त्रबुद्धे पु. ग., महाराष्ट्र संस्कृती, उपरोक्त, पृ. ५३४.
१३५) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ४१४.
१३६) पारसनीस द. ब., ब्रम्हेंद्रस्वामी धावडशीकर चरित्र व पत्रव्यवहार, मुंबई, १९०० ले. २९.
१३७) कित्ता, पृ. ५४-५६.
१३८) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-३०, उपरोन्त ले. ३२१.
१३९) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ४७८.
१४०) सरदेसाई गो. स., (संपा.), पेशवे दप्तर, खंड-१५, उपरोक्त, पृ. २२-२६.
१४१) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ४९३.
१४२) कित्ता, पृ. ४९७.
१४३) सहस्त्रबुद्धे पु. गो., महाराष्ट्र संस्कृती, उपरोक्त, पृ. ५३६.

१४४) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ५१७.
१४५) सरदेसाई गो. स., (संपा.), पेशवे दप्तर, खंड-२०, उपरोक्त , ले. १०.
१४६) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. ५६१.
१४७) वाड ग. चि. (संपा.), शाहू महाराज यांची रोजनिशी, उपरोक्त, पृ. ७१
१४८) फाटक न. र. (अनुवादक), मराठी सत्तेचा उत्कर्ष, उपरोक्त, पृ. १९.
१४९) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-४, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ. १९.
१५०) नानासाहेब रोजनिशी, पृ. १३६.
१५१) सरदेसाई गो. स. , मराठी रियासत, खंड-४, उपरोक्त, पृ. २४.
१५२) हेरवाडकर र. वि., थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, उपरोक्त, पृ. ११९.
१५३) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-४, उपरोक्त, पृ. १०.
१५३) अ) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-२०, उपरोक्त, ले. ४०.
१५४) देशपांडे प्र. न., अर्वाचीन भारत, उपरोक्त, पृ. ३०.
१५५) खरे ग. ह. (संपा.), ऐतिहासिक फारसी साहित्य, खंड-४, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १७४९, पृ. १८.
१५६) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-४, उपरोक्त, पृ. ८०.
१५७) काळे या. मा. (संपा.), नागपूर भोसले बखर, मध्यप्रांत संशोधन मंडळ, नागपूर, १९३६, पृ. १०.
१५८) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-४, उपरोक्त, पृ. ५८.
१५९) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-२०, उपरोक्त, ले. २६.
१६०) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-४, उपरोक्त, पृ. ६१.
१६१) पुरंदरे क्र. वा. (संपा.), पुरंदरे दप्तर भाग-१, उपरोक्त, पृ. १५२.
162) Sarkar Jadunath, Fall of the Moghal Empire, Vol-I, Calcutta, 1948, P. 105.
१६३) कोटा, कोटा दप्तर, खंड-१, पृ. ८.
१६४) हेरवाडकर र. वि., थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, उपरोक्त, पृ. १२०-१२१.
१६५) कित्ता, पृ. १२१-१२२.

१६६) देशपांडे प्र. न., अर्वाचीन भारत, उपरोक्त, पृ. ३७.

१६७) कुलकर्णी अ. रा., मराठ्यांचा इतिहास, खंड-२, उपरोक्त, पृ. ३५.

१६८) कित्ता, पृ. ९५.

१६९) देशपांडे प्र. न., अर्वाचीन भारत, उपरोक्त, पृ. ३४.

१७०) साने का. ना. (संपा.), काव्येतिहास संग्रह, ऐतिहासिक पत्रे, याद्या वगैरे, उपरोक्त, ले. ५५-६०.

१७१) हेरवाडकर र. वि., थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, उपरोक्त, पृ. ८३.

१७२) गर्गे स. मा., करवीर रियासत, उपरोक्त, पृ. २२३.

१७३) वाड ग चि. (संपा.), शाहू महाराज यांची रोजनिशी, उपरोक्त, ले. ९५-९८.

१७४) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-४, उपरोक्त, पृ. १४७.

१७५) गर्गे स. मा., करवीर रियासत, उपरोक्त, पृ. २२२.

१७६) कित्ता, पृ. २२३.

१७७) पारसनिस द. ब. (संपा.), ऐतिहासिक स्पुट, लेख खंड-४.

१७८) जोशी श्री. ना., अमात्य रामचंद्रपन्त आज्ञापत्र आणि राजनीती, कॉन्टिनेंटल प्रकाशन, १९६०, पृ. १९.

1981

प्रकरण चौथे

# छत्रपती शाहू महाराज त्यांच्या राजकीय व प्रशासकीय कामगिरीचे अध्ययन

प्रकरण चौथे

# छत्रपती शाहू महाराज त्यांच्या राजकीय व प्रशासकीय कामगिरीचे अध्ययन

| | |
|---|---|
| ४.१ | छत्रपती शाहू महाराज यांची प्रशासनव्यवस्था |
| ४.१.१ | छत्रपती शाहू महाराज यांचे अष्टप्रधान मंडळ |
| ४.१.२ | प्रशासनावरील खर्चाची व्यवस्था |
| ४.१.३ | अष्टप्रधान व सरदार यांस नेमून दिलेले सुभे. |
| ४.१.४ | छत्रपती शाहू महाराजांच्या अष्टप्रधानांचे पगार |
| ४.२ | छत्रपती शाहू महाराज यांची कारभाराची पहिली आखणी |
| ४.२.१ | स्वराज्य |
| ४.२.२ | सरदेशमुखी |
| ४.२.३ | चौथाई |
| ४.२.४ | स्वराज्य, सरदेशमुखी आणि चौथाई सनदांची प्राप्ती : इ.स. १७१९ |
| ४.२.५ | उत्पन्नाची वाटणी |
| ४.२.६ | सनदांचे ऐतिहासिक महत्त्व |
| ४.३ | छत्रपती शाहू महाराज यांच्या मार्गदर्शनाखाली बाळाजी विश्वनाथ यांची 'मराठा मंडळ' किंवा 'संयुक्त राज्यव्यवस्थेची निर्मिती' |
| ४.३.१ | संयुक्त राज्यव्यवस्थेतून बाजीराव पेशव्यांचा एकतंत्री राज्य निर्मितीचा प्रयत्न |
| ४.३.२ | सरंजामशाही व्यवस्था |
| ४.४ | छत्रपती शाहू महाराज यांचे महत्त्वाचे तह, करार, सनदा व पत्रे |
| ४.५ | छत्रपती शाहू महाराज एक लोकसंग्रहकर्ते राजा |
| ४.६ | छत्रपती शाहू यांचा कुटुंब विस्तार, दिनचर्या व राहणीमान |
| ४.७ | छत्रपती शाहू महाराज यांचा मृत्यू व अंत्यविधी (इ. स. १७४९) |

**प्रास्ताविकः-**

छ. शाहू महाराजांच्या कारकिर्दीचा आढावा पहिले तीन पेशवे व इतर सरदारांच्या संदर्भाने आपण घेतला आहे. जवळ जवळ ४२ वर्षाच्या आपल्या राजकीय जीवनात त्यांनी आपल्या व्यक्तीमत्त्वाची छाप महाराष्ट्राच्या किंबहुना हिंदुस्थानच्या इतिहासावर कोरली इतकेच नव्हे तर या कालखंडात आपल्या प्रशासकीय व राजकीय धोरणाने मराठी सत्तेचा उत्कर्ष बिंदू गाठला.

छ. शाहूंच्या मुद्रेतील वाक्य त्यांची सामान्य भावना व्यक्त करणारे आहे ते असे-

वर्धिष्णूर्विकमो विष्णोः सामूर्तिरिन वामनी।
शंभुसुनोरसौ मुद्रा शिवराजस्य राजसे।।[१]

आपण लहान मनुष्य परमेश्वरी अंश आहे; असा या वाक्याचा गर्भितार्थ त्यांच्या कारभारात व्यक्त झाला. त्यांच्या कर्तृत्वासंबंधी कितीही मतभेद किंवा गैरसमज असले तरी छ. शाहू मराठ्यांच्या इतिहासातील एक थोर व्यक्ती असून त्यांच्या उदार व निःस्वार्थी धोरणामुळेच मराठी राज्याचा विस्तार त्वरेने झाला यात संशय नाही.

छ. शाहू यांनी तंजावर पासून दिल्ली पावेतो राज्याचा विस्तार केला.[२] यातूनच त्यांचे कर्तृत्व दिसते. त्याच्यासारखा उदार धोरणी, परदुःखाने विव्हळणारा राज्यकर्ता मराठी राज्यास लाभला म्हणूनच राज्याची वृद्धी होऊ शकली असे दिसून येते.

मराठी राज्याचे ध्येय व ते साधण्याचे मार्ग छ. शाहू यांनी आपल्या कारकिर्दीत ठरविले. त्याची छाप अखेर पर्यंत महाराष्ट्रावर बसली. यातच त्याचे मोठेपण दिसून येते. म्हणून या प्रकरणात शाहू यांच्या राजकीय व प्रशासकीय कामगिरीचे अध्ययन केले आहे.

**४.१ छ. शाहू महाराज यांची प्रशासन व्यवस्थाः-**

छ. शाहू महाराज यांनी माळव्यातून निघाल्यापासून आठ महिन्यांनी सातारा राजधानी त्यांनी ताब्यात घेऊन ते मराठी राज्याचे मालक बनले व त्यानंतर चांगला मुहूर्त पाहून माघ शु.१ सोमवार शके १६२९ ता. १२ जाने. १७०८ रोजी त्यांनी आपला राज्याभिषेक समारंभ उरकला.[३] राज्याभिषेकानंतर प्रधानांच्या व इतर नेमणूका त्याने पूर्वी प्रसंगोवात केलेल्या यावेळी कायम केल्या.

### ४.१.१ छ. शाहू महाराज याचे अष्टप्रधान मंडळः-

राज्याभिषेकसमयी छ. शाहू यांनी अष्टप्रधान मंडळाच्या नेमणुका केल्या. त्या बहुतेक पूर्वी कामावर असलेल्या कुटुंबातूनच केल्या. त्या नेणमुका अशा.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | सेनापती - धनाजी जाधव | | १ | मंत्री- नारो राम शेणवई |
| १ | प्रधान - बहिरोपंत पिंगळे | | १ | सुमंत - आनंदराव |
| १ | अमात्य - बाबुराव | | १ | न्यायाधिश - होनाजीपंत |
| १ | सुरनिस - नारो शंकर | | १ | पंडितराव- मुग्दलभट |
| ०४ | | | ०४ | |

एकूण ०८

असे अनेक सरदार यांच्या पदरी होते.

- सचिव पंताकडे - सिंहगड; पुरंदर, पुणे सुभा, कुल, साहोत्रा दिला.
- प्रधानाकडे - लोहगड, राजमाची वगैरे किल्ले.
- अन्याबा मुजमदार यांनी तारिख घालावी
- परशुराम पंताकडे पूर्ववतप्रमाणे प्रतिनिधीपद शाहू महाराजांनी दिले.[४]

राज्याभिषेक समयीच्या नेमणूका केवळ तात्पुरत्या स्वरुपाच्या होत्या. काळानुसार पुढे बाळाजी विश्वनाथास पेशवाई मिळाली त्याचवेळी इतर प्रधानांच्या नेमणुकाही कायम झाल्या. यात प्रतिनिधी व सेनापती या नेमणुकींना विशिष्ट महत्त्व आहे. यात वेळोवेळी बदल होत गेले. अखेरीस परशुरामपंतास ता. १६ डिसेंबर १७१० रोजी प्रतिनिधीपद दिले. सेनापती पदाबाबतीत तोच प्रकार झाला. धनाजी जाधवाच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा चंद्रसेन जाधव यास नेमले. परंतु त्याच्या बंडानंतर त्याचा भाऊ संताजी यास सेनापती नेमले. परंतु त्याच्या अंगी काहीच कर्तृत्व नसल्याने छ. शाहू यांनी मानसिंग मोरे यास त्या जागी नेमले.[५] मानसिंग मोरे याने चार वर्ष काम केले. परंतु विशेष कामगिरी न केल्याने अखेरीस छ. शाहू यांनी ता. ११ जानेवारी १७१७ रोजी खंडेराव दाभाडे याची नेमणूक सेनापती म्हणून केली.[६] खरे म्हटले तर अष्टप्रधानांपेक्षा जास्त महत्त्व दुसऱ्या कित्येक सरदारास होते.

परसोजी भोसले यास 'सेनासाहेब' सुभा हा किताब दिला. अक्कलकोटच्या फत्तेसिंग भोसल्यास शाहू यांच्या सैन्याचा 'सेनापती' केले. कान्होजी आंग्रे यास आरमारी सत्तेचा प्रमुख करुन 'सरखेल' पद दिले. गोविंदराव चिटणिसाला 'लष्करी आमलदार' केले. 'सरलष्करपद' हैबतराव निबांळकरांकडे होते. पुढे ते दूर करुन सोमवंशी यास दिले. 'चिटनिसी' खंडो बल्लाळ प्रभू कडून ती आनंदराव प्रभू यास दिली. 'पारसनिसी' यादवराव बाजी प्रभू यांना दिली तर 'पोतदारी' पुंडकडे होती ती दूर करुन ती कृष्ण जोशी यांना दिली.

याप्रमाणे अष्ट प्रधान व दरकदार व सरकारकून, कारखानदार नेमले व सर्वांना पराक्रम करुन राज्याच्या बंदोबस्ताचे ऊपयोगी नि:सीम सेवा करावी अशी आज्ञा केली व पूर्वीचे जाबते पाहून त्याप्रमाणे नवीन जाबते करुन दिले.

मल्हार रामराव चिटनिस लिहितात की, "--प्रांत किल्ले, जंजिरे, ठाणी व फौज व पागा हुजुरात, मानकरी यांचा जमाव, कारखाने, तोफखाने वगैरे जमाव तर्तूद कारखाने ज्यांचे त्यांस सांगून पूर्ववत करविले."[७]

अशाप्रमाणे तोफखाना दरोगा नागोराव मेघश्याम यास केले तर देवराव मेघश्याम यास राजाज्ञा याजण्याकडील मुतालकी सांगितली. तसेच अष्टप्रधान यांच्याकडे तालुके नेमूण दिले.

मल्हार रामराव चिटनिस लिहितात की, "--देव ब्राह्मण यांचे इनाम, अग्रहार, पूजा, नैवेद्य, नंदादीप पूर्वील दिल्हे ते चालवून जेथे नाही तेथे नविन बंदोबस्त करुन दिल्हे."[८] यावरुन छ. शाहू महाराज राज्यकारभार किती दक्षपणे पाहत होते ते समजून येते.

छ. शाहू महाराज यांनी सरंजामी लोक व सरदार यांचे सरंजाम करार करुन त्याचे तालुके त्यांनी सोडवावे, बंदोबस्त करावा असे नियम करुन दिले.

### ४.१.२ प्रशासनावरील खर्चाची व्यवस्था:-

छ. शाहू यांनी आपल्या अष्टप्रधान व सरदार यांना सरंजाम पद्धतीने काही गावे इनाम म्हणून वाटून दिली. अशा पद्धतीने अष्टप्रधान, सरदार, कारखानदार यांना इनाम दिलेल्या गावांची देखरेख ठेवण्यासाठी, तसेच कारभार चोख पाहण्यासाठी फौजेचा खर्च

किती करावा याचे नियम तयार केले. तसेच फौजेच्या खर्चासाठी जास्त खर्च येत असेल तर हुजूरांची आज्ञा घेऊन मगच तो खर्च करावा असे संकेत तयार केले.

त्याचप्रमाणे प्रधान, प्रतिनिधी, सचिव, सेनापती, भोसले व आंग्रे इ. यांच्याकडून हुजूर खर्चास दरमहा कोणाकडून किती रुपये घ्यावयाचे याचे नियम तयार केले होते. उदा. सचिव यांच्याकडून हत्ती महाल खर्च, प्रतिनिधींकडून कोठी खर्च, प्रधानपंत यांच्याकडून इमारत खर्च वगैरे व राजाज्ञा दत्ताजी शिवदेव यास हुंडी (वराता)ची नेमणूक देवून त्याने ती खजीन्यात जमा करावी असे ठरविले.

### ४.१.३. अष्टप्रधान व सरदार यांस नेमून दिलेले सुभे:-

छ. शाहू महाराज यांनी आपले अष्टप्रधान मंडळ व सरदार यांना सुभ्यांची वाटणी करुन दिली त्यात फत्तेसिंग भोसले यास अक्कलकोटावर परगणा दिला तर सेनापती खंडेराव दाभाडे यांच्याकडे गुजरात, अहमदाबाद, काठेवाड वगैरे सुभा दिला. तसेच भोसले सेनासाहेब याकडे वऱ्हाड, गोंडवण, कटक व हिंदुस्थानापैकी काही महाल सुभा नेमून दिला. प्रतिनिधी यांच्याकडे स्वदेशाचा सुभा तर सचिव यांच्याकडे मावळ, काही कोकणाचे महाल व सहोत्रा हा सुभा दिला. प्रधान यांच्याकडे खानदेश, माळवा बागलाण सुभा देऊन पुढे हिंदुस्थानचा अंमल जितका साधेल तितका घ्यावा. सरलष्कर यास गंगातीर मोगलाईतील स्वराज्य याचे अमल यांचा सूभा दिला. आंग्रे यांस सर्व कोकणचे किल्ले ताब्यात दिले आरमार प्रमुख नेमले.[१] मंत्री व सूमंत यांना मोगलाई तालुक्यातील बाबती सहोत्रा सरदेशमुखीचे अमलाचे तालुके ऊगवाने असे नेमून दिले व सर्वांस हुजूरचे दरखदार देवून हिशोब देवून नेमणुका प्रमाणे खर्च करुन सरकारात ऐवज देण्याच्या नेमणुका करुन दिल्या.

यामुळे मराठे सरदारात एकी नांदून छ. शाहू यांचा दरारा वाढला.

### ४.१.४ छत्रपती शाहू महाराजांच्या अष्टप्रधानांचे पगार:-

| | | |
|---|---|---|
| १ | राजश्री बाळाजी पंडित प्रधान | १३,००० |
| १ | राजश्री पंत अमात्य | १२,००० |
| १ | राजश्री नारो राम मंत्री | १०,००० |
| १ | राजश्री सखो विठ्ठल न्यायधीश | १०,००० |

| | | |
|---|---|---|
| १ | राजश्री आनंदराव डबीर सूमंत | १०,००० |
| १ | राजश्री राधो मुद्गल पंडितराव | (यास गाव सरंजाम आहेत) |
| १ | राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधी | १५,००० |
| १ | राजश्री पंत राजाज्ञा | १०,००० |
| १ | राजश्री खंडेराव दाभाडे सेनापती | ९,००० [१०] |

## ४.२ छत्रपती शाहू महाराज यांची कारभाराची पहिली आखणीः-

इ.स. १७०७ मध्ये छत्रपती शाहूंची सुटका करताना मोगल बादशहा व शाहू यांच्यात एक करार घडून आला होता. या करारानुसार असे ठरले होते की, मोगल साम्राज्याचा जहागिरदार म्हणून शाहूंनी शिवाजीच्या स्वराज्यावर राज्य करावे व चौथ व सरदेशमुखीचे हक्क दक्षिणेतील सहा सुभ्यातून वसूल करावे. परंतु हे करार लेखी स्वरुपात दिले नव्हते.

(छ. शाहू महाराजांचा जम बसल्यानंतर त्यांच्या ताब्यात जितका प्रांत आला तितक्या प्रातांची व्यवस्था करुन नंतर त्यांनी योग्य वेळ येताच इ.स. १७१४ नंतर बाळाजी विश्वनाथास स्वराज्य साधन करण्याकरिता मतलबाची यादी करुन दिली.)

सर्व प्रथम अपण स्वराज्य, सरदेशमुखी आणि चौथाई म्हणजे काय याची चर्चा स्वतंत्रपणे करु.

### ४.२.१ स्वराज्यः-

छ. शिवाजी महाराज यांनी जी स्वराज्याची स्थापना केली. पुढे औरंगजेबाने त्यातून बरेचसे प्रांत ताब्यात घेतले. ते परत मिळविण्यासाठी मराठ्यांनी ताराबाईच्या नेतृत्वाखाली बादशहाशी प्रचंड संघर्ष केला. पुढे छ. शाहू दक्षिणेत आले तेव्हाही स्वराज्यातील काही भाग मोगलांच्या ताब्यात होता. छ. शाहूने बादशहाची ताबेदारी कबूल केली. तेव्हा ते पूर्वीचे स्वराज्य त्यांच्या हवाली करण्याची सनद बादशहाने इ.स. १७१९ मध्ये दिली.[११]

### ४.२.२ सरदेशमुखीः-

सरदेशमुखीचा ऊगम छ. शिवाजीच्यांही पूर्वीचा किंबहुना मुसलमानाच्या पूर्वीचा आहे. महाराष्ट्रात वसाहती होऊन लावणी संचणी सुरु झाली तेव्हा सरकारदस्त

ठरविण्यात आला. तो वसूल करण्याचे सुलभ साधन म्हणून महलो महली देशमुख नेमण्यात आले आणि ठरलेल्या उत्पन्नाचा दहावा हिस्सा आपल्या मेहनतीबद्दल घेऊन बाकीची रक्कम त्यांनी सरकारात भरावी अशी योजना करण्यात आली. अनेक गावांच्या पुष्कळ देशमुखांवर एक मुख्य असा सरदेशमुख नेमण्यात आला. लेखनिकाचे काम करण्यास कुलकर्ण्यांची नेमणूक करण्यात आली. याच दरम्यान छ. शिवाजींचे राज्य निर्माण झाले त्यांनी ठरविले की छत्रपती हाच एकंदर स्वराज्याचा सरदेशमुख तो हे वतन आपल्या मर्जीप्रमाणे पाहिजे त्यास देऊ शकेल.

सरदेसाई गो. स. लिहितात,"ही शिवाजीची योजना पुढे शाहूने स्वीकारली. तो हक्क वसूल करण्यास मोगल अधिकारी हरकत करु लागले, म्हणून शाहूने त्याजबद्दलची सनद बादशहाकडून मिळविली."[१२] भोसल्यांची सरदेशमुखी वतने प्रथम ठिकठिकाणी असून छ. शाहू तर राज्याचा सरदेशमुख स्वत: समजत असत आणि आपल्या तर्फेने ते हाताखालील इतरांच्या नेमणुका करीत. सरकारच्या साऱ्यापैकी शेकडा दहा टक्के देशमुखांनी घेण्याची पूर्वीची वहिवाट होती.

आरंभापासूनच ठिकठिकाणी भोसल्यांची सरदेशमुखीची वतने साधेल त्या रीतीने मिळविण्याचा उद्योग शिवाजीचा होता.[१३]

### ४.२.३ चौथाई:-

राज्याच्या उत्पन्नाचा सर्वात मोठा हिस्सा म्हणजे चौथाई होय. हा प्रकार भिन्न आहे. छ. शिवाजींनी औरंगजेबाशी युद्ध सुरु करुन मोगल प्रदेशावर स्वाऱ्या आरंभविल्या. तेव्हा लोकांनी त्यांच्याकडे विनंती केली की, आम्ही गरीब रयत, आम्हास उपद्रव करु नये. त्यावरुन छ. शिवाजींनी जाहिर केले की, स्वराज्याबाहेरील प्रदेशांनी आमच्या फौजेच्या खर्चासाठी सालोसाल चौथाईची रक्कम म्हणजे एकंदर वसूलाचा चौथा अंश आम्हास द्यावा. आम्ही अशा प्रांतास उपद्रव देणार नाही. उलट दुसरा कोणी चालून आला तर आम्ही तुमचे संरक्षण करु. अशा पद्धतीने छ. शिवाजींनी स्वराज्याबाहेरचा मोगली प्रदेश ताब्यात घेण्याची पद्धत सुरु केली. तिचा फैलाव पुढे मराठ्यांनी औरंगजेबाशी युद्ध करताना केला. चौथाई वसूल करण्याच्या निमित्ताने माळवा, बंगाल या प्रांतात मराठे संचार करु लागले. यास अटकाव करण्यासाठी छ. शाहूच्या काळात बादशहाने इ.स.

१७१९ला दक्षिणेच्या सहा सुभ्यावर चौथाई हक्क वसूल करण्याची कायदेशीर सनद दिली. म्हणजे छ. शाहू यांनी फौज ठेवून त्या सुभ्यांचे संरक्षण करावे. असा या कराराचा अर्थ होतो. 'तैनाती फौजेची' वेलस्लीने सुरु केलेली पद्धत अशाच स्वरुपाची पण जास्त स्पष्ट व व्यापक होती. पुढे हा हक्क सर्व मोगल बादशाहीवर लागू करुन मराठ्यांनी आपली सत्ता देशभर वाढविली.

सरदेसाई गो. स. लिहितात, "--एकंदर वसूलाचा चतूर्थांश त्या राज्यांनी शिवाजीला द्यावा आणि त्या बदल्यात शिवाजीची फौज ठेवून परशत्रूपासून त्यांचे संरक्षण करावे."[१४] असा चौथाईचा अर्थ होता.

अशा पद्धतीने स्वराज्य, सरदेशमुखी व चौथाई म्हणजे काय आपणास दिसून येते. स्वराज्य, चौथाई, सरदेशमुखी या सनदांची प्राप्ती छ. शाहूने कशी केली याची सविस्तर चर्चा आपणाला पुढील प्रमाणे करता येईल.

### ४.२.४ स्वराज्य, सरदेशमुखी आणि चौथाई सनदांची प्राप्ती :

### इ.स.१७१९:-

छ. शाहू महाराज दक्षिणेत आले ते बादशाही मनसबदार म्हणून आणि चौथाई, सरदेशमुखी बरोबरच त्यांनी चौथाईच्या सनदा बादशहाकडूनच घेतल्या होत्या. राज्यभिषेकासमयी त्यांच्या हाती त्या आल्या नव्हत्या. बादशहाच्या तोंडी आश्वासनावर ते राज्य करीत होते. इ.स. १७०९ ला बादशहा दक्षिणेत आला तेव्हा छ. शाहू यांनी सरदेशमुखीच्या सनदासाठी अर्ज केला. परंतु त्यावेळी ताराबाईनींही तसाच अर्ज केल्याने बादशहाने सनदा दिल्या नाही.

डॉ. सहस्त्रबुद्धे पू.गो. लिहितात, "छ. शाहू यास सनदाचा आधार घ्यावा लागला कारण की मराठ्यांच्यात ऐक्य नव्हते. सेनापती सकट मोठमोठे बलवान सरदार मोगलांना जावून मिळत होते. ते जर छ. शाहूंच्या मागे संघटितपणे उभे राहिले असते तर बादशाही सनदेने स्वराज्य चालविण्याचे कारणच पडले नसते."[१५] यावरुन फक्त विरोधकांना दाबण्यासाठी बादशाही पाठींबा छ. शाहू यांना घ्यावा लागला हे दिसते.

पुढे हुसेन अली दक्षिणेचा सुभेदार झाला त्याने बादशहास शह देण्यासाठी मराठ्यांशी मैत्री करण्यास सुरुवात केली व त्याने शंकरजी मल्हार यांच्या मार्फत छ.

शाहूंशी बोलणी सुरु केली. यावेळी छ. शाहू महाराज यांनी मतलबाची एक यादी दिली त्या आधारावरच इ.स. १७१८ मध्ये हुसेन अली व छ. शाहू यांच्यात तह ठरला.[१६] ती यादी पुढीलप्रमाणे -

इ.स. १७१८: यादी मतलब करुन घेणे.

"स्वराज्य थोरले कैलावासी स्वामीचेप्रमाणे रायगड व वरकड गडकोटदेखील करुन घेणे. ठाणी परतोन घेणे."

| | | |
|---|---|---|
| १ | खटाव | चंदी प्रांताचे राज्य गडकोट देखील करुन घेणे |
| १ | आकलूज | मातोश्री व मदनसिंग देखील कदीम दुर्गाबाई जानकीबाई |
| १ | कासेगाव | व सेवक लोक मागोन घेणे |
| १ | सांगोले | पेशजी मतलब लिहून दिले आहेत त्याचे फर्मान सनदा करून घेणे |
| १ | मंगळ वेढे | सांभाळून (सहा सुभे) |
| १ | नासेर | कोकणपट्टी देखील राजपुरी चौथा व सरदेशमुखी स्वराज्य |
| १ | मिरज (बेळगाव) | व वरकड साधेल त्याचे फर्मान पृथककारे (पृथकाकारे) करून घेणे |
| १ | चाकण | सरदेशमुखह इनाम दर महालास एक गाव करून घेणे |
| १ | पेडगाव | जैसिंग पालकर येतील तरी मागोन घेणे. त्रिंबक मागोन बालेगड घेणे |
| १ | जुन्नेर समेत किल्ले | |
| १ | कल्याण भिवंडी समेत किल्ले | |
| १ | मेऊल समेत किल्ले | |
| ३ | | |

| | |
|---|---|
| तालुके दर संस्थानी करून घेतला<br>त्याची चौथाई करून घेणे<br>नबाब बाकी (बलोल) खानाची दौलत | याखेरीज गुजराथ मावल साधेल तेथवर साधणे. |

फत्तेसिंग बाबाचे नावे करून घेणे.

चांदाचे राज्य कान्होजी भोसले याणी
साधले आहे ते स्वराज्यात करून घेणे.[१७]

सरदेसाई गो. स. लिहितात, ''यावेळी समस्त सरदार व सरकारकून शंकरजी मल्हारसुद्धा साताऱ्यास जमा झाले असून तहाच्या वाटाघाटीची एकंदर हकीकत वारंवार खूद्द छ. शाहू यांना कशी कळवत होते व शाहू यांच्याकडूनही त्या संबंधाने जवाब ही कसे जात होते...''[१८] यावरुन या बाबतीत छ. शाहू महाराज किती दक्ष होते हे कळून येते.

पुढे बाळाजी विश्वनाथाने दिल्लीस जावून सय्यद बंधू मार्फत बादशहाकडून चौथाईचा करार ता. ३ मार्च १७१९ रोजी व सरदेशमुखीचा करार ता. १५ मार्च १७१९ रोजी पूर्ण करुन त्या बरोबर स्वराज्याचाही करार केला व असे तीन करार (सनदा) घेतले व तो दिल्लीहून परतला. छ. शाहू यांनी पंधरा हजार फौज मोगल सुभेदार सांगतील तेथे त्यांच्या मदतीस द्यावी आणि दरसाल बादशहास दहा लाख रुपये खंडणी पाठवावी असा करार होता. दक्षिणेच्या सहा सुभ्याचे उत्पन्न त्यावेळी सालाचे अठरा कोटी रुपये ठरलेले होते. या वसूलावर शेकडा १० सरदेशमुखी बद्दल व शेकडा २५ चौथाई बद्दल मिळून दरसालची रक्कम शेकडा ३५ प्रमाणे मराठ्यांस मिळवायची होती.

मराठेशाहीची रचना विस्तार या तीन बाबतीवर अवलंबून आहे. यातील स्वराज्याच्या सनदेत प्रांताचा उल्लेख आहे. त्याची सविस्तर माहिती 'तह व करारमदार' या ग्रंथात पृ. १ ते ९ वर सविस्तर दिली आहे. ती माहिती पुढीलप्रमाणे-

**सनद -१.**

औरंगाबाद सुभ्याचे चौथाईस सनद. निजामउल्मुल्क सुभेदार व फिदजीखान दिवाण पादशाही याचे मोहोरेनिसी-फारसी त्याची नकल हिंदी-

गुमास्ते जहागिरदार व करोडे व जमीनदार सुभे औरंगाबाद यास लिहिले जाते की, सांप्रत सुभे मजकूर येथील चवथे शिवाय सायर व सरपंज वलदे व परगणात हजरत रफिउद्दरजात, यांच्यात फरमानाप्रमाणे व निजामउल्मुल्क सुभेदार याचा तजविजीने कसालत मर्तबात राजे शाहू याजकडे करार जाली. त्याचा तपशिल परवान्याचे पाठीवर लिहिला आहे. या बमोजिम चवथाईचा हिस्सा राजे मशारनिल्हे याजकडील कमाविसदारांस पोहोचवित जाणे. छ. २६ रबिलावल सन दोन जुलुस (५ जून १७०८)

सा सुभे दक्षणची चवथाई निजामन्मुलुख सुभेदार यांच्या तजाविजीने व हम हजरत सफिउद्दरजात याचे फर्मानाप्रमाणे शिवाय सायेर व सरपंज वलदे व परगणात बसलात मर्तबत राजे शाहू याजकडे मुक्रर जाली. सुभे सहा पैकी पाच सुभ्यांच्या सनदा अलाहिदा दिल्या आहेत. छ. २५ रबिलावल (४ जून १७०८) सुभे दक्षणही चवथाई फई दस्तखत जाली त्याचा तपशिल :-

वकील राजे शाहू अर्ज करितो की, सा सुभे दक्षणची चवथाई पंधरा हजार फौज दक्षिणची सुभ्यामागे चाकरिस ठेवावी लागते. त्याचे सरंजामास हजरत रफिउद्दरजात यांच्या कारकीर्दीच्या फर्मानाप्रमाणे आमच्या यजमानाकडे मुक्रर आहे. त्यास हल्ली सनद नवी इनायत करावी... दसखत जाले की सनद देणे...

महिपत आनंदराव वकील राजे शाहू यांसी ताहिद लिहून दिल्हा त्याचा तपशील: "सहा सुभे दक्षिणच्या सरदेशमुखीची खिदारत हजरत रफिउद्दरजात यांच्या कारकीर्दीच्या फर्माना बमोजिम व दिवाणी दप्तरच्या सनदाप्रमाणे आमच्या यजमानाकडे करार जाली. सबब ताहीद लिहून दिला होता की, यजमान खिदपतीच्या लवाजिम्याविशी कायावाचामने सादर राहून रयेतीस आबादी विशेष होय व सरकारची दौलतग्वाही व मुफसदाचे पारपत्य घडे ते करितील व पंधरा हजार फौज सुभेदाराच्या समागमे चाकरीस ठेऊन रयेतीस आपलेकडून राजी राखतील व उजाड गावांची लावणी तीन सालांत करीन ऐसा बंदोबस्त करितील जे दुष्टाचा उपद्रव होणार नाही. कदाचित कोणाचे घरी चोरी जाली किंवा कोणाचा माल चोरीस गेला तरी चोरास शिक्षा व ज्याचा माल त्यास देतील. कदाचित चोरास शिक्षा करोन चोरीचे ठिकाण न लागे तरी चोरीच्या मालाची निशा आपण करितील. शिवाय चवथा व सरदेशमुखी अधिक लोभ धरणार नाहीत. खबर जाहीर जाल्यास ते रुपये ज्यादा चलबी करून घेतील ते सरकार आदलीत दाखल करितील. हा ताहोद लिहिला असे. छ. २४ रबिलावल सन २ जुलुस (३ जून १७०८)."

**सुभा एक सरकार दहा १०**

| | | | |
|---|---|---|---|
| सरकार दौलताबाद | १ | सरकार संगमनेर | १ |
| सरकार पैठण | १ | सरकार बीड | १ |
| सरकार अहमदनगर | १ | सरकार सोलापूर | १ |
| सरकार धारूर | १ | सरकार जुन्नर | १ |

सरकार परांडे १ सरकार जालनापूर १

**सनद - २.**

सहा सुभे दक्षिणेच्या सरदेशमुखीची सनद नबाब अमिरउलउमरा फिरोज जंग बक्षी व दियानतखान दिवाण पातशाही याचे मोहोरेनिशी त्याची हिंदी नकल :

सांप्रत सहा सुभे दक्षिणेच्या सरदेशमुखीची खिदलत बसालत मर्तबत शाहू राजे यांणी सरकारची पेशकष एक करोड सतरा लक्ष एकोणीस हजार तीनशे नव्वद रुपये बारा आणे पैकी खिलत जाली. यावर चवथाई नगद व तीन हिस्से नस्तबंदी ऐसी कबुली केली. त्यास अमिरऊलउमरा फिरोज जंग बक्षी याचे मोहोरेनिशी शाहू राजे याजकडे मुकरर जाली. त्यास राजे यांणी खिदमतीच्या लजिम्यविषयी सर्व काल सादर राहून रयेतेची आबादी जादा होय व सरकारची दौलत ग्वाही व मुफसदाचे पारपत्य घडे ते करावे. कदाचित कोणाचे येथे चोरी जाली तरी चोरास शिक्षा व ज्याचा माल त्यास द्यावा. अगर रुपये नगद द्यावे व हमेशा चांगल्या जमेयतनिशी सरकार चाकरीत हजर असावे व पेशकषीचा ऐवज जाबल्याप्रमाणे किस्तबंदीने खजिन्यात दाखल करीत जावा. दर शेंकडा दहा रुपये रुसूम घेत जावा. याखेरीज अधिक लोभ करू नये. देशमुख देशपांडे व मोकदम व रयत व मुजारी सहा सुभे दक्षिण रुजू राहून सरदेशमुखीचा रुसूम राजे याजकडे देत जावा. छ. १९ रबिलावल सन सात जुलुसी (२ जून १७३३).

**सनद - ३.**

सहा सुभे दक्षिणेच्या सरदेशमुखीची खिदमत शाहू राजे यांणी सरकारची पेशकष एक करोड सतरा लक्ष एकूणिस हजार तीनशे नव्वद रुपये बारा आणि पेकी खिलत व फर्मान इनायत जालियावर बगद चवथाई व बाकी तीन हिस्से किस्तबंदेने द्यावे अशी कबुली केली. सबब अमिरउलउमरा फिरोज जंग बक्षी यांच्या मोहोरेनिशी राजे याजकडे मुकरर जाली. छ. १६ रबिलावल (२६ में १७०८) दप्तरात ताहोद जाला त्याचा तपशील :-

शाहू राजे याचा वकील विनंती करितो की, दक्षिणेचा मुलूख मुफसदाच्या उपद्रवाकरिता बहुत दिवसापासून वैराण व खराब जाला. प्रांत सहा सुभे दक्षिणेच्या सरदेशमुखीची खिदपत दर शेकडा रुसूम दहा रुपये याप्रमाणे माझ्या यजमानाकडे मुक्रर

करावी. पातशाहाच्या प्रतापेकरून दुष्टांचे पारिपत्य व मुलूखाचा आबादी अमलात येईल व मुफसद सरहद्देत राहून रबतु उपसर्ग देतात त्यास काढोन देतील व ऐसा बंदोबस्त करितील की, मुशाफर पांथस्थ सुखे करोन जात येत जातात. कोठे चोरी जाली तरी चोरास शिक्षा व ज्याचा माल त्यास परत पावता करितील. किंवा मालाचे रुपये नगद दकतील व सुभेदारासमागमे जमियतसुद्धा राहून पादशाही सेवा एकनिष्ठपणे करति जातील. त्यास मुलूख अतिशय वैराण व कमहासिल, शंभरास एक बसूल नाही. सबब जावल्याप्रमाणे पेशकश कबुल नसे. एक करोड सतरा लक्ष एकोणीस हजार तीनसे नव्वद रुपये बारा आणे सरदेशमुखीची पेशकश कबुल आहे. पैकी खिलत व फर्मान दनायत जालियावरी चवथाई नगद व तीन हिस्से किस्तबंदीने खजान्यात दाखल करतील. याप्रमाणे शाहू राजे यांचा वकील विनंती करितो व सनद म्हणोन उमेदवार आहे.

जाबत्याप्रमाणे सरकारच्या पेशकषीचा आकार दक्षिण सुभे ६

जमा १८, ०५, १७, २९४ ।-।।। रुपये

**तपशील :-**

१,२३,७६,०४२ ।।-।।। सुभे अवरंगाबाद

१,३५,२३,५०८ ।।-।।। सुभे वरांड

७४,९१,८७९ ।।।-। सुभे बिदर

७,८५,०८,५६० ।।।-। सुभे विजापूर

६,४८,६७,४८३ सुभे हैदराबाद

५०,४९,८१९ ।।। सुभे खान्देश

१८,०५,१७,२९४ ।-।।।

सरदेशमुखी दर शेकडा रुपये १० एकूण १,८०,५१,७३० रुपये

पेशकष सरकार दर हजारी ६५१० एकूण ११,७५,१६,७६२ रुपये

पैकी शाहू राजे याचे वकिलाने कबूल केली १,१७,१९,३९० रुपये

खिलत चवथाई सनद जालियावर चवथाई बाकी किस्तबंदीने द्यावे

नगद २९,२९,८४७ ।।= रुपये ८७,८९,५४३ - रुपये

मुचलका छ १९ रबिलावनी (२६ मे १७०८) दिला त्याचा तपशील :

वकील राजे शाहू याने मुचालका लिहून दिधला ऐसाजे- सहा सुभे दक्षिणेचे सरदेशमुखीची खिदमत अमिरउलउमरा फिरोज जंग बक्षी याचे मोहोरेनिसी आमच्या यजमानाकडे मुकरर जाली असे. सबब सरकारची पेशकष एक करोड सतरा लक्ष एकोणिस हजार तीनशे नव्वद रुपये बारा आणे कबुल केली. पैकी खिलत व फर्मान इनायत जाहल्यावर चवथाई नगद व तीन हिस्से किस्तबंदीने याप्रमाणे यजमानासही कबूल आहे. १,१७,१९,३९०।।। रुपये

खिलत व फर्मान इनायत जालियावरी चवथाई नगद २९,२९,८४८रुपये.

मुचलका छ १५ रबिलावली (२५ मे १७०८) दिल्हा त्याचा तपशील:

यादोराव वकील राजे शाहू याने मुचलका लिहून दिल्हा यैसा की सहा सुभे दक्षिणेचे सरदेशमुीची खिदमत अमिरऊलउमरा फरोज जंग बक्षी याचे मोहोरेनिसी आमचे यजमानाकडेसकरर जाली त्यास यजमानानी रास्ती व वाजविच्या मागे खिदमतीस सादर राहून रयतेची आबादी व सरकारची दौलतग्वाही व मुफसदाचे पारपत्य करित जावे. कदाचित कोठे चोरी जाली तरी चोरास शिक्षा व ज्याचा माल त्यास किंवा मालाचे रुपये नगद देतील व चांगल्या जमेयतीनसी सरकार चाकरीत हजीर राहतील व चाकरी करोन दाखवितील.

दक्षिण सुभे

| | | | |
|---|---|---|---|
| सुभे अवरंगाबाद दरोबस्त | १ | सुभे वराड दरोबस्त | १ |
| सुभे विजापूर दरोबस्त | १ | सुभे बिदर दरोबस्त | १ |
| सुभे हैदराबाद दरोबस्त | १ | सुभे खानदेश दरोबस्त | १ |

**सनद -४:**

कदिम राज्याच्या महालांची सनद, अमिरउलउमरा फिरोज जंग बक्षी याचे मोहोरेनिसि.

त्याची नकल हिंदी:

राजे शाहू यांशी सरकारची पेशकष रुपये दहा लक्षपैकी खिलत व फर्मान इनायत जालियावर चवथाई नगद व तीन हिस्से किस्तबंदीने द्यावी ऐसी कबुली केली. सबब कदीम राज्याचे महाल पेशजीप्रमाणे राजे याजकडे करार जाले. त्याचा तपशील परवान्याचे पाठीवर लिहिला असे. त्यास राजे यांनी एकनिष्ठपणे सादर राहून रयतेची आबादी विशेष

होय आणि सरकारची दोलतग्वाही आणि दुष्टांचे पारिपत्य घडे ते करावे व पातशाही सेवकपणाचे धर्मे कायावाचामने करित जावे. कोणेविशी चुकू नये. सरकारी पेशकष करार बमोजिम खजिन्यात दाखल करावी. देशमुख व देशपांडे व मोकदम व मुजारी व रयत यांनी महाल मजकूरचे राज्य राजे याजकडे आहे जाणावे व राजांच्या आज्ञेखेरीज वर्तो नये. येविशी ताकिद जाणून लिहिलियाप्रमाणे अमलात आणावे. छ. २१ जमादिलाबल सन सात जुलूसी सन सात जुलूसी (४ जून १७१३).

राजे शाहू यांनी सरकारची पेशकष रुपये दहा लक्ष पैकी खिलत व फर्मान इनायत्जालियास चवथाई नगद व तीन हिस्से किस्तबंदीने द्यावे ऐसी एकूल केली. सबब कदीम राजयाचे महाल राजे याजकडे मुकरर केले आहेत.

महाल ३७ सुमारे- तपशील:

बालाघाट महाल सुमारे २४

१ परगणे पुणे तर्फा ६
१ परगणे बारामती तर्फा
१ परगणे इंदापूर तर्फा
१ परगणे मावळ तर्फा १३
१ परगणे वाई तर्फा ४
१ परगणे सातारा तर्फा ६
१ परगणे कराराबाद उर्फ कराड तर्फा ९
१ परगणे खटाव तर्फा ११
१ परगणे माण तर्फा ०४
१ परगणे फलटण
१ परगणे मलकापूर तर्फा ४
१ परगणे पनाळा तर्फा १०
परगणे तारळा तर्फा ५
१ परगणे अदसर (आजरे) तर्फा ११
१ परगणे जुन्नर तर्फा १३
१ परगणे सोलापूर तर्फा ९

तळकोकण महाल सुमारे १३

१ परगणे रामनगर धनदेवी
१ परगणे जवार
१ परगणे भिवंडी तर्फा १२
१ परगणे कल्याण तर्फा २०
१ परगणे चेऊल तर्फा ६
१ परगणे राजापुरी तर्फा १२
१ परगणे दाभोळ तर्फा ११
१ परगणे भीमगड तर्फा ५
१ परगणे जावळी तर्फा १८
१ परगणे जारापूर तर्फा १८
१ परगणे फोंडा तर्फा ५
१ परगणे अकोला तर्फा ५
१ परगणे कुडाळ तर्फा १५

----------

१३

मालगाव वगैरे महिवालगड वगैरे सहा

किल्ल्याचे बेगमीस महाल तपशील:

| | | |
|---|---|---|
| ८ | परगणे मजकूर | १ |
| | परगणे करक | १ |
| | परगणे नवलगुंद | १ |
| | परगणे मलेहाळ | १ |
| | परगणे संपगाव | १ |
| | परगणे लक्ष्मेश्वर | १ |
| | परगणे कोबाड | १ |
| | | २४ |

**सनद -५:**

कदीम राजयातील महाल तपशिलवार दहा लक्ष रुपये सरकार नजरेचे कबूल केले. त्यांतून फर्मान सादर होताच चार हिस्से नजर व बाकीचे किस्तबंदीने खजान्यांत साबिक दस्तुराप्रमाणे दाखल करणे म्हणोन राजा शाहू याजवर कृपा जाहली. महाल तपशील:

घाटावरील महाल

६ परगणे पुणे महाल

१ तर्फ हवेली मजकूर
१ तर्फ निरथडी
१ तर्फ कडेपठार
१ तर्फ सांडस
१ तर्फ पाटस
१ तर्फ सासवड
६

५ परगणे तारळा महाल

१ तर्फ हवेली मजकूर
१ तर्फ असंदोली
१ तर्फ आरळे
१ तर्फ खानापूर
१ तर्फ घोल
५

६ परगणे सुपे व बारामती

१ परगणे इंदापूर
१ तर्फ वाई

९ परगणे पनाळा महाल

१ तर्फ फलमसर
१ तर्फ कोडोली

१ तर्फ हवेली मजकूर
१ तर्फ बिंब
१ तर्फ वाघोली
१ तर्फ कोरेगाव
६

१ तर्फ सातवे
१ तर्फ ठाणे
१ तर्फ बोरगाव
१ तर्फ अष्टे
१ तर्फ आगजे
१ तर्फ रोकडी
१ तर्फ वाळव
९

१२ परगणे मावळ महाल
१ तर्फ कर्यात मावळ
१ तर्फ कानदखारे
१ तर्फ गुंजण मावळ
१ तर्फ नाणे मावळ
१ तर्फ पलुडखोरे
१ तर्फ पौन मावळ
१ तर्फ मुठेखोरे
१ तर्फ मोरोखोरे
१ तर्फ वेलवंडखोरे
१ तर्फ हिरडस मावळ
१ तर्फ रोहिडखोरे
१ तर्फ शिरवळ
१२

११ परगणे आजरे महाल
१ तर्फ हवेली मजकूर
१ तर्फ आजरे
१ तर्फ गणेशगाव
१ तर्फ करटोली
१ तर्फ आंतोली
१ तर्फ महागाव
१ तर्फ अनावर
१ तर्फ काशी
१ तर्फ खानापूर
१ तर्फ केले
१ तर्फ सरी
११

६ परगणे सातारा महाल
१ तर्फ हवेली मजकूर
१ तर्फ परळी
१ तर्फ तारगाव

१४ परगणे जुन्नर महाल
१ तर्फ खेड
१ नारायणगाव
१ तर्फ निघोज

१ तर्फ उमरज

१ तर्फ कुडाळे

१ तर्फ वंदन

६

९ परगणे कराराबाद उर्फ कराड

१ तर्फ हवेली मजकूर

१ तर्फ मारुळ

१ तर्फ तारळा

१ तर्फ कोळा

१ तर्फ नरळी

१ तर्फ कर्यात माळ

१ तर्फ पाटण

१ तर्फ बनबाला

१

९

१ तर्फ इंदूरी

१ तर्फ रायबाग

१ तर्फ तळेगाव

१ तर्फ मेढखोर

१ तर्फ महाळुंगे

१ तर्फ आंगूर

१ तर्फ अवसरी

१ तर्फ घोडे

१ तर्फ बोर

१ तर्फ मनवर

१ तर्फ पाबळ

१४

११ परगणे खटाव महाल

१ तर्फ हवेली मजकूर

१ तर्फ कर्यात मलवंडी

१ तर्फ वांगी

१ तर्फ निमसोड

१ तर्फ कर्यात मायणी

१ तर्फ कर्यात अलगुंड

१ तर्फ कर्यात रिंद

१ तर्फ कर्यात आनंद

१ तर्फ भांबोली

१ तर्फ कर्यात खानापूर

९ परगणे कोल्हापूर महाल

१ तर्फ हवेली मजकूर

१ तर्फ कागल

१ तर्फ रायबाग

१ तर्फ येकबाळ

१ तर्फ सापुगाव

१ तर्फ शिवलिंग

१ तर्फ कर्यात पंज

१ तर्फ कर्यात कल

१ तर्फ जोगी

९

१ तर्फ कसबे कलेढोण

| | | | |
|---|---|---|---|
| | ११ | | १ परगणे फलटण |
| ४ | परगणे माण महाल | | ४ परगणे मलकापूर महाल |
| | १ तर्फ कर्यात वहेगाव | | १ तर्फ हवेली मजकूर |
| | १ तर्फ कर्यात अबलापूर | | १ तर्फ बारुण |
| | १ तर्फ कर्यात मसूर | | १ तर्फ कासेगाव |
| | १ तर्फ कर्यात असदभारी | | १ तर्फ बराल |
| | ४ | | ४ |
| | ५९ | | |

मोठे वगैरे किल्ले पेठ्यांतील महालात पूर्वीपासून राजा शाहू यांजकडे आहेत व राजे मजकूर यांनी चाकरी अख्तियार केली. त्यास किल्ले मजकूरचे किल्लेदारांस वेतन वगैरे नेमणूक नाही. यास्तव रुपये साठ हजार दरसाल दर किल्ल्यास रुपये बारा हजारप्रमाणे फारसीमध्ये लिहिले आहेत. परंतु किल्ले सहा ह्यापेक्षा दर किल्ल्यास दहा हजाराप्रमाणे असावे बारा हजार चुकून लिहिले असावे. त्यांस दहा हजाराप्रमाणे या परगण्यांतून मुकरर करणे किल्ले बितपशील:-

| | | |
|---|---|---|
| ३ किता | | ३ किता |
| १ किल्ले महिमान गड | १ | किल्ले सुवर्णदुर्ग |
| १ किल्ले महिमंत गड | १ | किल्ले कांपळ |
| १ किल्ले भुजंग गड | १ | किल्ले बहादुरबिंडा''[१९] |
| ३ | ३ | |

सरदेसाई गो. स. लिहितात, ''शहाजींचा पूर्णवयात पुणे व सुपे मिळून जी एक लहानशी जागीर होती, ती शिवाजीने इ.स. १६४४ मध्ये स्वतंत्र संस्थानाच्या पदवीस आणिली. विजापूरच्या आदिलशाहीतून स्वतंत्र झालेले हे माळांतील चिमुकले संस्थान वाढत वाढत इ.स. १६६४ मध्ये सह्याद्रीच्या पूर्वेस व पश्चिमेस बागलगणापासून कोंड्यापर्यंत वीस तीस मैलाच्या अंतराने पसरले. ह्या प्रसाराला 'स्वराज्य' ही संज्ञा मिळाली.''[२०]

### ४.२.५ उत्पन्नाची वाटणी:-

सनदा प्राप्त झाल्यानंतर शाहू महाराज यांनी उत्पन्नाच्या वाटणीचे काम बाळाजीवर सोपविले त्यातील मुद्दे पुढीलप्रमाणे-

सरदेशमुखी ही भोसले घराण्याची खासगत वतनी बाब असल्याने वसूलावर दहा टक्के प्रमाणे या बाबतीचे होणारे सर्व उत्पन्न गादीच्या मालकास द्यावयाचे त्यावर दुसरा कोणाचा हक्क नाही.

स्वराज्यातील वसूल व मोगली सुभ्यातील चौथाईचा वसूल मिळून जे एकंदर उत्पन्न येईल तोच एकंदर मराठी राज्याचा वसूल होय. या वसूलापैकी एक चतुर्थांश 'राजबाबती' म्हणून राजाच्या खर्चास द्यावयाचा व वसूलाचे बाकीचे तीन चतुर्थांश म्हणजे शेकडा पंचाहत्तर 'मोकासा' या नावाने इतर खर्चा करता ठेवायचे या मोकसातून 'सहोत्रा' व 'नाडगौडा' असे दोन विभाग राजाने आपल्या मर्जीप्रमाणे वाटले त्यास देण्यासाठी ठेवलेले होते.[२१] 'सहोत्रा' म्हणजे एकंदर वसूलावर शेकडा सहा आणि नाडगौडा म्हणजे त्या वसूलाचे शेकडा तीन आणि याप्रमाणे ज्या तीन बाबी ठरल्या त्यापैकी सहोत्राचा वसूल शाहू यांनी सचिवास दिला आणि तो त्याने स्वत: प्रांतातून वसूल करुन घ्यायचा असे ठरविले. 'नाडगौडा' बाबत छ. शाहू यांनी निरनिराळ्या वेळी मर्जीनुसार पाहिजे त्यास देत असे. या दोन बाबतीचे शेकडा ९ हिस्से व पहिल्या राजबाबतीचे २५ हिस्से मिळून ३४ वजा केले म्हणजे एकंदर वसूलाचे शेकडा ६६ हिस्से प्रमाणे निव्वळ 'मोकासा' शिल्लक राहतो. हा भाग निरनिराळ्या सरदारास जहागिरी दाखल वाटून देण्यात यावा असे ठरले.असा मुलूखगिरीसाठी निरनिराळे प्रदेश सरदारास वाटून देण्यात आले. राजाची मुख्य फौज पेशवे व सेनापती यांच्या हातात असून जेथे जरुर पडेल तेथे ताबडतोब जावून बंदोबस्त करावा अशी त्यांना छ. शाहूंची आज्ञा असे.

उद्योगाची वाटणी केल्यानंतर एकाने दुसऱ्याच्या प्रांतात जाऊ नये अशी सक्त ताकीद दिली होती व प्रत्येकाने सरदारास मुलुखगिरीचा हिशोब सरकारात रुजू करावयाचा असा ठराव होता. सरदारास सरदेशमुखीचे वतन राजास पाठवावे लागे ते वसूल करण्यासाठी नायब किंवा अजहत सरदेशमुख म्हणजे आपल्या तर्फेने काम करणारे छ. शाहू यांनी ठिकठिकाणी नेमूणक दिले होते. परंतु वसूलाच्या व्यवस्थेत एकच निश्‍चित

प्रकार कायमचा झाला नाही. परिस्थिती व व्यक्तीनुसार त्यात बदल होत गेला. त्याबद्दल निश्चित माहिती मिळत नसल्याने ढोबळपणे ती मांडावी लागते. उदा. अनेक सरदारांकडून एक ठराविक रक्कम सरकार-पोत्यास जमा होत असे. फत्तेसिंग भोसले याने कर्नाटकातून सात लाख, रघुजी भोसले याने वऱ्हाडातून दहा लाख रु., आंग्रे याने कोकणातून दोन-तीन लाख रु. असे सालोसाल पाठविण्याचा रिवाज होता.

थोडक्यात, या नविन व्यवस्थेबद्दल चिटणीस लिहितात, ''अष्टप्रधान व सरदार यास जास्तीचे वतने, दरखदार कारखानदारसुद्धा करुन देवून, त्यास सरंजाम लावून, इनाम गाव करुन देवून, बाकी फौजेच्या खर्चास नेमणूक व हुजूर खर्चाकडे नेमणुका केल्या. जास्ती खर्च लागल्यास हुजूरची आज्ञा घेऊन होईल तसे करावे, पत्रव्यवहार हिशोब, खजिन्याचा सांभाळ अशा कामासाठी चिटणीस, फडणीस व पोतणीस हे कामगार प्रत्येक सरदारापाशी व सुभेदारापाशी नेमलेले असत. महाराजापाशी व अष्टमंडळाजवळही हे कामगार असत. त्यास दरखदार अशी संज्ञा होती. चिटणीसाने सर्व पत्र व्यहार करावयाचा, फडणीसाने सर्व देणेघेणेचा हिशोब व झाडा ठेवायचा आणि पोतणीसाने खजिना सांभाळून देवघेव करायची. अशी ही कामाची वाटणी होती. हे दरखदार ठेवण्याची पद्धतही ध्यानात घेण्यासारखी आहे. राजाच्या चिटणीसाने, फडणीसाने व पोतणिसाने पेशव्याजवळचे व अष्टप्रधान जवळचे ते ते दरखदार नेमावे उदा. पेशव्यांकडील चिटणीसाने शिंदे, होळकर वगैरेकडील चिटणीस नेमावे,''[२२] असा त्यावेळचा शिरस्ता होता. म्हणजे राज्यातील एकूण-एक चिटणीस पर्यायाने छत्रपतीजवळच्या चिटणीसाने तयार करुन नेमावयाचे असे असल्यामुळे त्या कसबात निपूण माणसे झाली. परंतु काही काळाने त्यात भाग घेण्यास इतरांसारखी संधी न मिळाल्याने पुढे राज्यकारभारात स्वार्थ दृष्टी वाढून पदे वंशपरंपरागत बनली व अव्यवस्था झाली.

### ४.२.६ सनदांचे ऐतिहासिक महत्त्वः-

मुघल बादशहाकडून छ. शाहू यांच्या नावे ज्या स्वराज्याच्या चौथाई व सरदेशमुखी याच्या सनदा बाळाजी विश्वनाथाने प्राप्त करुन घेतल्या त्यामुळे मराठ्यांच्या इतिहासाला वेगळे वळण लागले.

देशपांडे प्र. न. लिहितात, ''स्वराज्याच्या सनदामुळे छत्रपती शाहू हा शिवाजी महाराजांनी स्थापन केलेल्या व वृद्धिंगत केलेल्या स्वराज्याचा स्वामी झाला. चौथाई व सरदेशमुखीच्या सनदांमुळे दक्षिणेतील सहा मुघली सुभ्यातून चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याचा अधिकार मराठ्यांना मिळाला.''[२३]

या सनदाच्या बाबतीत इतिहासकारात दोन मत प्रवाह आढळतात. काही इतिहासकरांच्या मतानुसार दिल्लीहून आणलेल्या सनदामुळे मराठ्यांचा चांगलाच राजकीय फायदा झाला. मोगल सम्राटाकडून स्वराज्यावरील हक्क छ. शाहूंनी निश्‍चित करुन घेतल्यामुळे दक्षिणेतील इतर सत्ताधिशांच्या दृष्टीने छ. शाहू हे 'सनदशीर राज्यकर्ता' झाले त्यायोगे मराठ्यांचा प्रभाव वाढला व उत्कर्ष झाला.

परंतु काही चिकित्सक इतिहासकार मात्र या सनदाच्या राजकारणावर टीका करतात की, या सनदामुळे मराठ्यांनी आपले स्वातंत्र्य गमावले कारण या सनदामुळे प्राप्त झालेले स्वराज्य साम्राज्यांतर्गत स्वरुपाचे होते अशी टीका करुन छ. शाहू व बाळाजी विश्‍वनाथास दोष देतात. ते म्हणतात, छ. शिवाजी महाराजांनी ज्या ध्येयधोरणांनी स्वराज्याची स्थापना केली ती मातीमोल झाली. छ. शाहू मोगलाच्या अंकीत झाला वगैरे.

सनदांचे मूल्यमापन करताना तत्कालीन राजकीय परिस्थितीचे भान ठेवणे महत्त्वाचे आहे. छ. शाहू यांनी ज्या स्वराज्यावर हक्क सांगितला होता. तो भाग सरदार व कोल्हापूरकरांच्या हाताखाली होता. अंतर्गत व बाह्य विरोधक मोठे होते जवळ ना सैन्य, ना शस्त्र, ना पैसा अशावेळी सत्ता सुरक्षित राहण्यासाठी सनदाचा आधार आवश्यक वाटला व विरोधकांवर याचा हत्यारासारखा उपयोग होईल अशी जाणीव छ. शाहू व बाळाजीची होती व सनदेमुळे येणारे मांडलीकत्व हे कागदी स्वरुपाचे होते. शिवाय चौथाई व सरदेशमुखीच्या माध्यमातून दक्षिणेतील सहा मुगली सुभ्यातील मराठ्यांचे स्वामीत्व बादशहाने एक प्रकारे मान्यच केले होते. यामुळे या सनदांना महत्त्व होते.

सरदेसाई गो. स. लिहितात, ''वरील हक्काच्या बादशाही सनदा मिळाल्याने आपण शिवाजीचे हेतू तडीस नेले असे मराठ्यांस वाटले पण उभयपक्षी हा एक प्रकारे फसवा-फसवीचा प्रकार होता. बादशहाने चौथाई कबूल करणे म्हणजे मराठ्यांच्या संरक्षणाखाली जाणे असा अर्थ होय. उलटपक्षी बादशहास मराठ्यांनी संरक्षण देणे म्हणजे

'आपण सार्वभौम व आम्ही ताबेदार' असा बादशहाचा समज मराठ्यांनी कायम ठेवला.''[२४] इंग्रजांनी ज्याप्रमाणे तैनाती फौजेच्या पद्धतीने हळूहळू सर्व देश आक्रमण करीत आणला तसाच चौथाईच्या सबबीवर मराठ्यांसही देशभर संचार करण्याची संधी सापडली. छ. शाहू यांनी ही जबाबदारी परिस्थितीशी झगडण्याकरिता अंगीकारली आणि मराठा मंडळास नवीन कर्तव्य दाखवून दिले. त्याचे हे धोरण चांगले मुत्सद्देगिरीचे होते.

### ४.३ छत्रपती शाहू महाराज यांच्या मार्गदर्शनाखाली बाळाजी विश्वनाथ यांची 'मराठामंडळ' किंवा 'संयुक्त राज्यव्यवस्थेची निर्मिती':-

छ. शाहू महाराजांनी सत्ता हाती आल्यानंतर राज्याभिषेक करुन घेतला. अष्टप्रधान नेमून राज्याची व्यवस्था लावली. परंतु औरंगजेबाबरोबर मराठ्यांनी पाव शतक जो अभूतपूर्व लढा दिला त्या काळात अष्टप्रधान व्यवस्थेचा बोजवारा उडाला होता. अमात्य, सेनापती, प्रतिनिधी या सारख्या प्रधानांच्या नेतृत्वाखाली मराठा सरदारांनी मोगलाविरुद्ध लढा जरी दिला असला तरी काही कर्तृत्ववान मराठ्यांनी स्वत:च्या हिंमतीवर आणि प्रसंगी धोका पत्करुन स्वतंत्रपणे मोगलांशी सामना केला होता. त्यामुळे अशा मंडळीचा आत्मविश्वास वृद्धिंगत झाला होता. आणिबाणीच्या काळात छ. राजाराम यांनी जहागिरी पद्धतीस प्रोत्साहन देवून मराठे सरदारास लढण्यास प्रवृत्त केले. त्यामुळे त्यांची स्वराज्यावर निष्ठा असली तरी त्यांच्या मनात जहागिरी आणि वतनाचा लोभ निर्माण झाला होता.

देशपांडे प्र. न. लिहितात, ''मुघलांच्या कैदेतून सुटून आल्यानंतर शाहूला ताराबाई बरोबर संघर्ष करावा लागला. या संघर्षाच्या काळात मराठा सरदारांचे महत्त्व वाढले त्यात काही छोटे सरदारही बंडगिरी करु लागले. या संघर्षात अष्टप्रधानाचा ऱ्हास झाला. अमात्य, प्रतिनिधी ताराबाईच्या पक्षात तर सेनापती शाहूच्या पक्षात अशी विलक्षण परिस्थिती निर्माण झाली.''[२५]

छ. शाहू यांनी अष्टप्रधान व्यवस्था पुन्हा सुरु करण्याचा प्रयत्न केला. परंतु ती व्यवस्था बदललेल्या स्थितीत सोयीची नव्हती कारण अशा योजनेला उत्तम व्यवस्थेच्या सर्वंकक्ष सत्तेचे मध्यवर्ती केंद्र आधी असावे लागते आणि ज्या बड्या सरदारांनी स्वातंत्र्ययुद्धात पराक्रम गाजविला त्या सरदारापुढे हे नवे प्रधान निष्प्रभ ठरले उदा.

कान्होजी आंग्रेने छ. शाहूच्या पेशव्यास बहिरोपंतास पराभूत करुन त्यास कैदेत टाकले त्याचवेळी अष्टप्रधानांची अवस्था किती केविलवाणी झाली होती ते सिद्ध झाले. त्यात अष्टप्रधानास विस्तीर्ण प्रदेशावर नियंत्रण ठेवणे अशक्य झाले व याची सत्ता नावापुरतीच राहिली होती. मराठे सरदारांनी वेगवेगळ्या प्रदेशावर वर्चस्व निर्माण केले होते. ही सर्व मंडळी अष्टप्रधानांच्या हुकूमात राहणे शक्य नव्हती. त्यांच्यामध्ये निर्माण झालेली स्वतंत्रवृत्ती त्यांच्या वतनाचा हव्यास आणि मर्दुमकी यासाठी नवे क्षेत्र उपलब्ध करुन देण्याची आवश्यकता होती. ही बदलती स्थिती छ. शाहू व बाळाजींनी ओळखली होती.

लहान लहान उपद्रवाचा बिमोड करुन आपला स्वामी शाहू आणि मोठाले सरदार याचे संबंध अधिक चांगल्यारितीने अस्तित्वात यावे या कामाकडे बाळाजी वळला. सरदार इतके बलाढ्य होती की, लढाई किंवा इतर मार्गांचा उपयोग त्यांच्यावर झाला नसता. म्हणून त्यांच्या स्वभावातील भलेपणावर भर देवून त्यांच्यापुढे कित्येक योजना ठेवण्यात आल्या. एकंदर मराठा मंडळाचे हित व व्यक्तीश: प्रत्येकाचे हित यात भेद नाही, ते एकच आहेत असे त्यांना पटविण्यात आले. ते जर जुटीने राहतील तर ते शक्तीशाली होवून मोठे होतील त्यांनी विभक्त राहिले तर नाश पावतील हे त्यांच्या गळी उतरविले. काही सरदार वगळता बाकी सर्व छ. शाहूंच्या मागे उभे राहिले. बाळाजीला पुढाऱ्याचे ऐक्य साधावयाचे होते. त्या ऐक्यामागे सर्वांचे सारखेच सरंक्षण व्हावे. तसेच सर्वांना आक्रमण करता यावे हा हेतू सिद्धीस नेणारी संघटना उभारावी असे ध्येय होते. त्यासाठी बाळाजीने 'मराठा मंडळाची' रचना करुन नवी 'संयुक्त राज्यव्यवस्था' निर्माण केली.[२६]

संयुक्त राजव्यवस्थेचे स्वरुप विशद करताना रानडे लिहितात, ''मराठ्यांची सत्ता जगवून वाढविण्यासाठी जो उपाय काढला त्याचे अंतर्बाह्य स्वरुप भिन्न होते. शिवाजीच्या परंपरेला छेदून परक्याच्या सत्तेशी एकदिलाने लढेल असा बलिष्ठ पुढाऱ्यांचा संघ निर्माण करणे हे त्या उपायाचे बाह्य स्वरुप होते. ह्या पुढाऱ्यांच्या ताब्यातील प्रदेशात ज्याचा तो कुलमुखत्यार त्यात त्याने हवा तसा कारभार करावा. त्याचे नियंत्रण त्यानेच करावे. मात्र सर्वांची कुलमुखत्यारी समान दर्जाची असावी ही त्या उपायाची दुसरी बाजू होती.''[२७] हे मोठे सरदार केवळ स्वत:च्या पराक्रमाने आपल्या निसर्गसिद्ध प्रदेशाबाहेर, देशाच्या अनेक भागात स्थाईक होऊन बसल्यामुळे त्यांची एकजूट साधण्याचा हाच एक मार्ग

होता. सावनुर, हैद्राबाद, गुजरात, माळवा येथील मोगल सुभेदार, पश्चिम किनाऱ्यावरील सिद्दी, पोर्तुगीज, इंग्रज याप्रमाणे खुद्द मराठ्यांच्या प्रदेशाभोवती परक्यांचा वेढा होता. म्हणून विखूरलेल्या मराठ्यांच्या छावण्या एकत्र आणल्याखेरीज या परक्यांना आवरणे शक्य नव्हते.

रानडे लिहितात की, ''जुन्या परंपरेची प्रेरणा जोवर त्यांच्यात टिकून होती, तोवर हे ऐक्य साधारणपणे सुरक्षित राहिले. बाळाजी विश्वनाथ आणि त्याचे सल्लागार यांनी ही पूर्वोक्त स्थिती मान्य केली. जुन्या अष्ट-प्रधानांची जागा आत मराठा मंडळाने घेतली. पुढील शंभर वर्ष हे मंडळ कार्तमकर्तुन्यया कर्तु समर्थ अशा योग्यतेने देशातील घडामोडींवर नियंत्रण करीत होते.''[२८] ही योजना उत्तम रीतीने यशस्वी झाल्याचे दोन पुरावे आहेत. मराठ्यांची एकजूट ही निकडीची तात्कालीक गरज सदर योजनेत भागविली हा पहिला पुरावा व शंभराहून अधिक वर्षाच्या कालावधीत आणीबाणीच्या प्रसंगातून मराठे निभावले हा दुसरा पुरावा होय. गुजरात, माळवा, बुंदेलखंड, ओरिसा, गोंडवन, नेमाड आणि तुंगभद्रेपर्यंत कर्नाटक असे प्रदेश मराठ्यांनी काबीज केले. राजपुतान्यातील सर्व संस्थाने आणि दिल्ली दरबार कह्यात ठेवले या कामी ही योजना उपयोगात आली हे दिसते. तसेच इंग्रजांशी दोन वेळा व इतर-शत्रुशी लढा देणे सोपे झाले. पानिपतासारखी गंभीर आपत्तीही लिलया पचविली. मराठा मंडळाच्या घटकांची सल्ला-मसलत जोवर त्या संकेताच्या किंवा जुन्या परंपरेच्या धोरणाने चालली तोवर त्याचा वैभवाचा काळ / कनिष्ठ होता. ते धोरण सुटताच घसरगुंडी सुरु झाली.

संयुक्त राज्य व्यवस्थेमुळे मराठ्यांची केंद्रसत्ता दुर्बल झाली अशी टीका काही इतिहासकार करतात हे सत्य नाकारता येणार नाही. सरदेसाई गो. स. लिहितात, ''एकदा जी सरदारास स्वतंत्रतेची लालूच लागली ती मराठेशाहीतून कधीच नाहिशी झाली नाही. नविन जिंकलेल्या मुलखात हे सरदार आपणच केवळ स्वतंत्र संचार करु लागले असे नाही तर ते आपल्या टापूत स्वत:च्या हस्तकास स्वतंत्र इनामे देवू लागले. इनाम देण्याचा अधिकार कोणी वापरायचा याजबद्दल काही निर्बंध नव्हता.''[२९]

मराठामंडळाच्या या बलसंपन्नतेत दुर्बलतेची बिजे होती. याची जाणीव बाळाजी त्याचे सल्लागार व वारस यांना होती. राज्यसंघ ज्या कारणांनी एकत्र झाला होता. ती कारणे न्या रानडे यांनी दिली ती पुढील प्रमाणे-

(१) शिवाजीने घालून दिलेली मराठी राज्याची परंपरा व पुढे शाहू ही व्यक्ती यांच्याविषयी सर्वांच्या मनात असलेला आदर व प्रेम. शाहूच्या काळी बाळाजी विश्वनाथाने आपल्या लहानमोठ्या सरदारांना दिलेली प्रत्येक सनद शाहूतर्फे जात असे. (२) शाहूच्या या महत्त्वपूर्ण स्थानाबरोबरच तो आपल्या सरदारात वाद उत्पन्न झाल्यास ते आपल्या मध्यस्थीने मिटवून, मराठ्यांच्या वाढत्या सत्तेत समतोल राखी. पेशवा-दाभाडे पेशवा- भोसले, शिंदे-होळकर यांच्यात वाद झाल्यास शाहू ते आपल्या अधिकारात मिटवून टाकीत व सत्तेचा तोल कायम ठेवण्याचा प्रयत्न करी. (३) या खेरीज बाळाजी विश्वनाथाने निर्माण केलेल्या व्यवस्थेने दक्षिणच्या सहा सुभ्यांची चौथाई आणि सरदेशमुखी गोळा करताना, ती अष्टप्रधानांपैकी पेशवा, प्रतिनिधी व सचिव या तिघांनी त्यांच्या निरनिराळ्या बाबतीत सर्व प्रदेशांतून गोळा कराव्या, त्या सरकारकडे जमा कराव्या व त्यातील काही हिस्सा स्वत:साठी ठेवावा, अशी योजना केली. हीच योजना तत्त्वत: पुढील काळात नवीन मुलूख ताब्यात येत गेला तशी राहिली. (४) याखेरीज मराठे सरदार कितीही दूरदूरच्या प्रदेशांत चढाईसाठी गेले, तरी प्रत्येकाची वतनवाडी देशावर, पुणे-सातारा आसपासच्या प्रदेशात असे व वतनवाडीचे आपण वतनदार आहो, याचा मराठे सरदारांस अभिमान वाटे व त्यांना देशी वतनावर परतण्याचे मोठे आकर्षण असे. (५) याखेरीज प्रत्येक सरदारास आपल्या जहागिरीचे हिशेब मध्यवर्ती कचेरीच्या फडणीसास सादर करुन, त्याचा फडशा करून घ्यावा लागे. (६) शिवाय मध्यवर्ती कचेरीचे हिशेब तपासनीस व वकील प्रत्येक सरदाराच्या जहागिरीवर असत व त्या कचेरीच्या अनुमतीवाचून त्यांना हलविता येत नसे. अशा सहा प्रकारांनी राज्यसंघातील संभवनीय दोष कमी करण्याचा व ते एकत्र राखण्याचा प्रयत्न करण्यात आला.[३०]

न. चीं. केळकर व खरे शास्त्री लिहितात की, यातून पुढे मराठी राज्यात सरंजामशाही रुढ झाली व दिवसेंदिवस अधिक प्रबळ होत गेली.

### ४.३.१ संयुक्त राज्यव्यवस्थेतून बाजीराव पेशव्यांचा एकतंत्री राज्यनिर्मितीचा प्रयत्नः-

इ.स.१७२० मध्ये बाजीरावाची पंतप्रधानाच्या जागी छ. शाहूंनी नेमणूक केल्यावर, बाजीरावाने उत्तर हिंदुस्थानभर चढाई सुरु केली. जुनी मंडळी साथ देईनात तेव्हा त्याने आपल्या तर्फे नविन सरदार वर्ग निर्माण केला. त्यात शिंदे, होळकर, पवार हा वर्ग पुढे आला. यास त्याने माळव्यात नेमणुका दिल्या. लवकरच चोहीकडे दरारा बसविला.

पुढे त्याने दाभाड्यांच्या कक्षेत असलेल्या गुजरात प्रदेशातील वसुलीच्या वाटणीचा हक्क सांगितला व इ.स. १७२९ मध्ये मोगल सुभेदार सर बुलंदखान याजकडून त्यास बादशहाची मान्यता मिळविली. ता. १७-१०-१७२९ ला.[३१] यावेळी तहाच्या करारात दाभाड्यातर्फे पिलाजी गायकवाडासारखे कोणी त्रास देत असतील तर त्याचा बंदोबस्त करण्याची हमी त्याने मोगलास दिली. वास्तविक दाभाडे व पेशवे दोघेही मराठा मंडळाचे सभासद पण त्यांच्यात अशी फूट पडली. छ. शाहूंनी आपल्या चातुर्याने ही फूट टाळण्याचा प्रयत्न केला. परंतु बाजीरावाचा हा प्रयत्न म्हणजे एकतंत्री राज्य निर्माण करण्याचा दिसून येतो. एकसुत्री धोरण ठेवण्यास हे आवश्यक असले तरी यातून राज्यसंघात फूट पडली. हाच प्रकार पुढे प्रतिनिधी, भोसले बाबत घडला.

दाभाडेशी युद्ध करून व आंग्रेच्या गृहकलहात शिरुन बाजीरावाने एकतंत्री कारभार दृढ करण्याचा प्रयत्न केल्याचे दिसतो व पुढे छत्रपतीने पेशव्यास एकतंत्री कारभाराचा अधिकार दिला. यामुळे पंतप्रधानाकडे राजमंडळाचे सर्वाधिकार आले व पेशव्यास सर्वश्रेष्ठ स्थान प्राप्त झाले.

### ४.३.२ सरंजामशाही व्यवस्थाः-

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर मोगल सत्तेला उतरती कळा लागली. तिचा फायदा उठवून नेमाजी शिंदे, परसोजी भोसले यांसारखे मराठे सरदारांनी नर्मदेच्या उत्तरेला मोगली मुलखात आक्रमण सुरु केले. छत्रपतींना न विचारताच त्यांनी मुगलांचा काही मुलूख जिंकून घेतला. वतनाची चटक लागलेली असल्याने त्यांनी त्या मुलखाच्या सरंजामाची छ. दुसरा शिवाजीकडे (ताराबाई) मागणी केली. युद्ध महाराष्ट्राबाहेर जावे

81

म्हणून ही मागणी मान्य केली. तेव्हा इतर मराठे सरदारांनीही हेच अनुकरण केले. पुढे शाहू-ताराबाई संघर्षात मराठे सरदारांनी दोघांकडून वतने व इनामे मिळविली. अशारितीने मराठे सरदारांना वतनाची चटक लागली. ती छत्रपती शाहूस अथवा पेशवा बाळाजीस थांबविणे शक्य नव्हते.

कंटक म. रा. लिहितात की, ''मराठ्यांनी स्वराज्याच्या प्रदेशात धुडघूस घालू नये म्हणून बाळाजी विश्वनाथाने व छ. शाहू यांनी प्रथम दिल्लीच्या बादशहाकडून चौथाई, सरदेशमुखी व स्वराज्याच्या सनदा मिळवून नंतर चौथाई-सरदेशमुखीच्या उत्पन्नाची वसुली करण्याच्या निमित्ताने मराठे सरदारांना मुगली मुलखात मुलखगिरी करण्यास राजरोस परवानगी दिली.''[३२] म्हणजे बादशाही सनदानंतर मराठ्यांना जो नवा उद्योग मिळाला त्यातून आता सरंजामदारी निर्माण झाली.

सहस्त्रबुद्धे लिहितात की, ''सरदारांना स्वतंत्र फौज ठेवावयास सांगून तिच्या खर्चासाठी स्वतंत्र मुलूख किंवा प्रदेश त्यांच्याकडे लावून दिले की ती सरंजामदारी होते.''[३३] आदिलशाहीतील बहुतेक सरदार सरंजामदार होते. छ. शिवाजीच्या काळी लष्कर हे छत्रपतीचे होते. राजारामाच्या काळी वतनदारीने जोर धरला व तिला सरंजामदारीचे रुप येवू लागले. तीच व्यवस्था छ. शाहूंनी पुढे चालविली. कारण पैसा, फौज त्यांच्याजवळ नव्हती.

एकंदर राज्यकारभाराची पद्धत निश्चित करण्याची वेळ आली तेव्हा छत्रपती शाहू व बाळाजी विश्वनाथ यांना सरंजामदारी व्यवस्था मान्य करुनच पुढे पाऊल टाकावे लागले.

सरदेसाई गो. स. लिहितात की, ''शाहू किंवा बाळाजी विश्वनाथ यांनी फक्त सरंजामदारांचा उपयोग करुन घेतला, त्यांनी ती पद्धत निर्माण केली नाही.''[३४] त्यामुळे त्यांना दोष देता येत नाही. परिस्थितीच्या रेट्यापुढे त्याना ही पद्धत स्वीकारावी लागली. वतनदारी व सरंजामदारी भिन्न होत. राज्यास अपाय झाला तो सरंजामीने वतनदारीने नव्हे.

### ४.४. छत्रपती शाहू महाराज यांचे महत्त्वाचे तह, करार, सनदा व पत्रे:-

छ. शाहू महाराज यांचा व्याप पाहिला म्हणजे आपणास कळते की नशीबाचा खेळ त्यांच्या इतका जीवनात कोणी पाहिला नसेल. हे आपण त्यांच्या अभ्यासावरुन म्हणू शकतो. तरीही ते संकटाच्यावेळी कधीही डगमगले नाही. धैर्य धरुन त्यांनी भावी उन्नतीचा मार्ग स्वत:च्या बुद्धीप्रभावाने निर्माण केला. पुढील भाग्य काळात उन्माद व उपभोग टाकून अर्धशतक पावेतो स्वराष्ट्रधुरा त्यांनी सांभाळली व मराठी राज्य वाढविले. आपल्या दीर्घ कारकिर्दीत त्यांनी स्वकीय आणि परकीयांचा परामर्ष घेतला.

सदैव कारभारात निमग्न, स्वहस्ताने असंख्यपत्रे लिहिणारे, राज्याचा वाढता व्याप सांभाळणारे, लोकांच्या सुखात-दु:खात सहभागी, समरस होणारे असे छत्रपती शाहू होते. त्यांच्या प्रचंड व्यापाची कल्पना तत्कालीन कागदात स्पष्ट उमटलेली दिसते. तंटे, भांडणे, मारामाऱ्या, चोऱ्या, दरोडे, खून, अपघात इ. प्रकार त्यांना उलगडावे लागतच होते. याशिवाय शिकार, खेळ, बिदाग्या, मेजवान्या, दरबार, सरदारांचे रुसवे, समजुती व पाठवण्या, विवाहादी समारंभ, सत्कार, परराज्यातील वकील व पाहुण्यांच्या भेटी व जवाब याव्यतिरिक्त सरदारांना सैन्य, पैसा पुरवणे अंतर्गत द्वेष मिटविणे, कर्ज काढणे व ते फेडणे अशी अनेक कामे करावी लागत. यातूनच त्यांचे राजकीय, प्रशासकीय मुत्सद्देगिरी, दूरदृष्टी, जानता राजा, स्वभाव विशेष, धैर्यशाली, कणखरपणा इ.गुण प्रकट होतात. त्यामुळे त्याचे महत्त्वाचे तह, करार, सनदा व पत्रे पुढील प्रमाणे दिली आहेत.

#### ❖ छत्रपती शाहू महाराज व सरखेल कान्होजी आंग्रे यांच्यातील तह : इ.स. १७१३:-

छ. शाहू महाराज व सरखेल कान्होजी आंग्रे यांच्यामधील इ.स. १७१३ ला झालेला तह महत्त्वाचा आहे. कारण छ. शाहू यांच्या राजकीय धोरणास येथूनच खरी सुरुवात झाली. छ. शाहू व राणी ताराबाई यांचा संघर्ष चालू होता. त्यावेळी काही सरदार ताराबाईच्या पक्षात होते. त्यात प्रबळ असा सरदार कान्होजी ताराबाईकडे होता. त्यास आपल्या बाजूस करुन घ्यावे असे कारस्थान छ. शाहू यांनी बाळाजीमार्फत रचले व ते अखेर यशस्वी होऊन कान्होजी छ. शाहूस येवून मिळाला. या ठिकाणी छ. शाहूंनी किंवा

बाळाजीने एखाद्या लढाईत कान्होजीचा पराभव केला नव्हता. त्यावेळच्या तहाच्या अटी कान्होजी छ. शाहू यांना करावयास सांगतो तो तह पुढीलप्रमाणे-

### ❖ छत्रपती शाहू महाराज व सरखेल तहः-

तहनामा राजश्री सरखेल, सुरुसन आर्बा अशर मया व अलफ.

थोरातांशीं अवक्रिया करुं नये. भाकर दिल्ही आहे, ती त्यांनी खावी. सनदी पत्रांखेरीज कोठें त्यांनी उपसर्ग न करावा.

वरघाटचे किल्ले मोंगलाईतून राजकारणामुळें अगर सक्तींने घेतले, तरी तुमच्या स्वाधीन करावें. तळघाटचे किल्लेयास तुम्हीं राजकारण करुन घेतले. तर ते आमच्या स्वाधीन करावें. त्रिंबक आम्हांकडे, पट्टा तुम्हांकडे घ्यावा.

नाणे मावळ, पौन मावळ, पौड खोरें येथें दरखंडीस दोन रुपये प्रमाणें आम्हांस द्यावे. कारबरसे येथील देशमुखी लखमोजी बळवी याची चालवावी.

हरीहरपुरी गोसावी यांसी इनाम मौजे कादव तर्फ पौन मावळ इनाम आहे, तें चालवावें.

कोथलाचा ऐवज दोन खंडी सोनीया (फाटलें आहे). कच्चा ऐवज जो असेल तो तुम्हीं द्यावा.

राजश्री शाहूराजे छत्रपति यांच्या पायांशी यापूर्वीही अंतर न जालें. यापुढेंही अंतर करणार नाहीं.

नाणे मावळ व जुन्नर पैकीं गांव चालवावे.

५ राजमाचीकडे नाणे मावळपैकीं:-

१ बोलवडें.

१ उंबरें.

१ आवशें.

१ वरंपें.

३।। इनाम जुन्नरपैकी:-

२ सखोजी शिंदे.

१ सावलें तर्फ अंदर.

१ इंगळूण तर्फ मिन्हेर

२

१ एसाजी काटदकर राहणार मौजे निरगुड तर्फ मिन्हेर.

.।।. यिसाजी बाबाजी यांस मौजे नाणे, तर्फ नाणे मावळ.

३।।।

८।।

कोकणची मसलत दसऱ्यापासून मार्गशीर्षपर्यंत (फाटलें आहे) तुम्हीं राहून प्रतिवर्षी करावी. हबशी, फिरंगी मारुन गर्देश मेळवावे.

हल्ली राजमाची, श्रीवर्धन, मनरंजनगड, गृगगड, कोथळा आम्हांकडे द्यावे. लोहगड तुंगी, तिकोना, कोरगड,बनगड सामानसहित तुम्हांकडे घ्यावे.

मुटे खोरें, मोसे खोरें येथें, सिंहगड, प्रचंडगड येथील लोकांची शेतें खाजगत असतील. खेरीजकरुन वरकड दरखंडीस दोन रुपये प्रमाणें आम्हांस द्यावे.

सुधागडचा तनखा चालवावा. पेणेस तनखा होता, त्याची कटकट सुधागडकर यांनी करावी.

कोथलेकर लोकांचे कबिले व वस्तभाव गुरुढोर जे असतील ते द्यावे.

तुंग, तिकोना, लोहगड, कोरीगड, घनगड येथील गडकरी लोक आम्हांकडे आहेत, ते तुम्हांकडे घ्यावे.

चाकर इसम लोक जे तुम्हांकडे आहेत ते तुम्हांकडे असतील. आम्हांकडे जे लोक आहेत ते आम्हांकडे. यापुढें तुम्हांकडील चाकर आम्हीं न ठेवावा. आम्हांकडील चाकर तुम्हीं न ठेवावा.

खाजसगत गांव तुम्हांकडे आहेत ते चालवावे.

२ तालुके पणवेली.

१ शिरढोण.

१ सोमटणें.

२

२ चिपळण तर्फेस गांव आहेत तेथे प---------------------[३५]

वरील तह नाम्यात शाहूस छत्रपती म्हटले असले तरी स्वामी असे म्हटले नाही. कान्होजी आपला सरखेलीचा शिक्काही कागदोपत्री वापरत असे म्हणून परस्पराशी सहकार्याने व समभावाने राहणाऱ्या सत्ताधिशांचा संघ असे राज्यसंघाचे वर्णन छ. शाहू कान्होजीच्या संबंधास बरोबर लागू पडते.

### ❖ छत्रपती शाहू महाराज व मोगल सुभेदार सय्यद हुसेन यांचा चौथाईचा तह :इ.स. १७१८:-

मुगल दरबारात सय्यद बंधूचे बळ वाढत असल्याचे पाहून बादशहाने त्यांच्यात फुट पाडण्यासाठी सय्यद हुसेनची दक्षिणेच्या सुभेदारीवर नेमणूक केली. सय्यद हुसेन दक्षिणेला आल्यावर इकडे दिल्लीत बादशहाने सय्यद अब्दूला विरोधीगट तयार करुन सय्यद बंधूना संपविण्याचे कारस्थान सुरु केले. त्यामुळे सय्यद बंधूंनी मराठ्यांशी मैत्री करुन त्यांची मदत घेऊन बादशहास शह देण्याचे ठरविले. हुसेन अलीचा दोस्त बुऱ्हाणपुरचा अधिकारी याने शंकरजी मल्हारच्या मध्यस्थीने मराठ्यांशी मैत्री करण्याचा सल्ला दिला. शंकरजी हा हुसेन अलीचा कारभारी होता. शंकरजीने बाळाजी विश्वनाथ व चिमणाजी दामोधर मार्फत छ. शाहूंशी वाटाघाट चालविली व तह ठरविण्यास साताऱ्यास आला होता. छ. शाहूंनी त्याची बरदास्त चांगली केली. विचार-विनिमयानंतर इ.स. १७१८ ला तह झाला तो पुढील प्रमाणे-

१. शिवाजीच्या वेळचे सर्व स्वराज्य तमाम गडकोटसुद्धा स्वतंत्रपणे शाहूच्या हवाली करावे.
२. अलीकडे मराठे सरदारांनी जिंकलेले प्रदेश, म्हणजे खानदेश, गोंडवने, वऱ्हाड, हैद्राबाद, कर्नाटक या भागातील प्रदेश, मुगलांनी सोडून देऊन ते मराठ्यांचा स्वराज्यात सामील करण्यात यावे.
३. दक्षिणेतील सहा मुगल सुभ्यातील चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याचा अधिकार मराठ्यांना असावा, चौथाईच्या मोबदल्यात मराठ्यांनी मुगल बादशहाच्या रक्षणासाठी १५,००० फौज दिल्लीस ठेवावी. सरदेशमुखीच्या मोबदल्यात मुगल सुभ्यातील दरोडेखोरांचा आणि गुन्हेगारांचा बंदोबस्त करावा.
४. कोल्हापूरच्या संभाजीस शाहूने त्रास देऊ नये.

५. मराठ्यांनी मुगल बादशहास दरसाल दहा लाख रुपये खंडणी द्यावी.

६. बादशहाने शाहूची आई येसूबाई, त्याची पत्नी, संभाजीचा दासीपुत्र मदनसिंग आणि इतर आप्त-स्वकीय यांची मुक्तता करावी.

हा करार झाल्यानंतर इ.स. ऑगष्ट १७१८ मध्ये शाहूने आपल्या अधिकाऱ्यांना चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याच्या आज्ञा दिल्या. खाफीखानाच्या माहितीप्रमाणे सय्यद हुसेनअलीने बादशहाकडून तहाला मान्यता मिळण्यापूर्वीच राजा शाहूचे अधिकारी ठिकठिकाणी नेमले.[३६]

या तहाने व त्याच्या वाटाघाटीने महाराष्ट्रात छ. शाहू याचे वजन वाढून त्यांचा जम बसला. त्यांचे कर्तृत्व लोकांस दिसू लागले, तशी त्याची इभ्रतही वाढत गेली. अष्टप्रधान व सरदार त्यांचे हुकूम बिनतक्रार पाळू लागले. राज्यकारभाराची व्यवस्था होण्याबरोबर प्रांतात शांतता व अबादी नांदू लागली. तसेच पुढे इ.स. १७१९ ला चौथाई, सरदेशमुखी व स्वराज्याच्या सनदा मिळून मराठ्यांचे साम्राज्यविस्तारास नवा उद्योग मिळाला. सर्वात महत्त्वाचे म्हणजे मातोश्री येसूबाई यांची सुटका होण्याचा मार्ग मोकळा झाला. यातूनच छ. शाहू यांचे मोठेपण, कौटुंबीक भावना व्यक्त होते.

❖ **छत्रपती शाहू महाराज व कोल्हापूरकर संभाजी यांच्यातील पहिला तहनामा :इ.स.१७२५:-**

श्री.

सन ११३५ फसली फेरिस्त नंबर २

तहनामा चिरंजीव राजश्री संभाजीराजे यांस प्रती शाहू राजे यांणी लिहून दिला सुरु सन सीत अशरीन मया व अल्लफ छ. ५ माहे रविलाखर*उर्फ पौष शुद्ध ७ गुरुवार विश्वावसुनाम संवत्सरे.........बित्तपशील-

हद्द श्रीकृष्णा धौम महाबळेश्वरापासून दक्षिण तीर तहत निवृत्तिसंगम पर्यंत कुल दुतर्फा मुलूख दरोबस्त ठाणी व किल्ले तुम्हांस दिले असत. कलम

श्रीसावित्री नदी संगमापासून तहत समुद्रगामिनीपर्यंत दक्षिण तीर जंजिर कोट किल्ले सुद्धा व ठाणी दरोबस्त महाल अंकोले पर्यंत तुम्हांस दिली असत. कलम १.

मिरज प्रांत व विजापूर प्रांतीची ठाणी देखील अथणी, तासगांव वगैरे तुम्ही आमच्या स्वाधीन करावे. कलम १.

इकडील चाकर तुम्ही ठेवू नयेत व तुम्हांकडील चाकर आम्ही ठेवू नयेत.कलम १.

तुंगभद्रा दक्षिण तीरापासून श्रीकृष्णा समुद्रगामिनी व श्री रामेश्वर देखील संस्थानें निमीं आम्हांकडे करार करुन दिली असत. कलम १.

मोगलाईतील वगैरे उत्तरेकडील मुलूख सुटले त्यांतील निम्मे प्रांत तुम्हास देऊं व तुम्हांकडून सुटला असता निम्मा प्रांत आम्हांस द्यावा. कलम १.

तुम्हाशी जे वैर करतील त्याचें पारिपत्य आम्ही करावें आम्हांशी जे वैर करतील त्यांचे पारिपत्य तुम्ही करावें तुम्ही आम्ही एकविचारें राज्याभिवृद्धि करावी. कलम १.

एकूण सात कलमें करार करुन तहनामा लिहून दिला असे. सदर्हु प्रमाणे आम्ही चालू. कांही अंतर येणार नाहीं. ''मोर्तब''.[३७]

### ❖ छत्रपती शाहू महाराज व कोल्हापूरकर संभाजी यांच्यातील दुसरा वारणेचा तह : ता. १३-४-१७३१:-

छ. शाहू दक्षिणेत आल्यावर त्याचे चूलत बंधूशी जे संघर्ष सुरु झाले ते तेवीस वर्षांनी इ.स. १७३१ त कऱ्हाडजवळ कृष्णेच्या काठी उभय बंधूची भेट होवून संपले. इ.स. १७२८ तील मुंगीशेवगावच्या तहाने संभाजीची बाजू अगदीच बसली तरीही त्याने उदाजी चव्हाणाच्या मदतीने छ. शाहूंशी विरोध चालविला. तेव्हा छ. शाहू यांनी स्वत: इ.स. १७३० ला दक्षिणेकडे संभाजी शिक्षा देण्यास निघाले. अखेर लढाई होवून कोल्हापूरकर संभाजीचा पराभव झाला तेव्हा संभाजीने युद्धाचा इरादा सोडून छ. शाहूस शरण आला. तेव्हा छ. शाहू यांनी ता. २६-२-१७३१ ला त्याची भेट घेऊन त्यास क्षमा केली व त्यांच्या सुप्रसिद्ध वारणेचा तह होवून त्यांच्यात समेट झाला. तो तह पुढील प्रमाणे-

श्री

तहनामा चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांसिप्रति शाहूराजे यांणी लिहून दिल्हें सु ।। इहिदे सललासोन मया व आल्लफ. (शिक्का) छ. १६ सवाल शके १६५३ विरोधिकृत नाम संवत्सरे चैत्र वद्य द्वितीया, बितपशील-

इा वारुण महाल तहद संगम दक्षणतीर कुल दुतर्फा मुलूख दरोबस्त देखील ठाणी व किल्ले तुम्हास दिले असत. कलम १

तुंगभद्रापासून तहद रामेश्वर देखील संस्थाने निम्मे आम्हांकडे, निम्मे तुम्हांकडे करार करुन दिल्हे असत. कलम १

किल्ले कोपळ तुम्हांकडे दिल्हा त्याचे मोबदला तुम्ही रत्नागिर आम्हांकडे दिल्ही. कलम १

वडगांव ठाणे पाडून टाकूं कलम १

तुम्हांसी जे वैर करतील त्यांचे पारिपत्य आम्ही करावें. आम्हाशी जे वैर करतील त्यांचे पारपत्य तुम्ही करावे. तुम्ही आम्ही एक विचाराने असावें. राज्याभिवृद्धि करावी. कलम १

वारणेच्या व कृष्णेच्या संगमापासून दक्षणतीर तहद निवृत्तिसंगम तुंगभद्रा पावेतो दरोबस्तदेखील गड ठाणी तुम्हांकडे दिल्ही असत. कलम १

कोकणप्रांत साळशी पलीकडे तहद पंचमहाल आंकोल पावेतो दरोबस्त तुम्हांकडे दिल्हे असे. कलम १

इकडील चाकर तुम्ही ठेवूं नये व तुम्हाकडील चाकर आम्ही ठेवू नये. कलम १

मिरज प्रांत विजापूर प्रांतीची ठाणी देखील अथणी तासगांव वगैरे तुम्ही आमचे स्वाधीन करावी. कलम १

एकूण नऊ लकमें करार करुन तहनामा लिहून दिल्हा असे. सदर्हुप्रमाणे आम्ही चालवूं. यांसि अंतराई होणार नाही. मोर्तब चिटणिशीकडील. यादी.

----

| | |
|---|---|
| ले. २० }<br>(४१८) }<br>सन ११४० | { श. १६५३ चैत्र व. २<br>{ ता. १३-०४-१७३१.<br>फेरिस्त नं. २२ |

तहनामा राजश्री संभाजीराजे सुरुसन इहिदे सल्लासीन मया व अल्लफ छ. १६ शौवाल ---------------------------------------------------- बितपशील.

इस्तकबील वारणा तहत संगम कृष्णा तीर कुलदुतर्फ दरोबस्त देखील ठाणी किल्ले दिले आहेत.

तुंगभद्रापासून तहत रामेश्वर देखील संस्थाने निम्मी राजश्री संभाजी राजे यांस दिली किल्ले कोपळ त्यास दिला. त्याणी मुबदला रत्नागिरी द्यावी.

वडगाव किल्ला पाडूं. जे तुम्हांसी वैर करतील त्यांचे पारिपत्य आम्ही करावें. आम्हाशी जे वैर करतील त्यांचे पारिपत्य तुम्ही करावे. तुम्ही आम्ही एकविचारे राज्याची अभिवृद्धि करावी.

वारणेच्या व कृष्णेच्या संगमापासून दक्षिणतीर तहत निवृत्तिसंगम तुंगभद्रा पावेतो दरोबस्त देखील गड ठाणी दिली असत. कोकण प्रांत साळवी पलीकडे तहत पंचमहाल अंकोले पावेतों दरोबस्त. इकडील चाकर त्यांणी ठेवू नयेत व तिकडील चाकर आम्हीं ठेवूं नयेत. मिरज प्रांतीची ठाणी व तासगांव देखील आमच्या स्वाधीन करावें.

एकूण नऊ कलमें करार करुन तहनामा लिहून दिल्हा असे. सदर्हुप्रमाणे आम्ही चालवूं. यांसि अंतराई होणार नाही. मोर्तब चिटणिशीकडील. यादी.[३८]

देशपांडे प्र. न. लिहितात की, ''वारणेचा तह म्हणजे छ. शाहू यांच्या मुत्सद्देगिरीचा पूरावा होय.''[३९] यावरुन छ. शाहू यांच्यातील राजकारणे, मुत्सद्दी गुण प्रकट होतात. या तहाने दोन भावातील संघर्ष समाप्त होवून राज्यात शांतता निर्माण झाली हे महत्त्वाचे होय. शत्रूत पुन्हा अंतर्गत संघर्षात हात घालण्याची संधी मिळाली नाही.

### ❖ छत्रपती शाहू महाराज व निजाम यांच्यात पेशवा बाजीराव मार्फत मुंगीशेगावचा तह : ता.६ मार्च १७२८:-

निजामाची दक्षिणेवर सुभेदार म्हणून नेमणूक झाली तेव्हापासूनच तो संधी मिळेल तेव्हा मराठ्यांचे खच्चीकरण करण्याचा प्रयत्न करु लागला. साखरखर्डा येथील विजयानंतर निजामाचे दक्षिणेतील स्थान पक्के होऊन निजामशाहीस सुरुवात झाली पुढे कर्नाटकातील राजकारणावरुन निजाम व छ. शाहू यांचेहीसंबंध बिघडले तसेच कोल्हापूरकर संभाजी व छ. शाहू यांचेही संबंध बिघडले होते. तेव्हा छ. शाहू यांचे सैन्य कर्नाटकावर गेले असताना निजामाने, संभाजीस चंद्रसेन जाधवामार्फत मिळवून छ. शाहू यांचे उच्चाटन करण्याची तयारी केली व छ. शाहू यांच्या राज्यपदास आव्हान देवून संभाजीस मराठ्यांचा छत्रपती घोषित केले. तेव्हा छ. शाहू व निजाम यांच्यात युद्ध होऊन

त्यात निजामाचा पराभव होवून पेशवा बाजीराव मार्फत मुंगीशेगावचा तह ता. ६ मार्च १७२८ ला झाला. तो पुढीलप्रमाणे

तह

तहाची कलमें खाली दर्शविलेली नमूद आहेत. मागणी बाजीरावाची असून, त्याजवर जबाब निजामाचा आहे. (निजामाचे दस्तकाची फर्द)

१. मागणी- दक्षिणेचे कामकाजाचा बंदोबस्त आमचे हातें घ्यावा.ईश्वर कृपेंकरुन दौलतबाई व किफाईत केली जाईल. जबाब -बशर्त तुमचे हातें घेतला जाईल.

२. शाहूराजांकडून, आनंदराव (सुमंत) आपणापाशी आहेत, त्यांसी आम्हांसीं नीट नाहीं, सबब त्यांस निरोप द्यावा. आम्हाकडून कोण्ही आपणाजवळ राहील. रुकसद दिल्ही. (कबूल गोष्ट).

राजे शाहू यांणीं मतलब लिहून दिला, त्याजवर निजामांनी दस्कत केले, त्यांची कलमें.

३. संभाजीराजे यांस निरोप द्यावा की ते पन्हाळ्यास जात. ज. रुकसत करतों.

४. पो अकलकोट, खेड, तळेगांव, बारामती, इंदापुर, नारायणगड व पुणें वगैरे ठाणीं पहिल्यापासून स्वराज्यांत आहेत. हाल्ली आपण जप्त केलीं तीं मोकळीं करावीं ज. ठाणेदार व फौजदार यांस लिहून दरोबस्त ठाणीं तुमचे हवाली केली जातील.

५. सहा सुभे दक्षिणच्या सरदेशमुखीची सनद व स्वराज्याची सनद नवी द्यावी. ज. पेशजीच्या सनदेप्रमाणे अंमलदारांचे नावे परवाना दिल्हा जाईल.

६. बळवंतसिंग वगैरे यांस पेशजीप्रमाणे मनसबा जागीर देऊन सरफराज करावे. ज. कबूल.

७. बाजी संकपाळ यांणीं नापरुटी पो चांदवड येथील मोकदमास जिवे मारिलें. घोडे वगैरे वस्तभाव नेली ते माघारे देवावे. ज. चौकशी करुन देविली जाईल.

८. संभाजी राजे यांस विजापूर सुभ्यापैकी कृष्णा व पंचगंगेपलीकडील प्रांत आम्हीं दिला आहे व त्याची सनदही आम्ही करुन दिली तेच असावी. आपण न द्यावी. हे कबूल केलें.

९. सीलमखान वगैरे यांणीं कमावीसदारास जिवें मारलें, घोडी वगैरे वस्तभाव नेली ते माघारी देवावी. ज. शोध करून माघारी देविली जाईल.

१०. सुलतानजी निंबाळकर आपणाशी मिळाले, त्यास जागीर अंबड व बीड येथें आहे. कदाचित त्यांचे भाऊ सिधोजी व कान्होजी यांशीं ते खटला करतील आणि शब्द आम्हांवर येईल. ज. सुलतानजी आम्हांसी मिळाले तेव्हा त्यांची रयायत (भीड) आम्हासी लाजम आहे.

११. संभाजी राजे यांजकडील कमावीसदारांनी महालोमहाली वसूल घेतला असेल तो आमचे हिशेबी न लिहावा. आम्हांकडील कमावीसदारांनी वसूल घेतला असेल तो मजरा देऊं. ज. चौकशी करून शाहूराजे व संभाजी राजे यांनी वसूल घेतला असेल तो मजरा देऊन बाकी तहशील करावी.

१२. वडगाव वगैरे सात गांव पेटा गाळणा येथील जमीदाराचे गुमास्ते अलीखानाचे कैदेत आहेत ते सोडवून द्यावे. ज. मोगल अलीखानास लिहून सोडविले जातील.

१३. पिलाजी जाधव व रंगोजी जाधव यांजकडे शहागडची पाटीलकी आहे त्यास तेथील जागीरदारास ताकीद करावी की पाटीलकीचा अंमल चालवावा. ज. ताकीद केली जाईल.

१४. तुरुकताजखान यांणीं स्वराज्यांत जाऊन बंद धरुन आणिला आहे तो सोडवून द्यावा ज. सोडून देविला जाईल.

१५. तोकरे परगण्याचे सात गांव मजीठोके याचे देशमुखीचे आहेत त्याची सनद ठेवावी. ज. दप्तरचा दाखला पाहून देविली जाईल. मौजे मजकूरचे महसुलाची चौकशी करुन रयात केली जाईल.

१६. पेटा कडे निंबोणे येथील पाच गांव कृष्णाजी पवार व उदाजी व केरोजी पवार यांस इनाम द्यावे. ज. आमचे चाकर होतील तेव्हा त्यांस दिले जातील.

१७. संभाजी राजे यांस सुभे विजापूरपैकी कृष्णा व पंचगंगेच्या पलीकडे प्रांत येथील चौथसरदेशमुखी आम्ही दिल्ही ते त्यांणी घेत जावी. कृष्णेच्या येणेप्रमाणे पांच पत्रांतील मजकूर कलमबंदीने लिहिला आहे.[४०]

या तहाचे महत्त्व असे की, यामुळे छ. शाहू यांची मराठी राज्याची मालकी निर्बाधीत झाली व संभाजीचा वारस हक्क मागे पडला तसेच निजामाने चौथाई व सरदेशमुखीच्या हक्कास मान्यता दिली.

### ❖ छत्रपती शाहू यांनी पेशव्यास दिलेल्या सनदा :इ.स. १७४८:-

छ. शाहू महाराज यांच्या मृत्यूने मराठी राज्यकारभारात मोठे स्थित्यंतर आले कारण छ. शाहू यांनी मृत्यूपूर्वी स्वदस्तूरच्या दोन सनदा बाळाजीस पाठविल्या. त्या त्यांच्या मृत्यूपत्राप्रमाणेच मानल्या जातात. या सनदा महत्त्वाच्या असल्याने त्यांचा मसुदा पुढीलप्रमाणे-

**सनद पहिली :**

राजमानराबालाजीप्रधानपडीतयास आज्ञा तुम्ही फौज धरनेसर वासआज्ञा केली त्याच्या दैवनाही महाराजास दुखने जालेनाही बरह्यातनाही राजभार चाला पाहिजे तर पुढे वंस बसवने कोल्हापूर चेनकर ची चोटनीसाससर रवसागी तलेत सेकरने वंस हो ईलत्या आज्ञेत चालून राज मंडळ चालवने चिटनीसस्वामी चेइसवासू स्थाच्या तुमच्या विचारेराजर राख वंस होईल तो तुमची घालमेल कर ना रनाही सुदन असा

### ❖ या सनदेचा सांप्रतच्या भाषेने अनुवाद :-

राजमान्य राजश्री बाळाजी प्रधान पंडित यांस आज्ञा. तुम्हीं फौज धरणें. सर्वांस आज्ञा केली त्यांच्या दैवी नाहीं. महाराजांस दुखणें जालें. नाही बरें होत नाहीं. राज्यभार चालला पाहिजे. तर पुढे वंश बसवणे. कोलापूरचे न करणें. चिटनीससास सर्व सांगितले तसें करणें. वंश होईल त्याच्या आज्ञेंत चालून राजमंडळ चालवणें. चिटनीस स्वामींचे विश्वासू. त्यांच्या तुमच्या विचारें राज्य राखणें. वंश होईल तो तुमची घालमेल करणार नाहीं. सुज्ञ असा.

**सनद दुसरी :-**

राजमान रा बाळाजी पंडीत प्रधान आज्ञा जे राजभार तुम्ही चालवाल हा भरवसा स्वामीस आहे पहिले सांगित लेखात रजमाती चीटनीसानी आसल कली तुजचे मसतकी हत ठवीला आहे वस होईल तो तुमचे पदप्रधान चालवीलकरील आत रतर सफत आसे त्याचे आज्ञेत चालू सेवा करने राज राखने बहूतकार्य लहीने सुदन आसा.

## ❖ या सनदेचा सांप्रतच्या भाषेने अनुवाद :-

राजमान्य राजश्री बाळाजी पंडित प्रधान (यांस) आज्ञा जे : राज्यभार तुम्ही चालवाल हा भरंवसा स्वामींस आहे. पहिलें सांगितले (त्याची) खातरजमा ती चिटनिसांनी असेल तुमचे मस्तकी हात ठेविला आहे वंश होईल तो तुमचें पद प्रधान चालवील (यांत) करील अंतर तर असे. त्याचे आज्ञेंत चालून सेवा करणें (आणि) राज्य राखणें. बहूत काय लिहिणें? सुज्ञ असा.[४१]

या सनदामुळे पंतप्रधानाकडे राजमंडळाचे सर्वाधिकार आले. राज्यसंघात पेशव्यास सर्वश्रेष्ठ स्थान प्राप्त झाले.

## ❖ छत्रपती शाहू यांची प्रतिनिधीस सनद : इ.स. १७१५-१६:-

वतनपत्र छ. ९ रमजान यतन सरदेशमुखी प्रांत कडे

"...वतन सरदेशमुखी प्रांत कडे विलित येथील कैलासवासी राजश्री काकासाहेबी अजराऱ्हामत करुन दिली त्याप्रमाणे करीत आले. स्वामींनी वतनाची पत्रे करुन देऊन वतन चालविले. मशारनिल्हे छ २० सवाल सन इसने मशारनिल्हे कडून स्वामीसेवेस अंतर पडले ------ अमानत करून हुजूर ठेवून जोत्याजी केदारकर यांचे स्वाधीन होते. एशियास मशारनिल्हे स्वामीचे पुरातन सेवक, या राज्यामध्ये सत्ताहस बहुतच करून राज्य अभिवृद्धीस पाहिले. प्रस्तुत स्वामीची सेवा निष्ठापूर्वक करीतात यांचे वंशपरंपरेने चालविणे अगत्य जाणून स्वामी कृपाळू होऊन प्रांत मजकूरची सरदेशमुखीस वतनकरार करुन दिली आहे. वतन हे उपभोग करतील या वतनास हक्कलजिमा इनामत व हल्लीपूर्वी सनदाप्रमाणे देत जाणे. प्रतीवर्षी नुतन पत्राचा अक्षेप न करणे..."[४२]

अंतर्गत यादवीच्या काळात एखादा सरदार प्रतिपक्षाकडे गेला असला तरी स्थिरस्थावर झाल्यावर त्यालाही वतन देऊन सारा राखने. हे छ. शाहू यांचे राजकारणी धोरण वरील वतनपत्राच्या सनदेतून व्यक्त होते.

## ❖ छ. शाहू यांची भानू घराण्यास सनद : ता. १-८-१७४२:-

"राजश्री बाळाजी महादेव भानू बाळाजी पंडित प्रधान याजबरोबर महमूनिसबतीने फडणिसी लिहण्याचे प्रयोजन होते, सबब पंडित प्रधान फौजसह वर्तमान दिल्लीस गेले तेव्हा बाळाजीमहादेव स्वारीस होते. दिल्लीचे मुक्कामी युद्धप्रसंग जाला. ते समयी

बाळाजी महादेव मृत्यू पावले याजकरिता रामाजी महादेव व जनार्धन बल्लाळ यांचे चालवणे स्वामीस आवश्यक जाणवून स्वामी उभयंतावरी कृपाळू होऊन मौजे वाकसई गाव इनाम दिला आहे...''[४३]

छ. शाहू महाराज हे आपल्या जवळील निष्ठावान मनुष्याची कदर कशी करत तसेच मनुष्य पारखेचे गुणही आपणााल वरील सनदेतून पाहावयास मिळते.

### ❖ छत्रपती शाहू यांची नाशिक येथील पूर्णानंदस्वामीच्या मठास देणगीची सनद : इ.स. १७३५-३६:-

''यादी श्रीपरमहंस श्रीपूर्णानंद सरस्वति स्वामी यांचा मठ, कसबा नासिक येथे आहे. तेथे अतीत, अभ्यागत, ब्राह्मणसंतर्पण होतें, व अध्ययन, अध्यापन होत आहे. त्याचा योगक्षेम चालावयास अनुकूलता करुन दिलीयानें स्वामींस व स्वामींच्या राज्यास श्रेयस्कर जाणोन, मौजे सायखेड, परगणे नाशिक, सरकार संगमनेर, बागा व पेशजीच्या मुकासीयांकडून दूर करुन, हल्लीं कुलबाब, कुलकानू देखील हल्लीपट्टी व पेस्तरपट्टी खेरीज हक्कदार व इनामदार श्रीकडे इनाम सर्व याचा करुन दिल्हा असे. तरी मौजे मजकूरचा सदरहूप्रमाणें ऐवज श्रीस व श्रीचे शिष्यपरंपरेकडे वसूल देत जाणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रती लिहून घेऊन, हें पत्र भोगवटीयास परतोन देणें येविषयीं पत्रें.

१ मोकदम मौजे मजकूर.

१ देशमुख व देशपांडे, परगणे मजकूर.

१ देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी.

३

१ राजश्री बाजीराव पंडित प्रधान

४

एकूण चार कागद देणें.

कारकीर्द छ १० रबिलाख सीत सलासीन.''[४४]

या सनदेतून छ. शाहू महाराज यांची धार्मिक कार्याबद्दलची ओढ तसेच साधू संतावरील आस्था दिसून येते.

### ❖ छत्रपती शाहू महाराज यांनी धामधूमेच्या प्रसंगी रयतेस दिलेल्या सवलती ची सनद : इ.स.१७१३-१४:-

धामधुमीच्या प्रसंगाकरितां सांप्रत ज्याच्या मनास आलें, तो रोखे करुन रयतेस उपद्रव द्यावयास लागल्यामुळें रयत तजावजा होऊन, कित्येक गांव फुटोन रयत देशांतरास गेली. राहिली तेही जाणार. मुलूख खराब होणार. याकरिता पेस्तर सालीचा तह केला असे.

बाबती दरसद्दे वसूल घेतात.

१० दाहिजा.

| | |
|---|---|
| ५ | महालमजकूर |
| ५ | इनामपट्टी |
| ३ | खुद्द |
| ६ | साहोत्रा |
| १० | सरदेशमुखी |
| २ | नाडगौडी |
| ४१ | |

त्यापैकी रयतेस माफ केलें असें.

| | |
|---|---|
| खुद्द | ३ |
| महालमजूर | २ |
| | ५ |

बाकी रयतेवरी दरसद्दे दिवाणदस्ताचे बेरजेस वसूल घ्यावा रुपये ३६.

गहूं रयतेपासून गल्ल्याचें माप घेतात. त्यामुळे रयतेस जबर पडतें याकरितां पूर्वी नवशेरी सोळुलें मापें गल्ला घ्यावयाचा दंडक होता. त्याचप्रमाणें हात न घरितां उसण्या नवशेरी सोळुल्यामापें घ्यावें. त्यास कसर दरमणे ४४२ दोन पायली घ्यावें. ज्यास्ती घेऊं नये.

लष्करची व इत्यादिक रयतेवरी आमदरफ्ती पडते. त्यांत निम्मे बेरीज दिवाण-दस्ताचे बेरजेंत रयतेला मजुरा द्यावी. निम्मे बेरीज रयतेवरी घालावी.

महालोमहाल कारकून पहाणीस व नक्त बाबेची टीप घ्यावयास जातात. त्याला खर्च होतो, तो रयतेवरी न घालावा. जिल्हेकडील कारकून असले, आणि त्यांस खर्च जाला. तरी बाबतीच्या ऐवजीं मजुरा द्यावा.

गडाकडील कारकून लोक असले, तरी गडाच्या ऐवजांत त्यांचा खर्च मजुरा द्यावा.

देशमुख व देशकुळकर्णी, मुकदम, पाटील, गांवकुळकर्णी यांस पेशवी दर चावरी बिघे ४१० दहा इनामत मजुरा द्यावा. ऐसा तह होता. हल्लीं त्यास कसाला बहुत पडतो, याकरितां हल्लीं दरचारी बिघे ४१५ इनामत मजुरा द्यावा, ऐसा तह केला असे.

येणेंप्रमाणें तह करून, अभयपत्रें सादर केली आहेत. तरी तुम्ही रयतेचा दिलासा करून सदरहू लिहिल्याप्रमाणें तह चालवून रयत कष्ट-कामास लावणें. याउपरी रयतेस कोणी जेवा, तुप, कोंबडें मागों नये. वेठबेगारीचा तगादा देंऊ नये. ऐसी आज्ञा केली. याकरितां जो कोणी हुजरातचा अगर सरकारकुनांकडील मुलखांत अथवा गडकिल्ल्याचा अथवा गैबतीचा कामगारीमुळें अगर आमदरफ्तीमुळें मुलखांत जाईल, आणि तो जेवा अगर तुप, कोंबडें मागेल की रयतेस वेठबेगारीचा तगादा लावील, त्याचा परिछिन्न मुलाहिजा न करणें. नतीजा पाववून रयतेस उपद्रव ने दे, ती गोष्ट करणें.[४५]

### ❖ परसोजी भोंसले यांस आठ महालांची देशमुखी, वतन करुन दिल्याची सनदः-

"राजश्री परसोजी भोंसले, देशमुख महालहाय, प्रांत कडेवळीत यांस आज्ञा केली ऐसीजे:- स्वामी मोगलाईतून स्वराज्यांत आले. ते समयी तुम्ही, लांबकानी प्रांत खानदेश येथील मुक्कामीं, जमावसहित येऊन भेटी घेतली. ती एकनिष्ठपणे सेवा केली. कितेक खस्त मेहनत केलीत. त्यावरुन स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन, तुम्हांस प्रांत मजकूरचे देशमुखीचें वतन पेशजी भोंसले यांचे होतें, अलीकडे मोंगलांच्या राज्यात तरफ तरफस आलाहि (दे) देशमुख जाहले होते, ते दूर करुन तुम्हांस वतन दिल्हें. महान ८ बितपशील:-

\+ + + + + + + + + + + +

येणेप्रमाणे आठ महालची देशमुखी तुम्हांस आजरामऱ्हामत वतन करुन दिल्ही असे. तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनुभवणें. इनाम देशमुखींचे व हक्क लाजिमा बरहुकूम सालाबादप्रमाणें करार केलें असें. तेणेंप्रमाणे अनुभवीत जाणें."[४६]

## ❖ छ. शाहू महाराज यांनी दिलेला देवजी सोमवंशी यास किताब : इ.स.१७३६-३७

विश्वासनिवि राजमान्य राजश्री देवजी सोमवंशी यास पत्र जे तुम्ही स्वामीचे एकनिष्ठ सेवक, सेवा बहुत निष्ठेने केली, याकरिता तुम्हावरी स्वामी कृपाळू होऊन हिंदुराइची किताब दिल्हा म्हणून पत्र. [४७]

यावरून छ. शाहू हे आपल्या सेवकाचा बहुमान करत हे व्यक्त होते.

## ❖ छ. शाहू महाराज यांचे कंठाजी कदम व पेशवे ह्यास पत्रेः-

''राजश्री कंठाजी कदम यांस पत्र कीं, प्रांत गुजराथ व प्रांत माळवे येथील चौथाई व सरदेशमुखीचा अंमल सन सीतपासून निमे राजश्री पंतप्रधान यांचे स्वाधीन व निमे राजश्री खंडेराव दाभाडे सेनापति यांचे स्वाधीन केला आहे. त्यास पंडित मशारनिल्हेकडील निमे अंमलास कामाविसदार येऊन आपला अंमल करतील. त्यासी तुम्हांस कथला कराया गरज नाहीं. क्षणून पत्र१.

इनाम देह २.

महालनिहाय प्रांत गुजराथ पत्र १.

महालनिहाय प्रांत माळवे पत्र १.

गुजराथ व माळवे येथील साहित्यपत्र गिरिधरबहादूर यांस १.

गुजराथ पंतप्रधान यांचे नांवें पत्र कीं, गुजराथ व माळवे येथील चवथाई व सरदेशमुखीचा निमे अंमल तुमचे स्वाधीन सन/ सीतापासून केला असे. म्हणून पत्र १.

कित्तापत्र राजश्री पंतप्रधान यांचे नांवें कीं, सुरतप्रांतीच्या बाबती व सरदेशमुखीचा जिल्हा तुमचा; हल्लीं राजश्री खंडेराव दाभाडे सेनापती यांणीं मख्ता केला असे. त्यापैकी दोन तक्षिमा ऐवज हुजूर पावेल. एक तक्षीम तिसऱ्या मख्त्यापैकीं, साल दरसाल तुम्हांस हुजूरून मजुरा म्हणून पत्र.''[४८]

सरदारांचे आपसातिल वादावर छ. शाहू महाराज मध्यस्थी करून त्याचे निर्वाहन करित त्यामुळे राज्यात भावी होणारा अपाय वेळीच टळत असे. हे या पत्रातून दिसून येते.

❖ **छ. शाहू महाराज यांनी फितूरी बद्दल सेनापति चंद्रसेन जाधव यास शासन केले त्याविषयीचे पत्र : ता. १७-११-१७२७:-**

"...क्षेत्रिय कुलावतंम श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी देशमुख व देशपांडे पाा सुपे बारामती यासी आज्ञा केली. येजीजे. पाा मजकूरचे बाबतीपैकी 'चौथाई चंद्रसेन जाधव याकडे पेराजी मुकासा' होता तो दर करून हाली राजश्री संताजी जाधवराऊ सेनापति याकडे जमावाचे बेगमीबद्दल मोघम येवजी मुकासा दिल्हा असे. तरी तुम्ही यासी रुजू होऊन सदरहून येवज मााइलेकडे वसूल देणे जाणिजे."[४९]

छ. शाहू महाराज फितूरांचा बंदोबस्त करण्यास किती दक्षता घेत होते हे दिसून येते. तो खुद्द सेनापती असला तरी त्यास शासन करण्यास चुकत नसत. यातून त्याचे खंबीर धोरण व न्यायप्रियता दिसते.

❖ **छ. शाहू महाराज यांनी कान्हाजी भोसले व राणोजी भोसले यांस सरंजामाची करून दिलेली वाटणी :इ.स. १७२७-२८:-**

"श्रीराजा शाहू छत्रपती स्वामी यांणीं, राजमान्य राजश्री राणोजी भोंसले यांसी आज्ञा केली ऐसीजे:- राजश्री कान्होजी भोंसले स्वामींच्या दर्शनास आले. तुमीं हुजूर होतेत. त्यास, तुझा उभयतांचे समाधान करून, सरंजामाची वांटणी करून दिल्ही आहे. बितपशील :-

मसूरचे मुक्कामी राजश्री बाळाजी पंडित प्रधान यांचे विद्यमानें सरंजाम करार करून दिल्हा आहे. त्यापैकी दोन तक्षिमा, (एक तक्षीम) राजश्री कान्होजी भोंसले व एक तक्षीम तुझी व रघोजी भोंसले यांसी सरंजाम. कलम १.

हल्लीं पराभवनाम संवत्सरी सातारियाचे मुक्कामी स्वामींनी हुजूरून सरंजाम दिल्हा आहे. त्यापैकी तीन तक्षीमा कान्होजी भोंसले, बाकी चौथी तक्षीम तुम्हीं व रघोजी भोंसले यांसी कलम १.

येणेंप्रमाणें सरंजामाची वांटणी करून देऊन, तुम्हांस रघोजी भोंसले देखील राजश्री कान्होजी भोंसले यांचेबरोबर दिल्हे आहे. तुम्हीं मान्य करून स्वामींच्या पायाची शफत केलीत. याउपरी सदरहू वांटणीप्रमाणें तुम्हीं सरंजाम घेऊन कान्होजी भोंसले यांचे विचारें वर्तवणूक करणें. तुम्हीं त्यांचे महालांत दखल न होणें. ते तुमच्या महालांत

दखलगिरी करणार नाहींत. सरंजामखेरीज परमुलुखांत खंडण्या होतील, त्यापैकी सरदारी वांटा चौथाई काढून, बाकी राहील त्यापैकी तुमचे व त्यांचे फौजेबरहुकूम वांटून देतील. तुम्हीं व रघोजी भोंसले, राजश्री कान्होजी भोंसले यांचेबरोबर राहोन, एका विचारें स्वामिकार्य करणें. तुमचा मुक्काम कान्होजी भोंसले यांचेबरोबर होईल. तुम्हीं सदरहू लिहिल्याप्रमाणें वर्तवणूक करणें. राजश्री कान्होजी भोंसले चालवावयास अंतर करणार नाहीं. जाणिजे.''[५०]

सरदाराच्या घरातील आप-आपसातील वादाचा राज्यकार्यावर परिणाम होवू नये, सर्वांना समान न्याय मिळावा म्हणून छ. शाहू महाराज किती काळजीपूर्वक लक्ष देत होते हे दिसून येते.

### ❖ छ. शाहू यांची दाभाड्यास ताकीद : इ.स. १७३६:-

राजमान्य राजश्री येशवंतराव दाभाडे सेनापती यांसी आज्ञा केली ऐसोसे राजश्री बाजीराव पंडित प्रधान उत्तर प्रान्तास जातात, त्यास आपली फौज सामील करणें म्हणून तुंम्हास आज्ञा केली होती. परंतु फौज त्याससमागमे दिली नाही व हुजूरही यावयाचा प्रसंग जा (ला?) नाही. रनालियास काल हरण करीत राहिले आहा, यावरुन काय म्हणावे; तुम्ही सेनापती आणि हे तुमची सेवा करुन मंगनामोष करुन घ्यावयाची हौस असता व उमेद धरीत नाही. तेव्हा तुमचे हाते काय होणे? हल्ली प्रधान व निजामनमुल्कास समीपता हल्ली गांठ पडली असेल---- या पावतेसणी फौज निशी जाऊन सामिल होणे. दिरिंग एक क्षणाचा न करणे बहुत शिताबीने जावे, घालघसरावर सर्वथा न घालणे सुज्ञे असा''[५१]

वरील पत्रावरून एखादा सरदार जर राज्यकारभारात कामचुकारपणा करत असेल तर त्यास छ. शाहू ताकीद देत, विचारणा करीत, यावरुन शाहूंचा राज्यकारभारातील शिस्तपणा, परखडपणा दिसून येतो.

### ❖ छत्रपती शाहू महाराज व पेशवे यांचे संबंध : इ.स. १७३५:-

महादाजी आंबाजी पुरंदरे बाजीराव

पुरवणी तीर्थरुप राजश्री राऊ व तथा राजश्री अपा स्वामीचे सेवेसी विनंती काली गुरुवारी प्राथ:काली राजदर्शनास गेलो. तेव्हा राजश्री बोलीले की, तुम्ही घडीभर बसा,

तुम्हासी आम्हास दोन गोष्टी बोलणे आहे. आवघ्या लोकांस निरोप देवून आणि राजश्री ऐकलेच बसले. आम्हास बोलावून बोलिले के, आजकाल इश्वर इच्छेने राजश्री प्रधान पंताच्या गोष्टी सवौत्कर्ष आहेत याची कीर्ति भुमंडली बहुत दिवस राहिल स्वामी सेवेशी व कितेक विसी अंतर नाही, परंतु येक गोष्ट अनुचित करातात की, द्रव्याची अशा धरुन वत XXX साव XXXX अर्जिले किर्तीस किंचिंत कलंक सांबा (कावा.आ) आपला घराऊ विचार जेव्हा गाठ पडे XX न येवढी गोष्ट न करवणे ---येथपर्यंत तुम्ही आम्ही आहोत तोपर्यंत चालेल, पुढे चालणार नाही, ऐसे बोलीले त्यावर आम्ही विनंती केली की, ते काही मनात विशाद आणून बोलिले नाहीत महाराजास जे गोष्टी अनुचित आढळली असेल ती आज्ञा करावी व तिचा विचारही सांगावा. त्यावर बोलीले की, आम्हास XXX (सांग)णे असल्यास XXXX (समी) व सांगो येथे बोलिले. जाले वर्तमान स्वामीस विदित व्हावे यास्तव लिहिले असे सेवेसी श्रृत होय हे विज्ञापना.''[५२]

वरील पत्रातून छ. शाहू व पेशवे यांचे संबंध कळून येतात तसेच बाजीरावास जर एखादी गोष्ट छ. शाहू यांना सुचवायची असल्यास ती किती जपून सांगावी लागते हे कळते यातून छ. शाहू याचा दरारा किती होता हे लक्षात येते.

### ❖ छत्रपती शाहू महाराज यांची दर्ग्यास देणगी :इ. स. १७१८:-

श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री बालाजी पंडित प्रधान यासि आज्ञा केली ऐसी जे. दरगाहा शाहा शरीफ पीर' मुाा अहमदनगर यास इनाम मौजे कोनोसी पाा सेवगाऊ मौजे येकलारे पाा संगमनेर हे दोन गाव इनाम दिल्हे आहेत. तरी तुम्ही बिलकसूर पीराकडे चालवणे, कोण्ही उपसर्ग करेल त्यास ताकीद करणे.''[५३]

छ. शाहू यांची सहिष्णू वृत्ती व धर्मात भेदभाव न करणे, ते हिंदू असूनही इतर धर्माच्या श्रद्धास्थानास ते मदत करत होते हे दिसून येते.

### ❖ छत्रपती शाहू महाराज यांनी शनिवारवाड्याच्या कोटास मनाई केल्याचे पत्र:-

''आजि मंदवारी प्रात:काळी दरबारास गेलो होतो. राजश्री नारबोवा व आणीकहि कित्येक लोक मुजऱ्यास आले होते. तेव्हा राजश्री स्वामी बोलले की, ''राजश्री प्रधानपंत

पुण्यास कोट बांधितात, येविषयीं पहिले हुजरे व कागद पाठविले. परंतु ते गोष्ट न ऐकतां आपलाच हेका करुन किल्ला बांधितात. तस्मात मोगलांचें पुण्याचे ठाणे बसावें असे त्याच्या मनांत आहे की काय? सिंहगड किल्ला जवळ, तेथें चिरेबंदी कोट पक्कें काम करितात. द्वाही हुजूरे याणीं दिली, तथापि मोजीत नाहीत आणि कोट बांधितात. राजश्री सचीव पंताचा किल्ला सिंहगड जवळ आहे. ऐशियास सचिवाकडील किल्यास मोगलांचा मोर्चा बसवावा असें त्याचे चित्तांत आहे. (कीं काय) हें काहीच कळत नाहीं. तसेंच जागा किल्ले वाघोली व नांदडे व वाडी व आंबी वगैरे जागीं किल्ले बांधितात. मोगलांची आवाई जाली तरी यांतून एकहि जागा रुजणार नाही; आणि आपले आपलयासच प्रतिबाधक कर्म का करितात? व वडीलही उगेच डोळे झांकितात. परंतु गळफास बसेल. पूर्वी पिलाजी जाधव वाडा बांधीत होते, तेव्हा आम्ही मनाई करीत होतो. परंतु राजश्री चंद्रसेनराव जाधव थोराताची पाठ राखीत यामुळें वाडीस कोट जाला. शेवटीं राजश्री बाळाजीपंत धरिले. तेव्हा तीच वाडी पुरंदरास मोर्चा जाहला व मुलूख हैराण जाहला. आम्हीं सांगत होतों ते न ऐकिलें. शेवटी त्याच गोष्टीस आले. तसेंच हेंही कर्म आहे. राजश्री प्रधानपंतांनी काही पुण्यास कोट बांधावा असे कांही नाहीं.'' म्हणून कसा श्रमी होऊन बोलले. चोरपाळतींने बातमीही पाठविणार आहेत. ''किल्ला कसा बांधितात'' असे आहे. तरी स्वामींनीं राजश्री स्वामीचे आज्ञेप्रमाणें किल्ला न बांधावा. हवेली भोवती बुरुज न घालितां चार दिवाळी मात्र करावीं. जुनें काम आहे तें काहीं फार पक्कें तों नाहीं. परंतु उगीच भ्यासुर दिसते. त्यास पांढरे भिंतीचे बाहेरील अंग सारवावें म्हणजे डोळे-फोड दिसणार नाहीं. अर्थसूचना लिहिला आहे. स्वामी खावंद आहेत. खातरेस येईल तें करावें.[५४]

या पत्रातून छ. शाहू महाराज यांची दूरदृष्टी, समान राजनिती धोरण दिसून येते व कोणताही सरदार, अधिकारी बलीष्ट होऊन त्रासदायक होवू नये म्हणून छ. शाहू किती जागरुक असत यातून त्यांचे कर्तृत्व लक्षात येते.

## ४.५ छत्रपती शाहू महाराज एक लोकसंग्रहकर्ते राजाः-

छ. शाहू महाराज यांचे सर्वात मोठे कार्य म्हणजे राष्ट्रात हजारो कर्तबगार माणसे निर्माण केली व त्यांचा राष्ट्रकार्यास व प्रशासनास योग्य ठिकाणी वापर केला. त्यांचे हे कृत्य चिरस्मरणीय झाले.

हजारो कुटुंबे सर्व जातीची व सर्व वर्गातील छ. शाहू यांच्या प्रोत्साहनाने पुढे आली. थोडक्यात साांगायचे तर त्यांच्याच कर्तबगारीने मराठ्यांचा आजचा इतिहास बनला आहे. कोणत्या ना कोणत्या रुपाने ही कुटुंबे आजही पूर्वजांच्या उद्योगाचे फळ ऊपभोगीत आहेत. विद्यमान मराठी राज्ये, सरदार घराणी, इनामे मिळविलेली देवस्थाने वगैरे बहुतेक छ. शाहू कालीन आहेत. उदा. धनाजी व पिलाजी जाधव, संभाजी घोरपडे व त्यांची कुटुंबे, नागपूरकर भोसले, चिटणीस घराणे, दाभाडे, इचलकरंजीकर, बारामतीकर व पटवर्धन मंडळी असे कित्येक मंडळी आहेत. त्यांची नुसती नावानिशी यादी देणेही शक्य नाही. शिंदे, होळकर, पवार व गायकवाड यांची राज्य आज आपल्या समोर आहेत.

छ. शाहू महाराज यांनी कित्येक घराणी व मनुष्यास योग्यतेस आणून राष्ट्रीय कार्यास लावले. त्यात जोत्याजी केसकर, यास सरदेशमुखीचे वतन व १८ कारखान्यावर अधिकार इतर मानपान करुन दिले. याव्यतिरिक्त बाजीराव परसोजी भोसले, अंबाजी त्रिंबक, लक्ष्मण गोमाजी पूरंदरे, महादजी यमाजी, यशवंत गंगाधर, गुलाबराव जहागिरदार, गदाधर प्रल्हाद, बापूजी सोनाजी दिघे, खंडोबल्लाळ, नारोराम, शेख मिरे, बिसाजी नारायण जाखी, आनंदराव सूमंत व बारामतीकर जोशी इ. प्रसंगी साह्य करुन मदत केली.

बाळाजी विश्वनाथ,रघुजी व फत्तेसिंग भोसले प्रतिनिधी वगैरे मंडळीस छ. शाहू यांनी किती योग्यतेस चढविले ते तर आपण पाहिलेच आहे. वसंतराव कासुरडे, खाजे, मंगोजी हुक्केबहाद्दर व फडतरे हुजऱ्या यांनाही छ. शाहू यांच्या काळी लौकिक मिळाला होता.

यावरुन छ. शाहू महाराज हे उत्तम 'मनुष्य पारखी' होते. त्यांच्या या गुणामुळेच हजारो कर्तबगार माणसे मराठी राज्यास मिळाली व मराठी राज्याचे साम्राज्यात रुपांतर होऊन त्याचे आयुष्यमान वाढले.

### ४.६.१ छत्रपती शाहू महाराज यांचा कुटुंबविस्तार, दिनचर्या व राहणीमानः-

- **कुटुंबविस्तारः-**

भोसले घराणे-शाहू महाराज यांची वंशावळ पुढील प्रमाणे

**भोसले घराण्याची वंशावळ**




छ. शाहू यांना मुलं पुष्कळ झाली, परंतु ती जिवंत राहिली नाही. मुली मात्र जगल्या. राज्याला वारस नाही याची खंत शेवटपर्यंत छ. शाहू यांना होती.

- **दिनचर्या-**

छ. शाहू महाराज यांच्या दिनचर्ये विषयी सरदेसाई गो. स. यांनी सविस्तर माहिती दिली ती पुढील प्रमाणे-

"महाराज पूण्य श्लोक, राज्यभार कारभारी याजवर सोपवून नेमिल्या नेमाप्रमाणे काम करावे. जाजती हुकूमाशिवाय करण्याचा उजूर कोणाचा नाही. आपण जातीने पांढरी तुमान व अंगात कफनी, डोईचे केस लांब सडक, ऊभे राहिले असता घुडगा खाली लावणी पर्यंत, कृष्णवर्ण, तेजस्वी, पालखीत बसून अगर घोड्यावर स्वार होऊन. दहाबारा खिजमतगार; दहा पंधरा मनुष्य जिलिबीची, पुढे दोन स्वार व मागे चिटणीशीकडील कारकून सहित, पसतीस-चाळीस मनुष्य घेऊन अरण्यातील शिकार करुन तीन प्रहर; घटका दोन घटका अलीकडे पलीकडे शिकार साधेल तशा रीतीने वाडयात येऊन आराम करुन, शौचास जाऊन हस्तपाद प्रक्षालन करून, भोजन करावे. नंतर कचेरीस जावे. तेथे प्रात:काळापासोन जी व्यवस्था झाली असेल, ती विचारुन घेऊन, समक्ष येतील त्याचे जाबजवाब घेऊनल दिवटी-सलाम मुजरा झाल्यानंतर कचेरी बरखास्त करुन; राजकारणी कामाची पत्रे पाहून त्यांचे जवाब देण्याविषयी आज्ञा करावी आणि महाली मुक्कामी कामकाजाच्या पत्राचा डौक दररोज पांचसे घावा, त्यांचा झाडा पाहून राहिली असतील त्यासुद्धा पाचशे करून द्यावी, नंतर कारभारीयास रजा द्यावी."[५६]

## ४.७ छ. शाहू महाराज यांचा मृत्यू व अंत्यविधी (इ.स. १७४९): -

मार्ग शीर्ष व।। ३ भृगुवारी पुण्य नक्षत्र शके १६७१ शुक्ल संवत्सरी ता. १५ डिसेंबर स. १७४९ रोजी सकाळी चार घटका दिससास विष्णू लोकवास केला.[५७] सर्वजनास दु:ख झाले प्रजाहितदक्ष, प्रतिपालनकर्ता, पालक, दयावंत थोर राजे शाहू यांच्या प्रकृती ठिक नसल्याने झाला. सर्वाच्या एकविचाराने सकवारबाईस सहगमनास सांगितले इलाज नसल्याने त्याही तयार झाल्या. सहगमनाची सिद्धता करुन हळदकूंकू नाणे दिली. गोप्रदानादि कित्येक प्रकारचे धर्म केले राजश्रीच्या कानातील कुंडलांची जोडी प्रसाद म्हणून सकवारबाईने पेशव्यास दिली आणि दंडकडी जडाव जोड महादजी अंबाजीस दिला. अनेक वाद्ये, घरोघरी हळदकूंकू, समारंभे करूमन, माहुलीस मोठ्या गजरानी दोन लाख मनुष्ये जमा झाली. सहगमन विधी झाल्यानंतर सर्वांनी स्नाने करून शहरात येऊन दीपदर्शन घेऊन श्रीचे अवलोकनाने पूनीत होऊन घरोघरी गेले. आज्ञसाहेबास जेवण घालून, राव, पंत यमाजी शिवदेवही आले नंतर घरी जेवण झाले. यानंतर छ शाहू यांनी सकवारबाई सोबतच दोन नाटकशाळा बरोबर गेल्या त्यांचे दहन

करून नंतर प्रतिनिधी व अष्टप्रधान सर्व मिळून त्यांच्या नावची पाषाणाची लिंग प्रतिमा साळोका घडून वेणाकृष्णा उभयसंगमी वाळूवर लिंग ठेवून त्यांची प्राण प्रतिष्ठा करून स्थापना केली त्याची पूजा अर्चा, नैवेध सेवाधारी मनुष्य नेमून बंदोबस्त केला तो चालत आहे

पुढे गोविंद बल्लाळ यांचे मार्फत महाराजांच्या हस्ती काशी गंगेस वाहिल्या.

अशा पद्धतीने या प्रकरणात छ. शाहू महाराज यांच्या राजकीय व प्रशासकीय कामगिरीचा आढावा घेतला आहे.

छ. शाहू महाराज यांनी प्रतिकूल परिस्थितीत सत्ता (राज्य) ताब्यात घेवून ते यशस्वीपणे चालविले व शंभर वर्ष टिकविले. स्वराज्याचे साम्राज्यात रुपांतर केले. हे करताना त्यांना छ. शिवाजी महाराजांच्या राज्यकारभाराच्या पद्धतीत बदल करावा लागला व परिस्थितीनुसार वागावे लागले. ते अपरिहार्य होते त्यांनी अष्टप्रधान मंडळ पुन्हा जिवंत करण्याचा प्रयत्न केला. परंतु तो अयशस्वी होऊन त्यांना 'संयुक्त राज्यव्यवस्था' किंवा 'मराठा मंडळ' याची निर्मिती करावी लागली व त्याद्वारे मराठ्यांचे राज्य चालवावे लागले. यात काही त्रुटी (दोष) दिसून येतात उदा. सरंजामदारी प्रथा वाढून ती पुढे प्रबळ होवून मराठी राज्याच्या नाशास कारणीभूत ठरली. परंतु यास छ. शाहू महाराज जबाबदार नव्हते तर या सर्वांवर नियंत्रण ठेवणारा त्याच्यानंतर दुसरा छत्रपती झाला नाही. पेशव्यांनी प्रयत्न केला परंतु तो तोकडा पडला.

छ. शाहू महाराज यांनी आपला दैनंदिन राज्यकारभार करताना अनेक तह, करार, वतनपत्रे, सनदा यांचे वाटप केले. अनेक महत्त्वपूर्ण निर्णय घेतले व त्याची अंमलबजावणी केली. तसेच त्यास मनुष्याची पारख असल्याने त्यांनी अनेकांना योग्यतेस आणले व राष्ट्रकार्यास लावले त्यांच्या या वृत्तीमुळे संपूर्ण हिंदुस्थानात मराठी फैलाव झाला. अनेक कर्तबगार घराणी पुढे आली व आजही टिकून आहे.

छ. शाहू यांच्या कारभाराचा स्मरणीय गुण म्हणजे 'परहितासाठी झटने' हा होय. मागील प्रकरणात चर्चा करताना आपणास याचा प्रयत्य येतो. शत्रुसही दया दाखविणारे अनेक संस्थाने, मंदिरे, दर्ग्यास, साधू-संतास दान धर्म करणारे छ. शाहू महाराज हे 'पुण्यश्लोक', 'अजातशत्रू' या संज्ञांनी सुशोभित होतात हेच त्यांच महत्त्व होय.

**संदर्भः-**

१) राजवाडे वि. का. (संपा.), मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड-२०, भा.इ.सं. मंडळ, पुणे, १९१०, ले. ६०, पृ. १९४-१९७.

२) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-४, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ. १८४.

३) भावे वि.ल., मराठी दप्तर रुमाल, भाग-१, मराठी दप्तर कचेरी, ठाणे, १९१७, पृ. ११८.

४) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-३०, गव्हर्नमेंट सेंट्रल प्रेस, मुंबई, १९३२, पृ. २२६, व बेंद्रे वा. सी. राजाराम महाराज आणि नेतृत्वहिन 'हिंदवी स्वराज्याचा मुगलांशी लढा' लोक वाङ्मय गृह, मुंबई, १९७५, पृ. ४३४.

५) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-३१, उपरोक्त, पृ. ११३.

६) वाड गणेश चिमणाजी (संपा.), शाहू महाराज यांची रोजनिशी (मराठी), डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी, पुणे, १९०६, पृ. १५६-१५७.

७) हेरवाडकर र. वि. (संपा.), मल्हार रामराव चिटणीस-विरचित, थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९७६, पृ. ४२.

८) कित्ता, पृ. ४२.

९) फाटक न. र. (अनुवादक), मराठी सत्तेचा उत्कर्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य मंडळ, मुंबई, १९६४, पृ. १००.

१०) पारसनिस द. ब. (संपा.), इतिहास संग्रह-२, तुकाराम जावजी निर्णयसागर प्रेस, मुंबई, १९०९, पृ. १६-१७.

११) जोशी त. ल. (संपा.), राजवाडे लेखसंग्रह, साहित्य अकादमी, १९८४, पृ. १७८.

१२) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, पाप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ. ११९.

१३) वाड ग. चि., तह व करारमदार, पु. वि. मावजी, निर्णय सागर प्रेस, मुंबई, १९१४, पृ. २३.

१४) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. १२०.

१५) सहस्त्रबुद्धे पु. ग., महाराष्ट्र संस्कृती, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, १९७९, पृ. ५०८.

१६) कुलकर्णी अ. रा., खरे ग.ह. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड-२, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, १९८५, पृ. १४.

१७) बेन्द्रे वा.सी., श्री. छत्रपती राजाराम महाराज आणि नेतृत्वहीन 'हिदवी स्वराज्याचा मोगलांशी झगडा' लोक वाङ्मय, मुंबई, १९७५, पृ. ४०४.

१८) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. १४३.

१९) वाड. ग. चि. (संपा.), तह व करारमदार, उपरोक्त, पृ.१-९.

२०) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ.-१६१.

२१) कुलकर्णी अ. रा., खरे ग. ह. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड-२, उपरोक्त, पृ. ५४८.

२२) हेरवाडकर र. वि. (संपा.), थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, उपरोक्त, पृ. ३८.

२३) कुलकर्णी अ. रा., खरे ग.ह. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड-२, उपरोक्त, पृ.-१६.

२४) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. १६३.

२५) कुलकर्णी अ.रा., खरे ग. ह. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड-२, उपरोक्त, पृ. १९.

२६) कित्ता, पृ. २०.

२७) फाटक न. र. (अनुवादक), मराठी सत्तेचा उत्कर्ष, उपरोक्त, पृ. १०९.

२८) कित्ता, पृ. १०९.

२९) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. २३.

३०) फाटक न. र. (अनुवादक), मराठी सत्तेचा उत्कर्ष, उपरोक्त, पृ. ११०-११२.

३१) वाड ग. चि., पारसनिस द. ब. (संपा.), इतिहास संग्रह पेशवे दप्तरातील सनदापत्रातील माहिती, निर्णय सागर प्रेस, मुंबई, १९१७, पृ. ५१८.

३२) कुलकर्णी अ. रा., खरे ग. ह. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड-२, उपरोक्त, पृ. २४.

३३) सहस्त्रबुद्धे पु.ग., महाराष्ट्र संस्कृती, उपरोक्त, पृ. ५१८.

३४) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. १४०-१४१.

३५) वाड. ग. चि., तह व करारमदार, उपरोक्त, पृ. १९७-१९८.

३६) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. १४०-१४१.

३७) साने का. ना. (संपा.), काव्येतिहास संग्रह, ऐतिहासिक पत्रे, याद्या वगैरे, डेक्कन कॉलेज प्रकाशन, पुणे, १९३०, पृ. ३९.

३८) कित्ता, पृ. ४३-४४.

३९) देशपांडे पृ. न., अर्वाचीन भारत, कॉन्टिनेंन्टल प्रकाशन, पुणे, १९७६, पृ.१३.

४०) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. २९९-३०१.

४१) हेरवाडकर र. वि. (संपा.), थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, उपरोक्त, पृ. १५१-१५२.

४२) ओतूरकर रा. वि., आपटे द. वि. (संपा.), महाराष्ट्राचा पत्ररुप इतिहास, भा.इ.स. मंडळ, पुणे, १९४१, पृ. १०८-१०९.

४३) कित्ता, पृ. ११४.

४४) वाड ग. चि., पारसनीस द.ब. (संपा.), इतिहास संग्रह पेशवे दप्तरातील सनदापत्रातील माहिती, उपरोक्त, पृ. २५८.

४५) कित्ता, पृ. २७७-२७९.

४६) कित्ता, पृ. २१९.

४७) वाड. ग. चि. (संपा.), शाहू महाराज यांची रोजनिशी, उपरोक्त, पृ. २०७.

४८) वाड ग. चि., पारसनीस द.ब. (संपा.), इतिहास संग्रह पेशवे दप्तरातील सनदापत्रातील माहिती, उपरोक्त, पृ. २९७.

४९) ओतूरकर रा. वि., आपटे द. वि. (संपा.), महाराष्ट्राचा पत्ररुप इतिहास, उपरोक्त, पृ. १००.

५०) वाड ग. चि., पारसनीस द.ब. (संपा.), इतिहास संग्रह पेशवे दप्तरातील सनदापत्रातील माहिती, उपरोक्त, पृ. १८५.

५१) सरदेसाई गो. स., कुलकर्णी कृ. पा., काळे भा. मा. (संपा.), ऐतिहासिक पत्रव्यवहार, समर्थभारत छापखाना, पुणे, १९३७, ले. २३, पृ. १८.

५२) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तर, खंड-१७, उपरोक्त, पृ. ५२.

५३) बेन्द्रे वा. सी.(संपा.), महाराष्ट्राच्या इतिहासाची साधने, भाग-२, मुंबई मराठे ग्रंथ संग्रहालय, मुंबई, १९६७, पृ. ३४३.

५४) आपटे द. वी., इतिहास मंजिरी, चित्रशाळा प्रेस, पुणे, १९२२, पृ. १८८-१९१.

५५) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-४, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९०/१९१२.

५६) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-४, उपरोक्त, पृ. १८१-१८२.

५७) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-४, उपरोक्त, पृ. १७१.

प्रकरण पाचवे

# छत्रपती शाहू महाराज यांची सामाजिक व सांस्कृतिक कामगिरी

५.१ छत्रपती शाहू महाराजांचे सामाजिक कार्य

५.१.१ वतने, इनामे व देणग्या

५.१.२ लग्ने

५.२ छत्रपती शाहू महाराजांचे विस्तारात्मक धोरण

५.२.१ शाहू नगरची स्थापना

५.२.२ पेठांची स्थापना

५.२.३ पाण्याची सुविधा

५.२.४ फुलबागा व फळबागा

५.३ छत्रपती शाहू महाराजांची सांस्कृतिक व धार्मिक कामगिरी

५.३.१ मंदिरे व वृंदावन बांधणे.

५.३.२ देणग्या, वतने, दानधर्म

५.३.३ सत्पुरुषाची संत-संगती

५.३.४ पशुपक्ष्यांचा सांस्कृतिक ठेवा

छ. शाहू महाराज यांनी साम्राज्य विस्ताराबरोबर राजकीय व प्रशासकीय सुधारणा केल्या. त्याचप्रमाणे त्यांचे व्यक्तीमत्त्व अजून खुलून उठते ते त्याच्या सामाजिक व सांस्कृतिक कामगिरीमुळे.

छ. शाहू महाराजाने आपला साम्राज्य विस्तार खूप मोठ्या प्रमाणात केला. तसेच त्यांनी राजकीय व प्रशासकीय सुधारणा केल्या. शाहू महाराजांनी केलेली सामाजिक व सांस्कृतिक कामगिरी वाखणण्याजोगी होती.

शाहू महाराज गादीवर बसले तेव्हा महाराष्ट्रात प्रेक्षणीय असे स्थळ निसर्गाशिवाय दुसरे काहीही नव्हते. राज्याची धुरा धारण करण्यास पेशवे समर्थ असल्याचे दिसून आल्यावर शाहू महाराजांनी राज्यकारभार त्यांच्या अंगावर टाकला व आपला फुरसतीचा वेळ, आपली राजधानी, आपला राजवाडा, आपले बागबगीचे, शिकारखाना व दरबार ही बादशाही थाटावर शृंगारण्याकडे लावला. महाराष्ट्राच्या सुधारणेची मुहूर्तमेढ प्रथम शाहू महाराजांनी रोवली. मोगलांच्या दरबारी त्यांचे पूर्वायुष्य गेलेले व पुढे साताऱ्यास आल्यावर त्यांनी बेचाळीस वर्षे राज्यपद भोगलेले या कारणाने त्यांचा विविध प्रकारच्या गुणीजनांशी संबंध येऊन अनेक सुंदर, भव्य व रमणीय वास्तुंचे दर्शन त्यास घडून त्यांची रसिकता व गुणग्राहकता बहुविध अंगानी सजविण्याचे श्रेय संपादिले.

## ५.१ छत्रपती शाहू महाराजांचे सामाजिक कार्यः-

शिवकालीन जी सामाजिक परिस्थिती अस्तित्वात होती तीच पुढे शाहू महाराजांच्या काळात होती. समाज हा अनेक जातीमध्ये विखुरलेला होता. पण शाहू महाराजांच्या बुद्धित जातिभेद, धर्मभेद वगैर संकुचित भावना बिलकुल नव्हती. त्यांची बुद्धि निर्मल जलाप्रमाणे निष्पाप होती. समता व बंधुता ही आजकालची उच्च तत्त्वे शाहूंच्या इतकी दुसऱ्या कोणी पूर्वी कारभारात पाळलेली आढळणार नाहीत.[१] म्हणूनच 'पुण्यश्लोक', 'अजातशत्रू' अशा संज्ञांनी तत्कालीन लेखक त्यांचे वर्णन करतात हे योग्यच आहे.

छ. शाहू महाराजांनी समाजातील सर्व जातींची व सर्व वर्गातील हजारो कुटुंबे शाहूच्या प्रोत्साहनाने पुढे आली. प्रत्येक व्यक्तींना त्यांनी योग्य वागणूक दिली. जे चांगले असतील त्यांना पुढे आणले व जे योग्य नाहीत अशांना त्यांनी दूर ठेवले याबबाबत साने म्हणतात, ''सर्व आज्ञेत बागवान नवीन मोठी माणसे निर्माण केली, वाढविली. जुनी

माणसे अनुकूल जाली त्यांची पदे व त्यांस सन्मान सरंजाम इनाम देऊन चालविले. जी चांगली माणसे व पोख्त शहाणे त्यांचे मसलतीने चालावे. विश्वासू सेवक लोक यांवर विश्वास ठेवून सर्व कार्य त्यांचे हाते घ्यावी. लघु मनुष्य अथवा दुर्व्यसनी, कैफी, दारुबाज यांस समीप न ठेविता मुत्सद्दी लोक प्रधान, प्रतिनिधी व सेनापती आदिकरुन अष्टप्रधान व दरखदार यांचे हाते कारभार व सुभै सांगून चालविले.''[२]

छ. शाहू महाराजांच्या वेळेस समाजामध्ये सरंजामदार व जहागीरदार मोठ्या प्रमाणात उदयास आले होते. छ. शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीत सरंजामी पद्धती व जहागीरदार यांची वाढ होऊ न देण्यासंबंधी विशेष खबरदारी घेण्यात आली होती. पुढे राजारामाच्या वेळी सरंजाम शाही पद्धतीचा तत्कालीन मुत्सद्यांना अवलंब करावा लागला आणि शाहूच्या वेळी आपसांत माजलेल्या यादवीतून मार्ग काढण्यासाठी कोल्हापूरकर व सातारकर या दोघांनीही ही ती वाढविली. तथापि त्याकाळी सरंजामी पद्धती एका दृष्टीने राज्याभिवृद्धिस आवश्यक होती असें कै. रा. व. गणपतराव जोशी यांचे मत होते.[३]

शाहू महाराजांनी समाजातील मुस्लिम लोकांबरोबर योग्य वागणूक ठेवली. हिंदू-मुसलमानांमध्ये द्वैतभाव शाहूच्या अमदानीत केव्हाही उत्पन्न झाला नाही. त्यांनी मुस्लिम लोकांना सुद्धा आदराची वागणूक दिली. तसेच ख्रिस्ती धर्मीयासही त्यांचा आश्रय असाच समभावाचा होता. वसई घेतल्यावर कोकणातील ख्रिस्ती वाद्यांचा शाहूने उच्छेद केला नाही. उलट त्यांचा योग्य परामर्ष घेतला मानवी समता त्याच्या स्वभावातच भिनलेली होती. मनुष्य येथून तेथून सर्व सारखे, उच्चनीच कोणी नाही ही त्याची समजूत पदोपदी व्यक्त होत असे.

पूर्वी समाजातील विस्कळीत प्रसंगी चांगली माणसे, मातबर लोक परराज्यात गेले होते. ते प्रयत्नाने सेवेत आणले व त्यांचे बंदोबस्त करुन ठेविला. समाजातील गोरगरीब उभे राहिले असता, स्वारीत पालखी उभी करुन अगर मजालसींन ऐकूण घेऊन समक्ष आज्ञा लागलीच सांगावी. त्याचप्रकरणाकडे सांगावयाचे असेल ते त्यांजकडे सांगून पुन: ऐकून घ्यावे. तालुकदार सुभेदार यांजकडील असेल ते त्यांजकडे सांगावे.[४] यावरुन त्यांचा गोरगरिबांविषयी दृष्टिकोन दिसून येतो.

छ. शाहू महाराज स्वत: मोठे मुत्सद्दी अगर कल्पक नव्हते, पण हे गुण ज्यांच्या ठिकाणी होते, त्यांस त्यांनी उपयोगात आणले. त्यांना गुणी लोकांची पारख होती. रयतेच्या आबादानीकडे शाहूंचे लक्ष नेहमीच विशेष असे. ओसाड प्रदेशाची वस्ती करणे, धामधुमीच्या प्रसंगी रयतेस सवलती देणे, वाढलेली धारा (कर) कमी करणे, नवीन धारेबंदी करुन देणे, अशी कामे शाहूंनी पुष्कळ केली. त्यानें जुलूम करणाऱ्या समाजातील प्रत्येकांना समज दिला. तो कोणीही असला तरी त्याची गय केली जात नसे. एका ठिकाणी त्यांनी त्याच्या बहिणीचा नवरा शंकराजी महाडिक तारळेकर यांनी आपल्या इनाम गावास रयतेवर जुलूम केला, त्याचा निषेध करुन जरब दिल्याबद्दलचे पत्र आहे त्या पत्रात 'ऐसा वतनदारीचा पेशा नर्मदेपासून रामेश्वरापर्यंत नाही. रयत चोराची नव्हे' अशी झणझणीत वाक्ये त्यांत आहेत.[५] यावरुन त्यांचा रयतेविषयी दृष्टिकोण दिसून येतो.

### ५.१.१ वतने, इनामे व देणग्या:-

छ. शाहू महाराजांनी समाजातील ज्यांनी योग्य कार्य केले अशा सर्व लोकांना वतने, इनामे व सनदा दिल्या. आज वावरणारी घराणी, इनामे, उत्पन्ने बहुतेक शाहूकालीन असून त्यांचाच ठसा महाराष्ट्रावर कायमचा उमटलेला दिसतो. भिन्न प्रवृत्तींच्या व भिन्न लायकीच्या व्यक्तीस एका कार्यक्रमात घेऊन त्यांच्याकडून योग्य कामगिरी घेणे हे अवघड काम शाहू इतके दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीने सिद्धीस नेले नसेल. शाहूने दिलेल्या वतने, इनामे, सनदाच आपल्यापुढे हजारांनी मोजण्यासारख्या असून त्याच सनदा महाराष्ट्राच्या कर्तबगारीची साक्ष पुरवितात. शाहू महाराजांनी हिंदू-मुस्लिम या दोनीही समाजातील लोकांना वतने, इनामे दिली.

शाहू महाराजांनी संताजी बिन कान्होजी पासलकर यांना ता. २७ मार्च १७३१ रोजी दिलेले इनाम पुढील प्रमाणे आहे-

''राजा शाहू छत्रपती यांनी संताजी बिन कान्होजी पासलकर यास पत्र लिहिले त्यात म्हटले की, तुझे वडील विशाळगडाच्या स्वारीवर ठार झाले. तुझा संसार सुरळीत चालण्यासाठी, मौजे मुगाव व मौजे गडले या गावची मांवले पेसजीची जमीन इनाम देत आहे तरी ही जमीन तुझ्या नावावर करुन घेऊन तू व तुझे मुले सुखरुप रहा''[६] असे शाहू

छत्रपतींनी म्हटले आहे. यावरुन असे समजते की, स्वराज्यासाठी ज्यांनी आपले प्राण वेचले अशा लोकांच्या मुलासाठी शाहू महाराजांनी इनामे दिली.

श्री शाहू महाराजाने खंडेरावास सर मोकादमीचे वतन करुन दिले होते ते पुढील प्रमाणे, "इ. स. १७०८ मार्च १७ मध्ये शाहू छत्रपतींनी सुभेदारास जुन्नर व माहवि पत्र लिहले त्यात त्यांनी म्हटले आहे की, सर श्री कदमीचे वतन राजश्री खंडेराव दाभाडे यास अजरामहायत करार करुन दिले आहे. ते सुरळीतपणे घालवावे."[७] यावरुन शाहू छत्रपतींचे वतनाकडे जाणीवपूर्वक लक्ष होते. हे या पत्रावरुन दिसून येते.

समाजामध्ये याकाळात सतीची चाल अस्तित्वात होती. त्याकाळात शाहू महाराजांनी सतीच्या वृंदावणास देणगी दिली होती. हे पुढील पत्रावरुन समजते. हे पत्र इ.स.१७१५-१६ च्या दरम्यानचे आहे.

"श्री. शाहूराजे यांनी राजश्रीऐवजी शिरके यांना विदित केले की, अंबिकाबाई गुणाजी मोहिते ही आपली कन्याच आहे. तिने सतिच्या चालीरिती प्रमाणे अग्नि प्रवेश केला. तिचे वृंदावन मौजे एरड, पाटण येथे आहे. परंतु त्या ठिकाणी फुलझाडे व बाग करावयाच्या दृष्टीने त्या गावातील पडिक जमीन इनाम दान दिली आहे. त्यांचा योग्य वापर करुन बगीचा व झाडे लावण्यास सांगण्यात आले."[८] या पत्रावरुन शाहू महाराजांचा स्त्रीविषयक दृष्टिकोन दिसून येतो.

शाहू महाराजांनी अनेक इनामे, सनदा दिल्या होत्या. इ.स. १७२१ या वर्षी प्रांत मिरज येथील देशमुखी सनद पिराजीराव यांचे नावे करुन दिली, तसेच शाहू महाराजांनी व्यंकटरावास इ.स. १७२२ त शिराढोण हा गांव इनाम दिला. व्यंकटराव वारल्यावर त्यांनी व त्यांच्या वडिलांनी राज्याची कशी सेवा केली हे लक्षात घेऊन शाहूने अनुबाई ही बाळाजी विश्वनाथ यांचे कन्या इकडेही लक्ष घेऊन महाराजांनी आता तो संबंध आजरे महाल अनूबाईस इनाम करुन दिला. मोकासा हा सरंजाम असतो अगर इनामही असते, परंतु ते सरकाराने काढून घेण्यास पात्र असल्यामुळे त्यास स्थायिकपणे कमी असतो. इनामाची गोष्ट तशी नाही. ते इनामदाराचे पुत्रपैत्रादि वंशपरेपरेने उपभोगावे म्हणून दिलेला असतो. ही गोष्ट लक्षात घेतली असता शाहू महाराजांनी अनुबाईवर व तिच्या वंशजांवर केवढा उपकार केला हे ध्यानांत येईल.[९]

सेवक लोकांनी जशी सेवा, राजकार्ये केली त्याप्रमाणे त्या लोकांना शाहू महाराजांनी बक्षीसे, इनामे व जमिनी नावे करुन दिल्या. समाजात असणारे भाट, गवई, वाजंत्रीवाले, गुरव, नटवे यांस वतनें दिल्याची नावानिशी पत्रे आहेत. छ. शाहू महाराजांनी समाजातील प्रत्येक लोकांना इनामे, वतने, परगाणे करुन दिली. ज्यांनी स्वराज्यासाठी सेवा केली, ज्यांनी समाजासाठी योग्य कार्य केले अशा लोकांना त्यांनी इनामे व वतने दिली.

### ५.१.२ लग्नेः-

यावेळी भारतीय समाजात लग्न ही सार्वत्रिक सामाजिक रीत होती. विवाह कुटुंबाकडून ठरविले जात. सामाजिक आदर्शात लग्न हे स्त्रीच्या जीवनाचा आवश्यक भाग मानला जाई आणि म्हणून आई वडिलांना मुलींचे विवाह योग्य वयात करावे लागत. मराठेकालीन लोकांच्या दैनंदीन जीवनात लग्न म्हणजे आनंदाचा व धावपळीचा क्षण. सर्व नातेवाईक व गावकरी एकत्र येण्याचा समारंभ. लग्नाचे दिवस उत्साहाचे, कौतुकाचे व आठवणींचे असत. लग्नाला दैनंदीन जीवनात महत्त्वाचे स्थान होते.

छ. शाहू महाराजांना सरदाराची किंवा नोकराचाकरांची लग्ने जुळवून ती स्वत: सिद्धीस नेण्याची त्यांना मोठी हौस वाटे व आपल्या जवळच्या मंडळीच्या मुला-मुलींची लग्ने आपण जुळवून ती आपल्या खर्चाने आपल्या देखत पार पाडण्याची महाराजांना आवड होती.

छ. शाहू महाराजांनी अनेक लग्ने लावून दिली होती. महाराजांना मुलगा नव्हता. त्यांच्या मुलीचे लग्न हे मोठ्या हौसेने त्यानी पार पाडले. साने म्हणतात, ''महाराजांना संतानवृद्धी झाली नाही. लग्नसमारंभ मोठा करावा असे मनात येऊन गजबाई यांचे लग्नाचा निश्चय समारंभ बहुत तरतूद दहा लक्ष रुपये खर्चाविसे करुन मंडप, बादली व साहित्य कारखाने तरतूद जाबने करुन सर्व अष्टप्रधान व सरदार नाभी संस्थांनीक व मांडलिक राजे बोलावून सर्वांस येतील त्यांच्या साहित्यास व पदरचे व नगरचे लोक सर्वांस साहित्य जे त्यास पदार्थ पाहिजेत तैसे पावावे ऐसे समारंभ करुन केले. पुण्याहवाचनादि सभा करुन उभयता राण्या दोहीकडे बसवून आपण केले. ते समयी जरी मंडपास मोतियांचे घोस असावे. अष्टप्रधान व सर्व मातबर सरदार सर्वही संपन्न लक्षावधीचे जवाहीर व पोषाक अंगावर ऐसे मुत्सद्दी व सरदार पाच सातशे शिवाय

आणखी मातबर लोक मंडपात मजलास जाली, ते केवळ इंद्रभुवनाहूनही अधिक गुणिजन दहा हजार, वीस हजार रुपये देऊन आणविले व वाद्ये फारच ते समयी अद्वितीय समारंभ जाला. ऐसे लग्न केले.''[१०]

नानासाहेब पेशव्यांचे लग्न रास्त्यांच्या मुलीशी शाहू महाराजांनी जुळविले. शाहू महाराजांनी वाड्यातील लिंगूबाईच्या लेकास केदारजी केसरकर याची कन्या ठरवून त्यांचे स्वत:हजर राहून त्यांनी लग्न केले. याबाबत पुढील पत्र उपलब्ध आहे.

''विनंती राजश्री केदारजी केशरकर याची कन्या वाडियांतील लिगुबाईच्या लेकास राजश्री स्वामीनी आत्याग्रहे मागून देविले हे वर्तमान तपसिले पहिले लिहिले होते. प्रस्तुत गुरुवारी लग्न जाहले. राजश्री स्वामी व समस्त सरकारहून अश्वगजसहित मोठ्या समारंभ लग्नास गेले होते त्यावर काळी भृगुवारी सौ. मातोश्री बाईसाहेबही गेल्या होत्या व राजश्री स्वामीही भोजनास गेले होते. भोजन केले.विदित व्हावे  यास्तव लिहिले असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.''[११] असे शाहू महाराजांने जुळविलेल्या लग्नाचे प्रकार फार आढळतात.

छ. शाहू महाराजांनी गोर-गरीब अशा अनेक जनांचे लग्न करुन दिले. लग्नकार्यासाठी शाहू महाराजांनी सढळ हाताने प्रत्येकाला मदत केली.

### ५.२ छ. शाहू महाराजांचे विस्तारात्मक धोरण:-

मोठी शहरे व टुमदार गावे वसविणे हे देश सुधारणेचे व विस्तारात्मक कार्य होय. शिवाजी महाराजांच्या वेळी मराठ्यांची राजधानी किल्ल्यावर होती. शाहू महाराज साताऱ्यास आले, तेव्हाही सातारच्या किल्ल्यातच ताराबाई राहत होती. सातारा शहर वसवून त्यात किल्ला सोडून येऊन राहण्याची सुरुवात शाहू महाराजांनी केली. शाहू महाराजांनी आपल्या विस्तारात्मक दृष्टिकोनातून शाहू नगराची स्थापना केली. तसेच तिथे सर्व सोयी सुविधा उपलब्ध केल्या. त्यांनी अनेक वाडे बांधले.

### ५.२.१ शाहू नगराची स्थापना:-

शाहू नगराची रचना व त्यातील भागांची नावे शाहू छत्रपतीच्या अमदानीची आठवण करुन देतात. राजकीय महत्त्व संपले तरी मराठे शाहीची सुविख्यात राजधानी म्हणून साताऱ्याचा अभिमान महाराष्ट्रीयांना वाटतो. शाहूनगरची स्थापना इ.स. १७२१

च्या सुमारास झाली. छ. शाहूच्या ता. २८ मार्च १७२१ च्या पत्रात तातडीने वाडा बांधल्याचा उल्लेख आहे. शाहूच्या व पेशव्यांच्या आरंभी भेटी होत त्या रोजनिशीत नोंदलेल्या आहेत, त्यावरुन शहराच्या रचनेचा भाग लागतो. इहिदे अशरीनच्या सफर महिन्यात म्हणजे इ.स. १७२० च्या डिसेंबरात शाहूची भेट बाजीरावाने सातारा किल्ल्यावर घेतली. त्यानंतर सात आठ महिन्यांच्या भेटी माची किल्ले सातारा येथे झालेल्या आहेत. त्यापुढे इसन्नै अशरीनच्या जिल्काद महिन्यांत म्हणजे इ.स. ऑगस्ट १७२१ त शाहूनगरनजीक किल्ले सातारा येथे बाजीरावाने शाहूची भेट घेतली, असा उल्लेख आहे. अर्थात इ.स. १७२१ च्या सुमारास शाहूनगरची स्थापना झाली. राजधानीतल्या या भेटी शाहू तख्तावर बसून घेई.[१२]

शाहू नगरालाच हल्ली सातारा असे म्हणतात. शाहू महाराजांनी येथे स्वत:करीता दोन राजवाडे बांधले. यौतेश्वराहून नळ बांधून पाणी आणले. जागजागी हौद व तलाव बांधले त्यांनी जास्तीत जास्त शाहूनगराच्या वैभवामध्ये भर घालण्याचे प्रयत्न केले.

शाहूनगराची रचना व प्रतिष्ठा शाहू नजरेखाली पुष्कळ वाढली. व्यापार उद्योग वाढला. नवीन सावकार निर्माण झाले. सुखानंद, सुमेरगिरी गोसावी, बनसीपुरी अशा परदेशी सावकारांची वस्ती सुरु झाली. पेशव्यांचा बाह्योद्योग पसरत गेला, त्या बरोबर उत्तरेकडचे हिंदी लोक, वकील, रजवाडे, हून्नरी कलावंत अशी अनेक माणसे दक्षिणेत आल्यामुळे देशातील दळणवळण वाढून महाराष्ट्राचे जीवन विस्तारले.[१३] त्याचबरोबर त्यांनी शाहूनगरचे वैभवसुद्धा विस्तारले.

छत्रपती शाहू महाराजांनी शाहू शहरामध्ये तख्ताचा वाडा, रंगमहल, पिलखाना, अदालत वाडा, बेगम मशीद अशी वेगवेगळ्या इमारतीची निर्मिती केली.

**अ) तख्ताचा वाडा:-** हल्ली जेथे शाहू उद्यान आहे तेथे छत्रपती शाहूचा वाडा होता. येथे त्यांचे सिंहासन होते. म्हणून त्यास तख्ताचा वाडा म्हणत. जवळच लागून असलेल्या विहिरीस तख्ताची विहिर म्हणत. सध्या एक तटबंदीची भिंत व वाडयाच्या भिंतीचा अवशेष आढळतो.[१४]

**ब) रंगमहल :-** रंगमहल ही वास्तू अदालतवाड्याच्या पूर्वेस सुमारे २०० मी अंतरावर आहे. मूळ इमारत ३० मी. लांब व १५ मी. रुंद असून तिला ४५ मी. रुंदीची

नवीन इमारत जोडून बांधली आहे. मूळ इमारत तीन मजली होती. शाहूच्या राण्यांचा राणीवसा येथे होता म्हणून या इमारतीस रंगमहाल असे नाव देण्यात आले. येसूबाई याच वाड्यात राहत असत. इ.स. १८७४ मध्ये वास्तूस लागलेल्या आगीत ती भस्मसात झाली होती. ती नंतर दुरुस्त करण्यात आली. सध्या या इमारतीचा अर्धा भाग कूपर कारखान्याच्या ताब्यात आहे. इमारतीसमोर सेनापतीचा वाडा होता.[१५]

**क) पिलखाना:-** रंगमहालाच्या उत्तरेस दोन शाखा असलेली आयताकृती इमारत आहे. त्यातील पुढील एका इमारतीचा वापर राजाचे हत्ती बांधण्यासाठी केला जात असे.[१६]

**ड) अदालत वाडा:-** किल्ल्याच्या पायथ्याशी बोगद्याकडे जाणाऱ्या रस्त्यावर शाहू महाराजांच्या कालावधीपासून अस्तित्वात असलेल्या वास्तूचा महाराज न्यायालयासारखा उपयोग करीत. नंतर पेशव्यांच्या काळात तिचा खाजगी वापरासाठी उपयोग होई. ही मोठ्या दगडात बांधलेली इमारत ६७.५ मी. लांब व ४८ मी. रुंद आहे. इ.स.१८७६ पर्यंत या इमारतीचा दिवानी न्यायालय म्हणून उपयोग होत असे. त्यानंतर मात्र नवीन राजवाड्याचा वापर न्यायालयासाठी होऊ लागला. आता अदालत वाडा सातारा राजकुळाचे वस्तीस्थान आहे.[१७] पुरंदऱ्यांचा वाडा त्याच्या शेजारी होता.

**इ) बेगम मशीद:-** औरंगजेबाची मुलगी बेगम झीनत उन्निसा हिने छ. शाहूचा चांगला सांभाळ करुन त्याचे धर्मांतर होऊ दिले नाही. झिनत उन्निसा बेगम इ.स.१७२१ ला वारली. म्हणून तिच्या स्मरणार्थ शाहू महाराजांनी अदालत वाड्याच्या जवळच झीनत उन्निसा बेगमच्या स्मरणार्थ एक मशीद बांधली. ती अदालत वाड्याच्या जवळच होती. आज त्या वास्तुचे जोते आहे. त्यावर नवीन मशीद उभारली आहे.[१८]

सातार्‍यात म्हणजेच शाहूनगरमध्ये अनेक वाडे बांधण्यात आले होते. अक्कलकोटकरांचा वाडा, मंत्र्याचा वाडा, शिर्के यांचा वाडा, पंडितरावांचा वाडा तसेच मंगळवार पेठेत छ. शाहूची चौथी राणी सगुणाबाई हिचा वाडा होता. तो धनिणीचा वाडा या नावाने प्रसिद्ध होता. प्रतिनिधीचा वाडा वगैरे शाहूच्या वेळच्या स्थळांचे थोडे बहुत अवशेष विद्यमान आहेत.

### ५.२.२ पेठांची स्थापनाः-

छ. शाहू महाराजांनी शाहूनगर स्थापन करुन अनेक इमारती व वाडे बांधले होते. शाहू महाराजांनी पुढे पेठा निर्माण केल्या जेणे करुन लोकांना कुठलेही स्थळ शोधण्यासाठी सोपे जावे यासाठी आज सुद्धा प्रत्येक शहरामध्ये वेगवेगळ्या पेठा वेगवेगळ्या नावानें ओळखल्या जातात. शाहू महाराजांनी या पेठांना वेगवेगळे नावे दिले.

शाहू महाराजांनी शहरातील पेठांची नावे ही ऐतिहासिक व्यक्तीवरुन पाडली आहेत. यादव गोपाळ पेठ, व्यंकटपुरा, चिमणापुरा, दुर्गापुरा, केसकरपेठ, राजसपुरा, रघुनाथपुरा इत्यादी नावे दिले. शहरातील पेठांची नावे सात वारांवरुन ठेवली.

चिमणाजी दामोदर म्हणून शाहूचा सरदार होता त्याची जागा साताऱ्यास होती. त्या जागेस चिमणपुरा असे नाव मिळाले. विष्णू विश्वनाथ पंडित हा शाहूची पत्नी राणी सगुणाबाईचा खाजगी कारभारी होता. त्याच्याच विद्यमाने धावडशी येथील भार्गवराम मंदिर वास्तुचे काम झाले. शाहूस सगुणाबाईपासून एक मुलगी झाली. तिचे नाव राजसबाई. तिच्या नावावरुन साताऱ्यातील राजसपुरा पेठेस हे नाव मिळाले.[१९] यादव गोपाळ खटावकर नावांचा ताराबाईचा कारभारी शाहूजवळ पहिला मुख्य कारभारी म्हणून राहिला. त्यांच्या नावावरुन साताऱ्यास एक पेठ वसलेली आहे. या पेठेस पेठखालसा असेही म्हणत. सातारा शहराच्या उत्तर बाजूस 'रघुनाथपुरा' नावाची पेठ हल्ली करंजे गावात मोडते. ती बाजीरावाचा मुलगा रघुनाथ याचे नावावरुन पडली. मल्हारपेठ व दुर्गापेठ ही नावे कोणाच्या नावावरुन पडली ते समजत नाही. बसमत पेठ व केसरकर पेठ[२०] अशा वेगवेगळ्या पेठा शाहू महाराजांनी वसविल्या.

सोमवार पेठ, मंगळवार पेठ, बुधवार पेठ, गुरुवार पेठ, शुक्रवार पेठ, शनिवार पेठ व रविवार पेठ असे सात वारावरुन ठेवले. प्रत्येक पेठेमध्ये त्यांच्या महत्त्वाच्या व्यक्तीचे वाडे होते. यावरुन त्याचा विस्तारवादी धोरण दिसून येते.

### ५.२.३ पाण्याची सुविधाः-

सातारा येथे त्यांनी पाण्याची सोय केली. तसेच सामाजिक दृष्टिकोनातून त्यांनी अनेक ठिकाणी तलावे, हौदे बांधले जेणे करुन सर्व सामान्य माणसांना पाण्याची सोय होईल ही दूरदृष्टी त्यांनी ठेवली.

यवतेश्वराहून व महादऱ्याहून नळाद्वारे उत्तम पाणी आणून साताऱ्यास भरपूर पाण्याची व्यवस्था शाहूच्या वेळेपासून करण्यात आली होती. माहुलीजवळ एक पाणपोई लोकास पिण्याचे पाणी मिळण्याकरिता ठेविलेली होती. त्या जागेस पोईचा माळ म्हणत.[२१]

पुणे-सातारा या मराठ्यांच्या राजधान्यांना पाणी पुरविण्याची कामे पेशवे व छत्रपती यासारख्यांनी हाती घेतली व शेवटास नेली. जे गावे कृष्णा, गोदावरी, प्रवरा, भीमा, कोयना, इंद्रायणी या लहान-मोठ्या नद्यांच्या काठी असत त्यांना त्याच नद्यांचे पाणी त्यांच्याकरिता विशेष व्यवस्था करण्याचे कारण नसे. पेशवाईत या कामासाठी वेगळी खाती नव्हती. कामे उदार व परोपकारी धर्मात्मे स्वत:च्या खर्चाने तलाव-विहिरी वगैरे बांधीत किंवा गाव अथवा गावातील प्रमुख लोक पुढाकार घेऊन स्वत:च्या जोखमीवर गावाची सोय करीत. मात्र त्यांना या कामी जो खर्च आला असेल त्याचा वाटा सरकारात मागितला असता तो त्यास मिळे.[२२]

ब्रम्हेंद्रस्वामी या धर्मात्मांनी सातारा व पुणे या प्रांतात पाण्याचे दुर्भिक्ष पाहून किती तरी ठिकाणी विहिरी, तलाव हजारो रुपये खर्चून बांधले आहेत. इंदापूर, नातेपुते, यवत, माळशिरस या भागांत हल्लीप्रमाणे तेव्हाही पर्जन्य कमी पडून पाण्यावाचून माणसांचे व गुराढोरांचे हाल होत असत. ते न पहावून स्वामींनी विहिरी, बारव व तलाव बांधले.

साताऱ्यामध्ये तसेच आजूबाजूच्या प्रदेशामध्ये शाहू महाराजाने मोठ्या प्रमाणात पाण्याच्या सोयी उपलब्ध करुन दिल्या. तसेच ब्रम्हेद्रस्वामी या सत्वपुरुषांनी सुद्धा पाण्याच्या सोयी पुरविण्याचा प्रयत्न केला.

### ५.२.४ फुलबागा व फळबागा :-

छत्रपती शाहू महाराजांना सर्वात महत्त्वाचे म्हणजे त्यांना फळाच्या बागा व फुलबागा तयार करण्याची मोठी हौस होती. सातारा व इतर परिसरामध्ये अनेक ठिकाणी त्यांनी फुलबागा व फळबागा लावल्या. या संदर्भात अनेक पत्र उपलब्ध आहेत. या वरुन त्यांची माहिती कळते. शाहूने करंजे येथे बागा लावल्या विविध प्रकारची फळझाडे व फुलझाडे येथे होती.

नारिंगीची रोपे व इतर फळांच्या बागा तयार करण्याची शाहूंना भारी आवड होती. या संदर्भात एक पत्र आहे, ''दरसाल शिवापुरच्या अंब्याच्या कोया वीस हजार लावावयास नेत्या. त्या कोणे जागी किती झाडे लावली. त्याचा जाबता पाटलाच्या मार्फत तयार करुन पाठविणे. पुणे देशात आंबराया नाहीं त्या करवणें म्हणोन आज्ञा केली आहे.''[२३] त्यांनी इतर ठिकाणच्या आंबराया बाबत स्वत: लक्ष ठेवत असे दिसते.

स्वामींना राजाप्रमाणे सर्व प्रकारच्या ऐश्वर्याचा व ऐषआरामांचा हव्यास होता. अशा या चौकटीने एकमेकांच्या सहकार्याने महाराष्ट्रास वृक्षवेलींनी नटवून, पुष्पगंधाने दरवळून व विविध वर्णांनी रंगवून रमणीयत्व आणले. या दृष्टीने शाहू महाराजांच्या रोजनिशीतील खालील उतारा वाचनीय आहे. त्यातील मजकूर बाजीरावास उद्देशून लिहिला आहे.

''राजश्री प्रधानपंत यांस-हर जिन्नस झाडें औरंगाबादेहून आणविली आहेत. तरी आपणाकडील कमाविसदारास ताकींद पत्र देऊन गावगन्ना वेढे बरोबरी देऊन झाडे हुजूर पावते करणे झाडे तपशील- विही, शेव, अळू, राफताळू, बेदाणा, नाशपाती, गलगल, चकोतरा, कौला, संगतरा, कमरंद, फणस, बदाम, फुलझाडे- केतकी, बटमोगरा, सुरुव, बनमजसळी.''[२४] महाराष्ट्रातील पूर्वी संतानी सांगितले होते, वृक्षवेली वेली आम्हा सगे सोयरे, वनचरे, अशा पद्धती शाहू महाराजांनी कामे केले आहे. आज ते काम देशातील व महाराष्ट्रातील राजकर्ते करत आहे, झाडे लावा देश वाचवा याचा उगम शाहू महाराज राज्यकर्त्यांनी केला.

छ. शाहू महाराजांनी बाजीरावांमागे झाडे लावण्याचा तगादा लावला. त्यामुळे जेथे झाडांची रोपे आहेत. तेथून ती रोपे आणणे हे बाजीरावांचे एक कर्तव्य होऊन बसले. अशा प्रकारे औरंगाबाद व इतर ठिकाणांहून झाडे आणण्याचे कार्य बाजीराव तसेच थोरल्या माधवरावांच्या कारर्किदीत सुद्धा चालूच होते. सातान्यात येथे पाण्याची सोय जेथे असेल तेथे त्यांनी बागा उभारल्या. उदा. ईशान्य दिशेस कृष्णा काठी असलेल्या आटळे या गावाजवळ बाग उभारुन तेथे वेगवेगळ्या झाडांची लावणी केली.

## ५.३ छ. शाहू महाराजांचे सांस्कृतिक व धार्मिक कामगिरी:-

शाहू महाराजांनी ज्या प्रमाणात सामाजिक कार्य केले. त्याचप्रमाणे त्यांनी सांस्कृतिक व धार्मिक कार्य केले. शाहू महाराजांनी मौजे वडू येथील संभाजीचे वृंदावन, संगम माहूली येथे येसूबाईचे वृंदावन बांधले व अशाच पूर्वजांच्या व कुटुंबियांच्या आठवणीची यथायोग्य व्यवस्था शाहूने बांधून दिली. याबाबत अनेक पत्रे उपलब्ध आहेत. उत्तर दक्षिण प्रदेशांचे दरम्यान सांस्कृतिक देवघेव झपाट्याने चालून महाराष्ट्रांचे जीवन पुष्ट व समृद्ध बनले. अनेक ठिकाणी मंदिरे बांधली. राष्ट्राचा मुख्य पुरुष या नात्याने शाहू महाराज सर्वांचा परामर्ष घेत असत. त्यांच्या सुखदु:खात सहभागी होत असत. सण, उत्सव या सांस्कृतिक कार्यात भाग घेत असत.

अनेक जीर्णोद्धार, धर्मदान केले, देणग्या दिल्या. त्यांनी आपली संस्कृती जपण्याचा प्रयत्न केला. पशुपक्ष्यांचा सांस्कृतिक ठेवा त्यांनी ठेवला. शाहू महाराजांनी हिंदू व मुस्लिम अशा दोन्ही समाजातील सत्पुरुषाची सेवा केली. त्यांनी प्रत्येक धर्मातील लोकांच्या मंदिराला देणग्या दिल्या.

### ५.३.१ मंदिरे व वृंदावन बांधणे:- अ) कृष्णेश्वरमंदिर-

हे प्रसिद्ध मंदिर शाहू महाराजांच्या कालखंडामध्ये बांधले गेले. हे देवालय पहिल्या बाजीराव पेशव्याचा मामा (सासरा) कृष्णाजी चासकर याने तो सातारचा मामलेदार असताना शहराच्या पश्चिम टोकास यवतेश्वराच्या पायथ्याशी शके १६४५ (ता. २७ जानेवारी १७२४) मध्ये बांधले. तेव्हा या भागास सदाशिवपुरा असे नाव होते. ते मंदिर बांधल्यावर पाच वर्षांनी व्यंकटराव घोरपडे या भागात वाडा बांधून राहू लागले. तेव्हापासून यास व्यंकटपुरा नाव प्राप्त झाले. या देवालयात गाभाऱ्याच्या बाहेरील दगडी स्तंभावर खालील शिलालेख आहे-

> "श्रीकृष्णेश्वर नामक पशुपतेलिंगंशिवंनार्मद
> ज्योतिर्वित्कुलदीपकृष्ण जमहादेवेत संस्थापितं।
> स श्रीशाहूनृपात्सदाशिव इति प्राप्यभिधानं नव्रं
> लिगाग्रा कृषवान्सदाशिवपुरी मित्युचिवान चास्कर:।।
> शके १६४५ शोभंकृत संत्सरे, माद्य शु।। त्रयोदशी सोम:।
> कृष्णाजी जनार्दनपंत."[२५]

**ब) भार्गवराम मंदिर:-**

ब्रम्हेंद्रस्वामी छत्रपती शाहूचे राजगुरु होते. इ.स. १७२८ मध्ये छत्रपती शाहूच्या आग्रहावरुन ते घावडशीला येवून कायम स्थायिक झाले. ब्रम्हेंद्रस्वामींनी खूप सामाजिक, राजकीय व धार्मिक कार्य केले.

इ.स. १७४५ मध्ये ब्रम्हेंद्रस्वामी निवर्तल्यानंतर महाराजाने धावडशीस त्यांच्या समाधीवर भार्गवराम मंदिर बांधले. मंदिर अतिशय रेखीव असून उत्तराभिमुख आहे. दगडी जगतीवर असलेल्या या मंदिरात तीन प्रशस्त गाभारे आहेत व पुढे भव्य सभामंडप आहे. मुख्य गाभाऱ्यात भार्गवरामाची काळ्या पाषाणाची रेखीव मूर्ती असून तिच्या दोन्ही बाजूस काळ व काम या परशुरामाच्या दोन भावाच्या छोट्या मूर्ती आहेत. त्यासमोरच ब्रम्हेंद्रस्वामीची समाधी आहे. समाधीचा गाभारा प्रशस्त असून त्याच्या प्रवेशद्वारावर उत्तम शिल्पाकृती आहेत. मंदिराच्या महाद्वाराच्या शिरोभागी पुढील प्रमाणे मराठी शिलालेख आहे.

श्री. भार्गवरम

श्री. भार्गवाचा अवतार साचा। ब्रम्हेंद्रस्वामी बहुता दिसांचा।।
अवतार त्याचा समाप्त झाला । संवत्सरा जाणही क्रोधनाला।।१।।
श्रावण शुक्ल नवमी भृगुवार होता। अरूणोदेई प्राण प्रयाण होता।।
कृष्णातिरी मुख्य समाधिस्थानी। वैकुंठवास मुनिला बहु लोकमनी।।२।।
प्रारंभ कामासि तेयेचि काली।वर्षे समाप्ती सहिशास्त्र झाली।
शाहू नृपाल भजतो निजपूर्ण भावे। सर्वत्र लोक भजती बहुपण भावे।।३।।
तयाचा जगन्नाथ भक्त प्रशील। समाधिस्थळ बांधिले हे सुनील।
महाबुद्धीने योजिला जो सुशिल्ली। तया शंकरे बांधिले आत्मकल्पी।।४।।''[२६]

**क) महादेव मंदिर:-**

छ. शाहू महाराजांनी बांधलेले मंदिर या मंदिरात गाभारा व दीर्घिका असून त्याच्या समोराच्या कमानीचे बांधकाम सारसेनिक पद्धतीचे आहे. कमानी व आतील भिंती गुळगुळीत व काळ्या दगडाच्या आहेत. दीर्घिकेच्या कमानीची पुढील भागात भिंतीवर सर्वत्र पानाच्या व शंखासारख्या आकृत्या कोरलेल्या आहेत. बाजूनेसुद्धा भिंतीवर कोरीव काम आहे. शिखर विटांचे असून मंदिराचे उर्वरित संपूर्ण बांधकाम दगडी आहे. एका

उत्फुल्ल कमळावर शिखराची योजना केली आहे. गाभाऱ्याच्या व मंडपाच्या प्रत्येक कोपऱ्यावर लहान लहान शिखरे आहेत. गाभाऱ्यात महादेवाचे लिंग आहे. मंदिरासमोर असलेल्या नंदीमंडपाची वैशिष्ट्यपूर्ण रचना केली आहे. हा नंदीमंडप म्हणजे एक अष्टकोनी हौद आहे. या हौदावर कमानीचे अष्टकोनी घुमटासारखे शिखर आहे. हौदात पाणी असून मध्यभागी दगडी कासवावर नंदी आहे. हे कासव पाण्यावर तरंगत असल्याचा भास होतो. शिखर उंच असून त्यावर नक्षिकाम आहे. मंदिर सुस्थितीत आहे.[२७] या महादेवाची यात्रा वैशाख पोर्णिमेला (एप्रिल-मे) मध्ये भरते.

शाहू महाराजांनी सातारा व इतर परिसरामध्ये अनेक मंदिरे बांधली. त्यांनी उत्कृष्ट असे नक्षीकाम, शिल्पकला व कलाकुसर या मंदिरावर केली होती.

**ब) वृंदावन निर्माण करणे.**

छ.शाहू महाराजाने आपल्या पूर्वजांची अनेक वृंदावने बांधली. ज्या प्रमाणात मंदिरे निर्माण केली होती त्याच पद्धतीने त्यांनी वृंदावनाची निर्मिती केली.

**अ) संभाजी महाराजांचे वृंदावनः-**

संभाजी महाराजाचे वृंदावन वढू बुद्रुकाला बांधले होते. त्याचा प्रत्यक्ष पुरावा आपणाला पेशवे दप्तरातून सापडतो. यांचा पहिला कागद ता. १८ जानेवारी १७१५ चा आहे. याबाबत बेंद्रे म्हणतात की, ''वढू बुद्रुकातच येसूबाईने बहुधा नजरकैदेत असताना संभाजी महाराजाचे वृंदावन बांधले. त्या वृंदावनाची पूजाअर्चा, निगा वगैरे शाहू कारर्किदींच्या अखेरपर्यंत तरी चालू होती.''[२८] छ. संभाजीच्या वृंदावनाच्या निर्मिती बाबत सरदेसाई म्हणतात की, छ. शाहू महाराजाने मौजें बडू येथील संभाजीचे वृंदावन यांची यथायोग्य व्यवस्था बांधून दिली. त्या संदर्भात ता. १८-१-१७१५ च्या पत्रात वृंदावनाविषयी खालील माहिती मिळते. ''वृंदावन राजश्री कैलासवासी संभाजी राजे स्वामी जुन्नर मौजे वढू येथे भिमराव गोसावी व वासुदेव भट बिन रामभट धर्माधिकारंणी वृंदावनाचे शुश्रूषेबद्दल ठेवले आहेत. राजश्री संभाजी राजे कैलासवासी स्वामी दर जागा मौजे वढू येथे बावीस मोहरम वृंदावन आहे. तेथे फुले व तुलसीच्या व आंबराईची लावणी करावी व अन्नदान करावे.''[२९] यावरुन असे समजते की, शाहू महाराजांनी संभाजीच्या वृंदावनाच्या ठिकाणी फुले, तुळसीचे व आंबराईची लागवड करण्यास सांगितली होती.

### ब) येसूबाईचे वृंदावनः-

महाराणी येसूबाईचे वृंदावन संगम माहूली येथे शाहू महाराजांनी बांधले. हे अनेक पत्रावरुन सिद्ध होते. माहुली हे क्षेत्र सातारा जिल्ह्यात साताऱ्यापासून चार मैल अंतरावर असून या ठिकाणी कृष्णा व वेण्णा या दोन नद्यांचा संगम झालेला असल्यामुळे या क्षेत्राला माहुली संगम, कृष्णा-वेण्णा संगम असेही म्हणतात. या ठिकाणी अनेक मंदिरे, घाट व समाध्या आहेत. संगम माहुलीच्या दक्षिण काशी विश्वेश्वराच्या देवालयाचे आवार यांच्या मध्यभागी राणी येसूबाई यांचे शाहू महाराजांनी बांधलेले मोठे वृंदावन आहे[३०] व त्या वृंदावनाजवळ चंपाबाई साहेब यांचे वृंदावन आहे.

### ५.३.२ देणग्या, वतने, दानधर्मः-

महाराजांनी अनेक धार्मिक देणग्या, वतने दिली. त्यांनी चिंचवडच्या मोरयादेव, संत एकनाथ, संत तुकाराम, कल्याण गोसावी, ब्रम्हेंद्रस्वामी, नाशिक येथील पूर्णानंदस्वामी नानकपंथी व मुसलमान संत या सर्वांना देणग्या दिले. या संदर्भात अनेक पत्रे आहेत. त्यांनी विशेष म्हणजे मुस्लिम संताना सुद्धा देगण्या दिल्या होत्या. त्याच प्रमाणात त्यांनी मोठ्या प्रमाणात दानधर्म केला.

या संदर्भात काही पत्रे पुढील प्रमाणे आहेत.

चिंचवड संस्थानास इनाम दिलेले पत्र पुढीलप्रमाणे आहे हे पत्र इ.स. १७०९-१० च्या दरम्यानचे आहे. "श्री राजा शाहू छत्रपती यांनी मोंकदम गौजेवाकड पुणे यास आज्ञा केली की, श्री. स्वामी चिंचवड हे फार थोर व परमेश्वर रुप आहेत. थोरले कैलासवासी स्वामींनी इनाम दिले आहेत. त्यामुळे श्रीचे आशीर्वाद राज्यात व स्वामीस आहेत. त्यांचे अन्नदानाचे कार्य महत्त्वाचे आहे. स्वामीस कुळबाब, कुळकानू, हल्लीपट्टी व पेस्तरपट्टी इ. भूभाग इनाम दिलेला आहे. या भागातील वसुली श्रीकडे सुरळीत देत जाणे. दरवर्षी नवीन आक्षेप न करणे. प्रतिलिहून घेऊन मुख्य प्रत भोगवटीयास परत देणे."[३१] यावरुन शाहू महाराजाचा दृष्टिकोन समजतो. चिंचवडचे स्वामीस त्यांना चालू असलेले वतन पुढे सुरु ठेवले.

पैठण येथील संत एकनाथ संस्थानास इनाम दिलेले इ.स. १७१९-२० चे पत्र आहे. त्यात त्यांनी एकनाथचे जे वंशज आहेत. त्यांच्या कुटुंबाकरिता त्यांना इनाम दिले

होते ते पुढील पत्रावरुन समजते. ''श्री राजा शाहू छत्रपतींनी, राजश्री काशिनाथ गोसावी बिन जगनाथ गोसावी, पैठण हे एकनाथस्वामींचे वंशज यांच्या कुटुंबाकरिता इनामपट्टी, कुळबाब, कुळकानूनखेरीज हक्कदार व इनामदार वंशपरंपरेने इनाम दिले. परगणे पैठणपैकी चौकी व जकाचेत भशाट जिल्हेकडे करार पत्र ८ मौजे वाहिगांव, मौजे ढोरकीन गांव, फत्तेसिंग बाबांनी आपले तर्फेने दिले होते.''[३२]

शाहू महाराजानी हिंदू धर्मांना इनामे वतने दिली होती. त्याच प्रमाणे त्यांनी मुस्लिम धर्मातील संताना सुद्धा वतन दिले होते. यावरुन असे समजते की, ते सर्वधर्मास समान समजत होते. इ.स. १७३० चे पत्र आहे. त्यांनी मुसलमान साधू-सैयद आतावाला शकरकोटी यांना इनाम दिले होते. ते पुढील पत्र आहे-''सैयद आतवाल शकरकोटी पीरजादे हे थोर, सर्वांचे भले करणारे, असल्यामुळे त्यांच्याकरिता लोणी, परगणे हवेली मेहकर, हे गाव इनाम म्हणून दिले. असे पत्र गावकऱ्यांस व चिटणीस देशमुख व देशपांडे, देशाधिकारी यांना देण्यात आले. या गावातील वसुली सुरळीत त्यांना द्यावी असे म्हटले आहे.''[३३] त्यांनी या मुसलमानास दिलेल्या सनदेवरुन शाहूची भावना किती समबुद्धीची व सर्वसंग्राहक होती हे दिसून येते.

भारतीय समाजरचनेमध्ये दानधर्माला अत्यंत महत्त्वाचे स्थान आहे. दानधर्म हा हिंदूधर्माचा अविभाज्य भाग राहिलेला आहे. दानधर्म करुन पुण्यप्राप्त करण्याची भावना अधिक तीव्र असल्यामुळे लोक दानधर्म करीत असत. छ. शाहू महाराजांनी सुद्धा मोठ्या प्रमाणात दानधर्म केला होता. येसूबाई अतिशय धार्मिक प्रवृत्तीच्या होत्या. त्या आल्या त्याच वर्षी पृथ्वी प्रदक्षिणा (हिंदुस्थान यात्रा ) करुन आलेल्या कराडच्या रघुनाथ भट सवलीकरी या ब्राम्हणास त्यांनी वर्षासन करुन दिले होते.

छ. शाहू महाराजांनी ''श्रावण मासांत ब्राम्हणांची वेदशास्त्रांत परीक्षा करुन प्रथम दाभाड्यांचे मार्फत तळेगाव येथे व पुढे पुणे येथे चार पाच लक्ष धर्म करावा, असे ठरविलें, दिगंत कीर्ति जाऊन विद्वान तपस्वी महापुरुष चहू दिशेचे लक्षावधी येऊ लागले. जशी काशी तसें सातारा पुणें विद्यापीठच झाले. आज्ञा कोणी उल्लंघन न करावी, ऐसे सार्वभौम राज्य केलें. नीतिन्यायें करुन प्रजेचे पालन पोषण केले. गरीब अनाथाचे ठायी बहुत दया करुन त्यांचे दु:ख परिहार करावे. रयतेस उपद्रव काडीमात्र नाही. पर्जन्यवृष्टि

यथाकाळ होऊन पृथ्वीने धान्यपीक बहुत द्यावें ऐसें सुभिक्षा झाले.''[३४] यापत्रावरुन त्यांनी दानधर्म केल्याचे दिसते.

छ. शाहू महाराजाने त्यांची राणी आजारी असता, तिच्या प्रकृतीस आराम पडावा यासाठी ''इंदुवारी गजदान, उंटदान, दोन अश्वदाने, म्हशीची दोन दाने, पाच सात गोदाने कृष्णाजिनदान व किरकोळ दशदाने ब्राह्मणास दिली.''[३५] ही दाने सध्याच्या द्रव्यवरुपात न देता प्रत्यक्ष हत्ती, उंट, घोडे या रुपानेच दिली जात होती. एकंदरीत महाराजांनी दानधर्म मोठ्या प्रमाणात केला होता असे दिसून येते.

**५.३.३ सत्पुरुषांची संतसंगती:-**

महाराज जेव्हा महाराष्ट्रात आले तेव्हापासून पेशवाईच्या अखेरीपर्यंत जे सत्पुरुष निर्माण झाले त्यांत कचेश्वर, ब्रम्हेंद्रस्वामी धावडशीकर, नारायण दिक्षीत पाटणकर, रामाजी नारायण कोल्हटकर, लक्ष्मण बाबा हे प्रमुख होते. त्या काळात महाराष्ट्र देश हल्लीप्रमाणे मनुष्यवस्तीने गजबजला नव्हता. मनुष्यवस्ती विरळ होती व मुबलक मुलूख मोकळा पडला होता. त्यात संतांनी आपल्या पसंतीचे स्थान शोधून काढून पाण्याच्या आश्रयाने एखाद्या नदी किनाऱ्यास, वनात आपले मठ स्थापले. छ. शाहू महाराज या सर्व मठांना भेटी देत व सर्व संताना ते मान देत असत. काही साधू संत पुढीलप्रमाणे आहेत.

**अ) ब्रम्हेंद्रस्वामी धावडशीकर:-**

शाहू महाराजांच्या कारकिर्दीतील सर्वात प्रसिद्ध साधू ब्रम्हेंद्रस्वामी हे होत. त्यांचे जन्मस्थान, वऱ्हाडातील गणपतीच्या राजूरजवळील दुधेवाडी हे होते. दुधेवाडी काशीचे ज्ञानेंद्र स्वामीने त्यास चतुर्थश्रम देऊन ब्रम्हेंद्रस्वामी असे नाव ठेवले. स्वामी दक्षिण दिशेकडे तीर्थयात्रा करण्यास निघाले व महाराष्ट्रात आले. अगोदर कोकणात राहू लागले. पुढे इ.स. १७२६ च्या सुमारास स्वामीची सिद्दीयासबरोबर बेबनाव झाल्यामुळे ते सातारा (धावडशी) येथे राहू लागले. काव्येतिहास संग्रह मधील उल्लेख - ''ब्रम्हेंद्रस्वामी खमस अशरीनात श्री घाट चढोन साताऱ्याशी शाहू महाराज याजकडे आले. राजश्रीस वर्तमान कळताच सामोरे जाऊन सन्माने करुन वाड्यात आणून पूजा करून तीन गाव मौजे धावडशी तर्फ परळी, मौजे विरमाडे प्रांत कऱ्हाड आनेवाडी तर्फ कुडाळ हे तीन गाव

राजांनी दरोबास्त कुळूबात कुळकानू इनाम देऊन राजपत्रे करुन दिली.''[३६] यावरुन समजते शाहू महाराजांनी त्यांना गावे इनाम दिले होते.

छ. शाहू राजे हे ब्रम्हेंद्रस्वामीचे भक्त होते. तसेच त्यांचे कुटुंबियांचीसुद्धा स्वामीवर श्रद्धा होती. त्या संबंधी अनेक उल्लेख आढळतात. ब्रम्हेंद्रस्वामी राजांचे गुरु झाले. तुकाराम महाराजांच्या अभंगांचा त्यांना मोठा व्यासंग होता. शाहूराजांनी त्यांना राजाश्रय दिला. ब्रम्हेंद्रस्वामीच्या काळात असा एकही मोठा सरदार किंवा मातब्बर माणूस नव्हता, की ज्याच्यांशी स्वामींनी आपला ममतेचा दुवा जोडला नव्हता.

**ब) रामाजी नारायण कोल्हटकरः-**

हे कोकणातील नेवरे गावचे रहिवासी रामाजीपंत मोठे ईश्वरभक्त व सत्पुरुष होते. त्यांनी शाहूमहाराजांस विनंती केली की, 'आपण स्वामीच्या राज्यात राहोन स्नानसंध्या व श्रीचें भजन करुन व स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण चिंतून आहे.' अशा प्रकारच्या सत्पुरुषांचा आशीर्वाद आपणास लाभून राज्यास बळकटी यावी ही इच्छा महाराजांस असल्यामुळे त्यांसी इ.स. १७०८ मध्ये कोकणात नेवरे गावाजवळ काही जमीन त्यास इनाम करुन दिली.'[३७]

**क) गंगाधर स्वामी चाफळकरः-**

शाहू महाराज मोगलांकडून सुटून आल्यावर समर्थ शिष्य दिवाकर प्रभूतींनी यांना जांबेहून आणून इ.स. १७१० मध्ये चाफळमठाधिपती केले. खंडो बल्लाळ चिटणिसास मठाची व्यवस्था पूर्वीप्रमाणे ठेवण्यास शाहूने सांगितले.[३८] पुढे ते तेरा वर्षे मठाचा कारभार करीत होते.

**ड) लक्ष्मण बाबाः-**

गंगाधर स्वामी यांचे कनिष्ठ बंधू रामजी बाबा यांचे हे पुत्र, त्यांचे नाव लक्ष्मण गंगाधर असे ठेवून शाहूने त्यांस मठाधिपती केले.[३९]

**इ) कचरेश्वरः-**

कचरेश्वर हे सत्शील व तपस्वी होते. छ. शाहू महाराज मोगलांच्या अटकेतून सुटून स्वदेशी येत असता वाटेत कचरेश्वरांचे दर्शन घेतले. कचरेश्वरांनीही त्यांचा उलटपक्षी सत्कार केला. पुढे शाहू महाराज साताऱ्यास सुखरुप येऊन राहिल्यावर त्यांनी

कचेश्वरास बोलावून आणून त्यांचा उपदेश घेतला. तेव्हा लोकही सहजच त्यास राजगुरु म्हणू लागले. राजाने त्यास ऐश्वर्य देऊ केले ते त्यांनी स्वीकारले नाही. साताऱ्यास असता राजाकडून रोज त्यास शिधा येत असे. तो आयाचित वृत्तीस धरुन असल्यामुळे त्याचा अनादर कचरेश्वर करीत नसत, ते रोजच्या निर्वाहास जरुर तेवढा भार ठेवून बाकीचा परत करीत.[४०] यावरुन समजते की कचरेश्वर हे संत स्वार्थी नव्हते त्यांनी फक्त समाजाची नि:स्वार्थी सेवा केली व छ. शाहू महाराज या संत साधूच्या सानिध्यात होते.

साधूंची व संताची कृपा संपादावी त्यांची सेवा करावी हा जो दंडक शिवाजी महाराजांनी घालून दिला होता. तोच दंडक छ. शाहू महाराजांनी सुरु ठेवला. संत मंडळी त्यावेळी एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी भटकंती करत होते. ते ठिकठिकाणी संचार करुन आपल्या संगतीने लोकोद्धार साधण्यास झटत. अशा सत्पुरुषाची, संताची किंवा साधूची शाहू महाराजांनी उदार मनाने त्यांची सेवा केली त्यांना इनामे, वतने दिली. या काळामध्ये ज्या-ज्या साधू-संतांनी समाजोपयोगी व धार्मिक कार्य केले अशा सर्वांना छ. शाहू महाराजांनी साह्य केले.

### ५.३.४ पशुपक्ष्यांचा सांस्कृतिक ठेवा:-

शाहू महाराज ही महाराष्ट्राच्या सुधारणेची मुहूर्तमेढ होय. प्रत्येकांच्या आवडी-निवडीनुसार मराठ्यांना कुत्रा व घोडा यांचा मोठा शोक होता. तोच शोक मोठ्या प्रमाणात छ. शाहू महाराजांना होता. त्यांनी पशू पक्ष्याचा सांस्कृतिक ठेवा उत्तम ठेवला. छ. शाहू महाराजांनी एखाद्या वस्तुचा विचार केला म्हणजे तो विचार पूर्ण केल्याशिवाय त्यांना चैन पडत नसे. तशी वस्तू कोणी पाठविली असता ती त्यांच्या पसंतीस लवकर उतरु नये अशा त्यांच्या छंदिष्ट व जिकीरखोर स्वभावामुळे त्यांच्या पदरच्या लहानथोर लोकांना फार मर्जी सांभाळावी लागे.

महाराजांना पशुपक्षाची आवड होती म्हणून त्यांना इंग्रज प्रतिनिधी ''कॅ. गॉर्डन इ.स. जानेवारी १७३९ ला साताऱ्यास आला असता त्याने शाहूस सुंदर पशुपक्षांचा नजराणा केला होता.''[४१] महाराज घोडे व कुत्री ही जशी मिळतील तेथून पैदा करुन आणीत. त्याचप्रमाणे ते बदकेही मागवीत असत. महाराजांच्या शिकार खान्यात तऱ्हेतऱ्हेचे पशुपक्षी होते आणि ते त्यांची सजावट नीट ठेवत असत. तसेच इतरत्र आपल्या पसंतीच्या

ठिकाणीही काही काही प्राण्यांचा संग्रह करीत. साताऱ्यापासून थोड्या अंतरावर चंदन व वंदन हे दोन डोंगरी किल्ले आहेत. त्या किल्ल्याकडे शिकारीसाठी महाराज वारंवार जात व किल्ल्यावर राहत. शाहू महाराजांना एकदा आपल्या शिकार खान्यात वनगाई, कस्तूरीमृग व हुमे हे पक्षी ठेवण्याची इच्छा झाली. हे प्राणी काश्मिरात मिळत असल्याचे शाहूने ऐकले होते. छ. शाहूच्या दरबारात इतर अनेक राजांच्या वकिलांप्रमाणे श्रीनगरच्या राजाचाही वकील होता. त्याने सांगितले की हुमा पक्षी जीवंत मिळत नाही. तेव्हा वनगाई व कस्तूरीमृग आणण्यासाठी एखादा छोटे खानी कारकून श्रीनगरास पाठविण्याचे ठरले.'[४२] एकंदरीत शाहू महाराजाने आपल्या शिकारखान्यात जे पशु-पक्षी नाहीत ते इतर राज्यातून आणले व आपल्या शिकार खान्यात पशुपक्ष्याची भर घातली. महाराजांनी पशु-पक्ष्यांचा सांस्कृतिक वारसा जतन करुन ठेवला.

यावरुन हे स्पष्ट होते की, छत्रपती शाहू महाराजांचे केवळ राजकीय कर्तृत्व नव्हते, तर त्यांची एक प्रगल्भ सामाजिक, धार्मिक व सांस्कृतिक दृष्टींचा त्यांच्यावर प्रभाव असल्याने ते कोणत्याही अडचणीच्या प्रसंगी डगमगले नाहीत. हे त्यांच्या सामाजिक, धार्मिक व सांस्कृतिक कार्याबद्दल दिलेले वतने, देणग्या व निवाडा पत्रे यांतून त्यांचे कार्य दिसते. तसेच ते विद्येचे व कलागुणी विभूतींचे भोक्ते होते.मंदिरांच्या जीर्णोद्धारासही त्यांनी साह्य केले. या सर्व नोंदी त्यांच्या सामाजिक व सांस्कृतिक कार्याची साक्ष देतात.

**संदर्भ :-**


१) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-४, पेशवा बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब, पुण्यश्लोक शाहू, छत्रपती रामराजा, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९०, पृ. १८७

२) साने का. ना., चिटणीस मल्हार रामराव विरचित, थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, पुणे, शके १८१५, पृ. ८४

३) आपटे द. वि., महाराष्ट्र इतिहास मंजरी अथवा निवडक ऐतिहासिक उतारे पूर्वार्ध, चित्रशाळा प्रेस, पुणे, शके १८४५, पृ. १८१.

४) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-४, उपरोक्त, पृ. १७७.

५) कित्ता, पृ.१७९.

६) Joshi P. M., Expansion of Maratha Powar (1707 to 1761), Government Central Press, Bombay, 1957, P. 9-10

७) जोशी श्री. ना., सेनापती दाभाडे दप्तर, भाग-१, चिटणीस, भा.इ.सं. मंडळ, पुणे, १९५१, पृ. १६.

८) पारसनीस द. ब., पेशवे दप्तरातील सनदापत्रांतील माहिती, निर्णयसागर, सातारा, १९१७, पृ. २५७.

९) खरे वा. वा., इचलकरंजी संस्थानाचा इतिहास व इचलकरंजी दप्तरांतील निवडक पत्रे यादी, आर्यभूषण छापखाना, पुणे, १९१३, पृ. ३१,३३,५७.

१०) साने का. ना., थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, उपरोक्त, पृ. ९०.

११) सरदेसाई गो. स. (संपा.), शाहू खाजगी, पेशवे दप्तरांतून निवडलेले कागद, खंड- ८, गव्हर्नमेंट सेंट्रल प्रेस, मुंबई, १९३०, पृ. ३३,३४.

१२) अरूणचंद्र शं. पाठक (संपा.) महाराष्ट्र राज्य गॅसेटिअर, सातारा जिल्हा, महाराष्ट्र शासन, मुंबई, १९९९, पृ. ९००,९०१.

१३) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९-१९११, पृ. ६२१.

१४) शिवदे स. स., महाराज्ञी येसूबाई, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००४, पृ. १३२.

१५) अरूणचंद्र शं. पाठक, महाराष्ट्र राज्य गॅसेटिअर, सातारा जिल्हा, उपरोक्त, पृ. ९०३.

१६) शिवदे स. स., महाराज्ञी येसूबाई, उपरोक्त, पृ. १३२.

१७) अरूणचंद्र शं. पाठक, सातारा जिल्हा गॅसेटिअर, उपरोक्त, पृ. ९०३.

१८) शिवदे स. स., महाराज्ञी येसूबाई, उपरोक्त, पृ. १३३.

१९) अरूणचंद्र शं. पाठक, सातारा जिल्हा गॅसेटिअर, उपरोक्त, पृ. ९०२.

२०) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-४, उपरोक्त, पृ. २०१,२०२.

२१) कित्ता, पृ. १९७,१९८.

२२) भावे वा. कृ., पेशवे कालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसन्धान परिषद, नवी दिल्ली, १९७६,पृ. ३९.

२३) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९, पृ. ६१५.

२४) भावे वा. कृ., पेशवे कालीन महाराष्ट्र, उपरोक्त, पृ. १४१.

२५) अरूणचंद्र शं. पाठक, सातारा जिल्हा गॅसेटिअर, उपरोक्त, पृ.९०५,९०६.

२६) सासवडकर प्र. ल., श्री. ब्रम्हेंद्रस्वामी धावडशीकर, अमृतधारा प्रकाशन, सातारा, १९८५, पृ. १३ते ७३.

२७) अरूणचंद्र शं. पाठक, सातारा जिल्हा गॅसेटिअर, उपरोक्त, पृ.७८३.

२८) बेन्द्रे वा. सी., श्री. छ. संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन, मुंबई, २००१, पृ. ७०८-७०९.

२९) सरदेसाई गो. स. (संपा.), पेशवे दप्तरातून निवडलेले कागद-३०, शाहू व पहिले दोन पेशवे (१७००-१७४०), उपरोक्त, पृ. ९-१०.

३०) शिवदे स. स., महाराज्ञी येसूबाई, उपरोक्त, पृ. १५७.

३१) पारसनीस द. ब., पेशवे दप्तरांतील सनदापत्रातील माहिती, निर्णय सागर, सातारा, १९१७, पृ. २३७.

३२) कित्ता, पृ. २३८.

३३) कित्ता, पृ. २४१.

३४) सरदेसाई गो. स., मराठी रियासत, खंड-३, उपरोक्त, पृ. १७८.

३५) भावे वा. कृ., पेशवे कालीन महाराष्ट्र, उपरोक्त, पृ. २१४.

३६) साने का. ना., सरदेसाई गो. स., काळे या. ना., बाळणकर वि. स. (संपा.), काव्येतिहास समुह ऐतिहासिक पत्रे, याद्या वैगरे, १९३०.

३७) भावे वा. कृ., पेशवे कालीन महाराष्ट्र, उपरोक्त, पृ. १९८.

३८) हेरवाडकर र. वि., थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९७६, पृ. २४७.

३९) कित्ता, पृ. २४८.

४०) भावे वा. कृ., पेशवे कालीन महाराष्ट्र, उपरोक्त, पृ. १९८.

४१) माटे गो. रा., असा घडला सातारा, शनिवार पेठ सातारा, १९८८, पृ. १६.

४२) भावे वा. कृ., पेशवे कालीन महाराष्ट्र, उपरोक्त, पृ. १३२.

## प्रकरण सहावे

# निष्कर्ष

**निष्कर्षः-**

छत्रपती शाहू महाराज यांच्या जीवन कार्याचा चिकित्सक अभ्यास केला असता, त्यांच्या जीवनात असे निदर्शनास येते की, अनेक कठीण प्रसंग आले तरीही शाहू महाराजांनी त्या कठीण प्रसंगातूनही वाटचाल करत मराठ्यांच्या स्वराज्यास नवे रुप देऊन त्याचे साम्राज्यात रुपांतर केले. त्यांच्या व्यक्तिमत्वाच्या विविध पैलूवर प्रकरणाच्या अनुषंगाने त्या त्या ठिकाणी प्रकाश टाकला आहे. तत्कालीन परिस्थितीचा विचार करता छ. शाहू महाराज यांनी केलेले कार्य निश्चित अतुलनीय आहे. अभ्यासाअंती या प्रकरणामध्ये मागील अध्ययनाचा मागोवा घेऊन पुन:श्च अभ्यास विषयाची नव्याने मांडणी केली आहे. प्रत्येक प्रकरणाचा थोडक्यात सारांश स्पष्ट करुन नवीन दृष्टीने सैद्धांतिक मीमांसा केली आहे.

मध्ययुगीन भारताच्या राजपटलावर विभागलेल्या आणि दुर्बल झालेल्या मोगल सत्तेच्या परिस्थितीचा फायदा घेऊन त्यांनी सुटकेनंतर स्वकीयांचा विरोध मोडून मराठी स्वराज्याची सूत्रे स्वीकारताना मराठी सत्तेचे वैभव पुन्हा प्रस्थापित केले.

छ. शाहू महाराजांनी मराठ्यांच्या इतिहासामध्ये नव्हे तर समग्र भारताच्या इतिहासात अतुलनीय अशी कामगिरी बजावली, तत्कालीन प्रतिकूल परिस्थितीला आकार देऊन त्यांनी मराठी सत्तेच्या यशाचा आलेख सतत वाढविला. छत्रपतीपदी पोहचेपर्यंत व नंतर मराठी स्वराज्यं ते साम्राज्यापर्यंत त्यांनी केलेली वाटचाल, त्यांनी बजावलेली कामगिरी पाहता त्यांच्या कर्तृत्त्वांच्या अनेक छटा प्रकाशमान होतात. त्याद्वारे त्यांचे राजकीय, सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक अशा अनेक विविध पैलूंनी त्यांचे कर्तृत्त्व सिद्ध होते.

छ. शाहू महाराज यांचे कार्य हे राष्ट्रीय नेतृत्व म्हणून ओळखे जात होते. त्यांनी एकीकडे मोगल, राजपूत तसेच तत्कालीन भारतीय सामंताशी सुसंवाद साधला. तसेच त्यांच्यातील दुहीचाही चतुराईने लाभ करून घेतला. प्रशासन व्यवस्थेची पुनर्रचना असो

की, प्रशासकीय व्यवस्थेतील सुधारणा असो, छ. शाहू महाराज यांच्या कर्तृत्त्वाची छाप प्रभावीपणे दिसून येते. छ शाहू महाराज यांच्या कार्याचा साधार आणि सबळ पुराव्याच्या आधारे अभ्यास करुन या प्रबंधात त्यांच्या कर्तृत्त्वाचे पुनरावलोकन करण्यात आले आहे. या प्रकरणात मागील प्रकरणातील संशोधनाचा आढावा घेऊन या शोध कार्यातील ठळक निष्कर्षाची तर्कशुद्ध दृष्टीने सुसंगतपणे मांडणी केलेली आहे. ती मांडणी प्रकरण निहाय सारांश रुपाने पुढीलप्रमाणे मांडता येईल.

**प्रकरण निहाय सारांशः-**

पूर्व प्रकरणाचा मागोवा घेतला असता पुढील अभ्यासाची मीमांसा करणे सोपे होते. या प्रत्येक प्रकरणातील विवेचनाची दिशा त्यामुळे स्पष्ट होईल व पुढील अध्ययनाचा मार्ग सुलभ होईल.

या प्रबंधाच्या पहिल्या प्रकरणात छ. शाहू यांच्या उदयापूर्वीच्या परिस्थितीवर चौफेर प्रकाश टाकण्यात आला आहे. या प्रकरणात छ. शाहू महाराज यांच्या उदयापूर्वीची पार्श्वभूमी स्पष्ट करून त्यात राष्ट्रीय व प्रादेशिक परिस्थिती स्पष्ट करण्यात आली आहे. त्यामध्ये राजकीय, सामाजिक, आर्थिक, धार्मिक, सांस्कृतिक हे घटक पडताळून पाहण्यात आले आहे. प्रतिकूल परिस्थितीवर मात करून एखादी व्यक्ती कशाप्रकारे वाटचाल करू शकते व त्याच्या उदयासाठी पोषक अशा घटकांची चर्चा केली आहे.

छ. शाहू महाराज यांच्या कामगिरीचे आकलन करण्यासाठी ऐतिहासिक संशोधन पद्धतीचा अवलंब करुन, ऐतिहासिक दस्ताऐवज, पत्रव्यवहार आणि कागदपत्राचे अंतर्गत व बाह्य मूल्यमापन करुन त्याची शास्त्रीयदृष्ट्या पडताळणी केली आहे. समर्पक अशा वर्णनात्मक पद्धतीचा वापर करण्यात आला आहे. हा वर्णनात्मक आराखडा वापरताना ते चरित्रात्मक दृष्टिकोनातून छ. शाहू यांच्या कर्तृत्त्वावर प्रकाश टाकला आहे.हे प्रकरण मूळ अभ्यासाला दिशा देणारे आहे.

या प्रबंधाच्या दुसऱ्या प्रकरणात छ. शाहू यांचे बालपण व त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास या पैलूंवर प्रकाश टाकण्यात आला. छ. शाहू महाराज यांचे बालपण, त्यांची कैद व सुटका, त्यांचे पारंपरिक शिक्षण व संस्कार, त्यांच्या जीवन कार्याची वाटचाल याचा शोध घेत त्यांच्या व्यक्तिमत्वाचा विकास कसा झाला ते अभ्यासले आहे. यात त्यांच्या बालपणापासून ते सक्रीयपणे तत्कालीन राजकारणात येईपर्यंतचा काळ अभ्यासला आहे.

छ. शाहूवर पडलेला तत्कालीन मुत्सद्याचा प्रभाव व त्यातून त्यांची जडण-घडण यांचा आढावा घेऊन प्रारंभिक कालखंडावर उपलब्ध साधनांच्या आधारे (प्रकाशित व अप्रकाशित कागदपत्रांच्या आधारे) प्रकाश टाकून नव्याने विश्लेषण केले आहे. तसेच त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे विविध पैलू बारकाईने मांडले आहेत.

या प्रबंधाच्या तिसऱ्या प्रकरणात छ. शाहू महाराज यांच्या काळातील साम्राज्य विस्तार याचे विशेष अध्ययन केले आहे. त्यांच्या काळातील मराठी स्वराज्याचा साम्राज्य विस्तार कसा झाला त्यातील महत्त्वाचे टप्पे यांचा चिकित्सक अभ्यास करण्यात आला आहे. छ. शाहू यांच्या सनदा (ता. २४ मार्च, १७१९) निजामावरील बंदोबस्त, स्वकीयांवर नियंत्रण (वारणेचा तह एप्रिल, १७३१) तसेच उत्तर भारतातील मराठी सत्तेचे नवीन केंद्रे गुजरात, माळवा, बुंदेलखंड, उत्तरप्रदेश व कर्नाटक याचाही अभ्यास केला आहे. सरदारातील अंतर्गत वाद मराठ्यांच्या साम्राज्य हिता आड न येण्यासाठी छत्रपती या नात्याने बजावलेली भूमिका, सरदारावर मिळविलेले नियंत्रण याचाही अभ्यास केला आहे. हे करताना छत्रपतीपद मिळविण्यास आलेल्या अडचणी त्यांचे प्रारंभिक विजय व राज्यकारभार यांचाही आढावा घेतला आहे.

या प्रबंधाच्या चौथ्या प्रकरणात छ. शाहू महाराज यांच्या राजकीय व प्रशासकीय कामगिरीचे विशेष अध्ययन केले आहे. राजकीय क्षेत्रात कोण-कोणते विशेष कार्य केले व प्रशासनात कोणत्या सुधारणा केल्या तसेच त्याची प्रशासन व्यवस्था राज्याचा महसूल, प्रमुख तह, करार, सनदा व पत्रे इ. चा विस्ताराने अभ्यास केला आहे. छ. शाहू महाराज यांनी सभोवतालच्या परिस्थितीचा योजकतेने अभ्यास करुन आपल्या व्यक्तिमत्त्वाचा परिपोष केला. या प्रकरणात त्यांच्या राजकीय कर्तृत्त्वाच्या अभ्यूदयाची मीमांसा केली आहे.

या प्रबंधाच्या पाचव्या प्रकरणात छ. शाहू महाराज यांच्या सामाजिक व सांस्कृतिक कामगिरीवर प्रकाश टाकला आहे. तसेच त्यांच्या कला, साहित्य, धर्म व संस्कृतीविषयी असणाऱ्या कार्यावर प्रकाश टाकण्यात आला. सातारा येथे शाहू महाराजांनी नवीन बाजारपेठा वसवल्या, शाहू नगराची स्थापना केली. अनेक बागा, फळझाडे व फुलझाडे लावली. छ. शाहू महाराज यांनी कवी, संगीतकार, ज्योतिष, विद्वान व कलाकार यांना आश्रय दिला. तसेच ते वृत्तीने धार्मिक होते. यावरुन त्यांच्या अष्टपैलू व्यक्तिमत्त्वाची

साक्ष पटते. छ. शाहू महाराज यांच्या जीवनकार्यातील हे सर्व अपेक्षित पैलू नवी दृष्टी देणारे आहे असे दिसून येते.

या प्रबंधाचे सहावे प्रकरण हे ठळक निष्कर्ष मांडणारे आहे. प्रारंभिक पूर्व प्रकरणाचा सारांश रुपात ठळक निष्कर्ष विस्ताराने चर्चिले आहेत. छत्रपती शाहू यांच्या जीवनकार्याचा आढावा घेताना नवीन सैद्धांतिक मांडणी केली आहे. मध्ययुगात प्रतिकूल परिस्थिती असूनही छ. शाहू हे स्वकर्तृत्वाने चमकले. त्यांनी मराठी साम्राज्य वाढविले. जीवन कार्याचा आढावा घेताना त्यांच्या मर्यादेचाही आढावा घेण्यात आला आहे. या बरोबर छ. शाहू-पेशवे, छ. शाहू-मराठी सरदार, छ. शाहू-मोगल व छ.शाहू - कोल्हापूरकर यांच्या संबंधाचाही आढावा घेतला आहे.

छ.शाहू महाराज यांच्या या संबंधाचे हे नेते आकलन वैशिष्ट्यपूर्ण असून त्यापुढे त्यांच्या अभ्यासास नवे सामर्थ्य लाभणारे आहे. अशा प्रकारे ही मीमांसा छ. शाहू याच्या कर्तृत्त्वाचे नवे आकलन करण्यास पोषक ठरु शकले.

**ठळक निष्कर्ष :-**

- छत्रपती शाहू महाराज यांच्या उदयापूर्वी राजकीय, आर्थिक, सामाजिक व धार्मिक परिस्थिती प्रतिकूल होती. मराठी स्वराज्य जवळपास औरंगजेबाच्या ताब्यात गेले होते. अनेक मराठी सरदार फितूर झाले होते. स्वत: शाहू व आई येसूबाई औरंगजेबाच्या कैदेत होते. स्वराज्याची आर्थिक व लष्करी परिस्थिती जेमतेम होती. पुढे औरंगजेबाच्या मृत्यूनंतर शाहू महाराजांची सुटका झाल्यानंतर त्यांना स्वराज्यात येण्यात व वंशपरंपरेने अधिकार देण्यास खूद्द (घराण्याची) महाराणी ताराबाई यांनी विरोध केला. अशा सर्व प्रतिकूल परिस्थितीवर आपल्या शांत व संयमी स्वभावाने शाहू महाराजांनी मात करून स्वराज्य मिळविले. म्हणून ते महापुरुष ठरतात व असेच महापुरुष आपल्या कर्तृत्त्वाने इतिहासाला कलाटणी देतात.

- योगीजनास शोभणारी अशी ही समबुद्धी बादशहाचे कैदेत असता त्याचे ठिकाणी बनत गेली. वयाची सतरा वर्ष कर्मठ बादशहाच्या सानिध्यात गेल्यामुळे स्वधर्मापेक्षा मुस्लिम धर्माचेच आचरण अहोरात्र त्यांच्या लक्षात भरत होते. कदाचित मुस्लिम धर्माच्या रांगेत ओळखणारा दुसरा निपूण गृहस्थ त्यावेळी हिंदुमध्ये बहुधा कोणी नसेल. छ शाहू

यांचा स्वभाव इतका मृदू का बनला हे सहज कळून येते. बापास (छ.संभाजी) हालहाल करुन ठार मारिले. हा देखावा त्याच्या दृष्टीपुढे असून खुद्द त्यांच्या जिवीत तशाच धोक्यात असता परिस्थितीशी झगडण्याचे एकच हत्यार त्यांना अनुकूल होते ते त्यांनी स्वीकारले. गोड व विनम्रवृत्ती ठेवून त्यांनी शत्रू मित्रांना जिंकले.

- छ. शाहू महाराज व्यक्तीशः आपल्या पित्याप्रमाणे स्वधर्म अभिमानी होते. उदा. शाहू मोठे झाल्यावर त्यांच्यावर नजर ठेवणे कठीण जात असल्याने औरंगजेबाने त्यांना मुस्लिम बनविण्याचे योजले. इ.स.१७०३ च्या उन्हाळ्यात पुणे येथे मोहरमच्या उत्सवात शाहूस मुस्लिम धर्माची दिक्षा देण्याचा हुकूम जाहीर केला व हमीदोद्दीन खानास शाहूकडे पाठविले. छ. शाहूने जितक्या निर्धाराने मुस्लिम धर्म स्वीकारण्यास नकार दिला. यातून स्वधर्म अभिमान् दिसून येते.

- छत्रपती शाहू महाराज यांच्या जडणघडणीत अनेक मुत्सद्यांचा प्रभाव पडला आहे. त्यांचे आजोबा छत्रपती शिवाजी महाराज यांनी मराठ्यांचे साम्राज्य निर्माण करण्याचे ध्येय, वडील छ. संभाजी महाराज यांचा स्वधर्माभिमान, आई येसूबाई यांची प्रतिकूल परिस्थितीत न डगमगता शांत व स्थिर बुद्धी ठेवून संकटाला सामोरे जाण्याची व कारभार करण्याची वृत्ती, ज्योत्याजी केसरकर यांचा शिक्षणाचा प्रभाव, झुल्फिकारखानाचा चातुर्य पणाचा, औरंगजेबाचा थाटाचा व झिन्नत उन्निसा सारख्या परधर्मी स्त्रीचा ममतेचा प्रभाव त्यांच्यावर बालपणी पडला. सर्वांच्या विचार आणि आचारातून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण होऊन त्यांचा विकास झाला.

- छ. शाहू यांनी मराठ्यांचे वर्चस्व निर्माण करण्यासाठी प्रथम सातारा ही राजधानी निवडून ते आपल्या कर्तबगारीचे कार्यक्षेत्र निवडले व वाढविले, कारण ते स्वराज्याच्या वाटचालीचे महत्त्वाचे एक केंद्र होते; कारण येथून मोगल, निजाम, कोल्हापूरकर व इतर सरदार मंडळी यावर नजर ठेवून दबाव राखणे शक्य होते यातून त्यांना भौगोलिक जाण होती हे समजते. मराठ्यास शिपाईगिरीचे कामात ठेवून उत्तरप्रदेश सोडवून थोरले महाराजांचा उद्दिष्ट सिद्धीस नेला. पूर्वेस दक्षिणेस चतुः समुद्र मर्यादा होऊन चहू दिशेने एक राज्य आता चालू लागले

- छ. शाहू महाराज यांनी राज्यभिषेकानंतर सुरुवातीस मोगल बादशाही सनदाचा आधार घ्यावा लागला, काही प्रसंगी मानसिक कुचंबणा, आर्थिक व राजकीय त्रास सहन करावा लागला, असे असले तरी स्वराज्य विषयीची निष्ठा किंचीतही कमी झाली नाही. तत्कालीन परिस्थितीचे भान ठेवताना या ऐतिहासीक सनदाचे महत्त्व होते. छ. शाहू यांनी ज्या स्वराज्यावर हक्क सांगितला होता. तो भाग सरकार व कोल्हापूरकरांच्या ताब्यात होता. त्यात अंतर्गत व बाह्य विरोधक मोठे होते. जवळ ना शस्त्र, ना पैसा, ना सैन्य अशावेळी सत्ता सुरळीत राहण्यासाठी सनदाचा आधार आवश्यक होता व विरोधकावर याचा हत्यारासारखा उपयोग होईल अशी जाणीव छ. शाहू महाराजाची होती. परंतु याला मांडलिकत्वाचे संकट येवू दिले नाही. यातच त्यांचे चातुर्यपणा दिसून येतो.
- तत्कालीन मोगलराजे, इतर सत्ताधीश, सरदार, जहागिरदार केवळ साम्राज्यविस्तार व भोगविलासात राहत होते. छ. शाहू महाराज मात्र प्राप्त परिस्थितीतील शारीरिक श्रमाची सवय नसतानाही व लहानपण ऐष आरामात गेले असतानाही भोगविलासात मग्न न होता सतत कार्यरत राहणे, मराठ्यांचे साम्राज्य वृद्धींगत करणे व ते राज्य लोककल्याणकारी कसे होईल याकडे त्यांनी विशेष लक्ष दिले. विशेषत: वैयक्तिक स्वार्थापेक्षा जनकल्याणास महत्त्व दिले. लष्करी व मुलकी कारभारासाठी हुशार मंडळीची नेमणूक केली. त्यांच्या जोडीला कार्यक्षम माणसे देऊन शासकीय यंत्रणा शिस्तबद्ध व कार्यक्षम केली. रयतेवर जुलूम होणार नाही. याची काळजी घेतली ओसाड प्रदेशाची वस्ती करणे, धामधुमीच्या प्रसंगी रयतेस सवलती देणे, वाढलेली धारा कमी करणे,नवीन धारेबंदी करून देणे, मंदिरे बांधली इ. शिवाय त्यांनी अनेक दानधर्म केले, बाजारपेठा बसविल्या. यासंबंधी अनेक कागदे मोठ्या प्रमाणात उपलब्ध आहेत. आज वावरणारी अनेक घराणी व त्यांची इनामे, उत्पन्ने, बहुतेक छ. शाहू कालीन असून त्यांचाच ठसा महाराष्ट्रावर कायमचा उमटलेला दिसतो. एकूण त्यांचे आयुष्य प्रजेच्या सुख-दु:खाकडे पाहणे, त्यांच्या समस्या सोडविणे, राज्याची वृद्धी करणे, सरदारांचे तंटे सोडविणे व राज्यकारभार कार्यक्षम बनविणे यातच गेले. यावरुन छ. शाहू महाराज यांचे गुण सहज नजरेत येतात. अकबर, छ. शिवाजी महाराजासारखी त्यांची राज्यव्यवस्था उत्कृष्ठ

नव्हती, परंतु वाईटही नव्हती. त्यामुळे छ. शाहू महाराज असेपर्यंत मराठ्यांचे साम्राज्य सतत वृद्धिंगत होत राहिले.

- छत्रपतीपदी स्थायिक झाल्यानंतर छ. शाहू महाराजांनी राज्यकारभारास सुरुवात केली. राजदरबारातील विविध जागेवर योग्य व्यक्तिच्या नेमणूका कायमच्या केल्या. त्यांच्या राजदरबारात राजकीय मुत्सद्दी वं प्रभावळ याच बरोबर विविध क्षेत्रातील विद्वान मंडळी, वकील, कवी, संत, पंडित, ज्योतिष्य, कारागीर, कलाकार, नाईक व भाट इ. समावेश होता. थोडक्यात ते लोक संग्रहक राजे होते. नाना प्रकारच्या लोकास भजनी लावून त्याच्याकडून राष्ट्रीय कामे घेतली. त्यांच्या सहाय्यक मंडळीत शेकडो माणसे असे सापडतात की, त्यांचे हुकूम अडविण्यात धन्यता मानीत. बाळाजी विश्वनाथ, धनाजी जाधव, ज्योत्याजी केसकर, विरुबाई, बाळाजी बाजीराव, बळवंतराव कासुरडे, विठोबा बोजे, इंद्राजी कदम, सुपेकर, शेरया वाघजी संकपाळ, हुजरे सायाजी फडतरे, मंगोजी हुकेवारदार, गदाधर बल्लाळ, खंडो बल्लाळ, नागोराम इ. किती तरी एकनिष्ठ सेवक त्यांच्यापाशी असत. भिन्न प्रवृत्तीच्या माणसांना संभाळून कामे करवून घेणे हे छ. शाहू यांचे चातुर्य हा पैलू फारच थोड्या लोकांत दिसून येतो.

तसेच भिन्न प्रकृतीच्या व भिन्न लायकीच्या व्यक्तीस एका कार्यक्रमात गोवून त्याजकडून कामगिरी करवून घेणे हे अवघड काम शाहू इतके दुसऱ्या कोणी सिद्धीस नेले नाही. सर्वांकडून त्यांनी घडेल ती सेवा घेतली. अनेक जांबाज व्यक्ती युक्तीने वठणीस आणल्या. परशुरामपंत प्रतिनिधी, दमाजी थोरात, उदाजी चव्हाण, उदाजी पवार, प्रत्यक्ष चुलती ताराबाई व संभाजी, चंद्रसेन जाधव, जानोजी निंबाळकर अशा अनेक व्यक्ती दाखविता येतील की, त्या विरोधी असूनही छ. शाहू यांच्या भजणी लागल्या होत्या किंवा निदान निरुपद्रवी बनल्या होत्या. प्रत्यक्ष ज्यास सजा भोगावी लागली असा एकच इसम कान्होजी भोसले दिसतो पण त्याचेही छ. शाहू यांनी वाईट केले नाही. त्याची घरच्यासारखी उत्कृष्ठ व्यवस्था ठेवली होती. यातूनही त्यांचा वेगळा असा पैलू नजरेस येतो.

- राष्ट्रात हजारो नवीन कर्तबगार माणसे निर्माण केली हे छ. शाहू यांचे कार्य ही आज चिरस्मरणीय गोष्ट झाली आहे. हजारो कुटुंबे सर्व जातीची व सर्व वर्गातील छ. शाहू यांच्या प्रोत्साहनाने पुढे आली. त्याच्याच कर्तबगारीने मराठ्यांचा आजचा इतिहास बनलेला आहे. कोणत्या ना कोणत्या रुपाने ती कुटुंबे अद्यापी पूर्वजांच्या उद्योगाचे फळ उपभोगीत आहेत. छ. शाहू यांनी दिलेल्या सनदाच आपल्या पुढे हजारानी मोजण्यासारख्या आहेत. त्याच महाराष्ट्राच्या कर्तबगारीची साक्ष पुरवितात.

- छ. शाहू महाराज यांच्याकडे सर्वात महत्त्वाचा गुण होता तो म्हणजे समय सुचकता व भावी काळाची पावले ओळखण्याची जाण व त्यानुसार धोरणात लवचिकता आणणे. छ. शाहू व सवाई जयसिंग औरंगजेबाच्या पदरी एकत्र वाढले, पुढे पत्रांद्वारे व वकिलांच्या द्वारे त्यांचे दळण-वळण अखेर पावेतो कायम राहिले. मोगल बादशाहीच्या ऱ्हासाच्या काळात या दोन प्रमुख राजपुरुषांनी संगनमतांनी वागून राष्ट्रकार्य बजावले. बादशहा व त्याचे उमराव, राजदूत सत्ताधिश, बाजीराव, निजाम अशाच्या हर्षामर्षातून राष्ट्रोदयाचा मार्ग ठरविला हे लक्षात घेता हिंदू व मुसलमान या उभय समाजाचे प्रेम संपादून त्यांनी निर्वैरत्वाच्या पायावर राजकारणाची उभारणी केली. छ. शाहूंनी तंजावर पासून दिल्ली पर्यंत राज्य वाढविले हे कृत्य नेभळ्या व नि:सत्य मनुष्याकडून होणे शक्य नव्हते. त्यांच्याकडे समय सुचकता, दूरदृष्टी व लवचिकता हे गुण असल्याने हे शक्य झाल्याचे दिसून येतात.

- मराठी राज्याचे ध्येय व ते साधण्याचे मार्ग छ. शाहू यांनीच आपल्या दीर्घ कारकिर्दीत ठरविले. त्याची छाप अखेरपर्यंत महाराष्ट्रावर बसली. हे ध्येय त्यांनी स्वयंस्फुर्तीने व अंत:करण प्रवृत्तीने ठसून एकंदर राष्ट्रास सौजन्याचा धडा घालून दिला. त्याचे हे ध्येय स्वार्थाचे नसून केवळ चित्तशुद्धीचे होते. 'महाजनो यंन गत: सपन्या:' या न्यायाने सर्व राष्ट्राला त्यांनी विशिष्ट वळण लावून, दुटप्पी प्रवृत्तीपासून बहुदा अलिप्त ठेवले. छ. शाहूच्या या अहिंसा वृत्तीची अनेक उदाहरणे आहेत. सुड व प्रतिकार या भावना छ. शाहू यांनी नाहिशा केल्या व उदार वागणूक ठेवली.

- छ. शाहू महाराज यांनी आपल्या (मराठेशाहीच्या) ध्येयपूर्तीसाठी राज्यांतर्गत क्रांतीच्या राज्यकारभाराचा अवघड मार्ग अवलंबविला. शत्रू मित्राच्या मेळाव्यात राहून हे

राजकारण साधावयाचे असते. त्यासाठी सावधानता आवश्यक असते. मित्रांना जितका आधार तितकाच शत्रूला धाक, ध्येय सिद्धीसाठी शत्रूसही हात मिळवणी करताना घ्यावी लागणारी आवश्यक ती दक्षता घ्यावी लागते याचे उत्तम उदा. औरंगजेबाच्या कैदेत असताना आपल्या मृदू व शांत स्वभावाने आपण औरंगजेबाशी एकनिष्ठ आहोत हे दाखविले. म्हणजे मोगलांना शह देण्यासाठी निजामाशी हात मिळवणी करणे. तसेच कर्नाटकात वर्चस्व निर्माण करताना निजामाशी संगणमत करणे होय. नेहमीच संकटाला तोंड देण्याची सिद्धता आणि विशेष म्हणजे आपल्या ध्येयनिष्ठे बाबत जनतेत अंकुरित केलेल्या आदराची जोपासना या सारख्या कितीतरी प्रसंगांना कुशलतेने तोंड देवून राजकारण साधावे लागते. हे काम अत्यंत अवघड आणि जोखमीचे असते. शत्रूशी सख्य झालेच पाहिजे म्हणजेच त्यांच्या मनात जागृत असणाऱ्या संशयवृत्तीचे आपल्या आचरणाने जसे शमन करणे आवश्यक असते तसेच मित्राच्या सानिध्यात वावरत असताना मित्राच्या ठायी शत्रुत्वाचे वारे शिरताच ते आपल्यावर कुरघोडी करणार नाहीत अशी आपल्या वागणुकीत दक्षता घेणे आवश्यक असते. अशा राजकारणात नेहमीच चांगल्या वाईट आंदोलनाचा सामना द्यावा लागतो. त्यास यशस्वीपणे तोंड देण्यातच माणसाची कर्तबगारी दिसून येते हेच सूत्र छ. शाहू यांच्या राजकारणातही अनुभवास येतात.

- छ. शाहू महाराज यांचे उत्तर हिंदुस्थानातील धोरण हे त्यांच्या कारकीर्दीतील उत्कृष्ठ असे भावी राजकारण होते. त्यांनी आपल्या समंजस, शांत स्वभावाला फाट देऊन बाजीरावाच्या उत्तरेतील आक्रमण धोरणास पाठिंबा देवून मराठ्यांच्या राज्याचा विस्तार घडवून आणला. तसेच महत्वाकांक्षी मराठे सरदारांचा अंतर्गत संघर्ष टाळण्यासाठी त्यांना अपेक्षेतील कार्यक्षेत्र नेमून दिले. थोडक्यात अशा परिस्थितीत छत्रपतीचे भरभक्कम स्थान मराठामंडळाच्या दृष्टीने आवश्यक होती

शत्रूशी लढत असताना सुद्धा कधी आग्रहाने एखाद्यास क्रुर शिक्षा केली नाही. सर्वास प्रेमाने वागवून छ. शाहू यांनी आपलेसे केले. मनुष्य जोडावा कसा हे ते जाणत होते. लोकांनी केलेले अपराध साफ विसरून ते त्यांना काम देत असत आणि त्यांनी चांगले काम करून दाखविताच त्यांना मोठमोठी इनामे व बक्षिसे देऊन नेहमी खूष ठेवीत.

वेळ-काळ पाहून कधी त्यांना जरबेने तर कधी प्रेमाने समजावित असत. प्रत्यक्ष मारेकऱ्यांनी येऊन हल्ला केला असता, त्यासाठी त्याजवर शस्त्र उगारण्याची हिम्मत झाली नाही. 'कारभाऱ्यांनी पाहिले तर तुम्हास मारतील शस्त्र ठेवून निघून जा कसे' असे सांगून छ. शाहू यांनी त्यास माफ करू वाटेस लावले. याप्रमाणे अजातशत्रू महाराजास शत्रूसही घाताची इच्छा होऊ नये, असे वाटत होते.

- मोगलांच्या सानिध्यात बालपण गेल्यामुळे त्यांना मोगल राजनिती व उत्तरेतील राजकारणाचा अंदाज असे म्हणूनच बाजीरावाच्या विशाल साम्राज्याच्या कल्पनेला त्यांनी संमती दिली व आपल्या सर्व मंत्री, सरदार यांच्या मोहिमेवर छ. शाहू यांची बारीक नजर व मार्गदर्शन असे. एखादी मोहीम असताना तपशीलवार खलिता साताऱ्याला जाई. तेथून सूचना, आज्ञा येत असत. एक उदा. द्यायचे म्हणजे बाजीराव-निजाम संबंध बिघडले त्यावेळी छ. शाहू यांनी स्पष्ट शब्दात आदेश दिला की, कुठल्याही परिस्थितीत निजामाची मोठ्या प्रमाणात हानी करु नये. ही जबाबदारी आम्ही तुम्हावर सोपवितो. छ. शाहूंना पूर्ण कल्पना होती की, मोगलाई मोडकळीस आली आहे आणि दक्षिणेत जर निजामाचे स्वतंत्र राज्य स्थापले तर बादशहाची सत्ता दक्षिणेत नष्ट होईल. त्याच्या उलट मराठ्यांनीच जर निजामाचा नाश केला तर त्यांना मोगल सत्तेशी उघड लढा द्यावा लागेल. त्यापेक्षा निजामाला काबूत ठेवून मोगल सत्तेला शह देणे शहाणपणाचे होते. दुसरे उदा. द्यायचे म्हणजे 'नादिरशहाच्या स्वारीनंतर जेव्हा छ. शाहू यांनी बाजीरावला मोगल बादशहाच्या मदतीला जाण्याचा आदेश दिला. तेव्हा पूर्वी बाळाजी विश्वनाथाच्या कारकीर्दीत सय्यद बंधूंना मदतीचे जे आश्वासन दिले होते त्याची त्यांनी आठवण ठेवली व मराठे मोगल यांच्यातील वैर जवळ-जवळ नाहिसे झाले होते. जर एखाद्या बाहेरच्या ताकदीने मोगल साम्राज्याचा नाश केला तर उत्तर हिंदुस्थानात प्रतिकार शक्ती नाहीसी होऊन शत्रूची नजर दक्षिणेकडे वळेल. हे छ. शाहू जाणून होते. त्यांचा अनुभव अल्लाउद्दीन खिलजीच्या राजवटीत आला होता. तेव्हा आता अफगाणिस्थानातून येणाऱ्या शत्रूचा मार्ग मोगल साम्राज्याने आडविला तर ते मराठ्यांच्या संरक्षणाच्या दृष्टीने हितावह होते.' जर आपण दुसरा मार्ग पत्करला (चटारचा) तर आपल्याला आसपासच्या राज्याचे शत्रूत्व पत्करावे लागेल आणि त्यामुळे नवीन संकटे निर्माण होतील. त्यापेक्षा मोगल

बादशहालाच सावरुन धरुन आपण साम्राज्याचा भाग अमीर-उल-उमराह ह्या नात्याने आपल्याकडे घ्यावा. 'छ. शाहू यांच्या पत्रावरुन दूरदर्शीपणाची खात्री होईल.'

- छ. शाहू महाराज हे मुत्सद्दी पुरुष होते. याचा पुरावा म्हणजे 'वारणेचा तह' यातून दिसून येते. कोल्हापूरकर संभाजीचे अपराध पोटात घालून छ. शाहू यांनी ऊदार मनाने त्यांच्याशी सख्य जोडले. तसेच छ. शाहू महाराज यांनी बाळाजी विश्वनाथ, बाजीराव आणि नानासाहेब यांच्या कर्तृत्त्वाला व मर्दुमकीला वाव देऊन मराठ्यांचा सत्ताविस्ताराचा यशस्वी प्रयत्न केला. पुढे दाभाडे, रघुजी भोसल्यासारखे मातब्बर सरदार बंड करुन उठले. तेव्हा छ. शाहू यांनी पुढाकार घेऊन आपसातील भांडणे मिटविण्याचा प्रयत्न केला हे कार्य त्यांच्या मुत्सद्दीपणाची साक्ष देते.

- छ. शाहू प्रत्यक्ष लढाईस जात नसत रणांगणावर शौर्य अपवादानेच गाजविले. पण हे गुण ज्यांच्या ठिकाणी होते. त्यास त्यांनी उपयोगात आणले. त्यांच्याकडे 'मनुष्य-गुण' पारखायचे गुण होते. चिटणीस बखरीत याबद्दल माहिती मिळते. मनुष्य मात्रास कृपाममता लावून वेध लाविला. सर्वास वाटावे की, आपले इतकी कृपा कोणावरही नाही. तैनाती नेमणुका, जमिनी, इनामे, ज्याच्यापासून ज्या कामात उपयोग त्यात एखादा अवगुण आहे, तरी युक्तीने झाकून तो त्याजपासून सोडवावा गुण तितका प्रकट करून घ्यावा. माणसे वाढवावी यथास्थित संगोपन करून माणसाचा गुणग्रहणच बहुत केला. आपलेसे करून वेधास लाविले. प्रौढ माणसे सर्व काळ सहवासात असावी. त्यांच्या युक्ती व बुद्धी ऐकत असावे. सर्वांचा विचार विचारून कार्य करीत असावे.''

याचप्रमाणे परराज्यात गेलेल्या स्वकीय लोकांना परत स्वराज्यात आणून त्यांच्यावर कामगिऱ्या सोपविल्या. योग्य व्यक्ती योग्य कामास लावून व त्याच्याकडून ते काम करवून घेण्याची हातोटी छ. शाहू महाराज यांच्याकडे होती. म्हणूनच त्यांना 'उत्तम मनुष्य गुण पारखी म्हणत असत.

- छ. शाहू महाराज यांच्या कारभाराचा स्मरणीय गुण म्हणजे 'प्रजाहितासाठी झटणे' हा होय. त्यांनी प्रजेच्या सुख-दु:खात भाग घेतला प्रजेचे प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला. स्वराज्य हितासाठी जी मंडळी कामास आली त्यांना इनामे, जहागिरी दिल्या. उदा संताजी विन कान्होजी पासलकर यांना दि २६ मार्च १७३१ रोजी दिलेले इनाम असा की, राजा

शाहू छत्रपती यांनी विन कान्होजी पासलकर यास पत्र लिहिले त्यात म्हटले की, तुझे वडील विशालगडाच्या स्वारीवर ठार झाले, तुझा संसार सुरळीत चालण्यासाठी मोजे मुगाव व मोजे गडले थेरली पेसजीची जमीन इनाम देत आहे. त्याचप्रमाणे छ शाहू महाराजांनी सरकारची किंवा नौकरचाकरांची लग्ने जुळवून ती स्वत: सिद्धीस नेली व गोर गरिबास सढळ हाताने मदत केली. यातून सामाजिक कार्य करण्याचा प्रयत्न केला

- छ. शाहू यांच्या जीवनकार्यातील आणखी एक पैलू म्हणजे न्याय देताना किंवा शिक्षा देताना ते भेदभाव करत नसत, तो आपला असो की परका असो, ब्राम्हण असो, की इतर जातीचा सर्वांना समान न्याय होता. उदा एक वेळ त्यांनी त्यांच्या बहिणीचा नवरा यास सुद्धा जरब दिला उदा शंकराजी महादेव तारळेकर याने आपल्या इनाम गावातील रयतेवर जुलूम केला. त्याचा निषेध करून जरब दिल्याबद्दलचे पत्र आहे. त्यातून रयतेविषयीचा न्यायी दृष्टिकोन दिसून येतो

- लोकांना संघटित करण्यासाठी काहीतरी आधार घ्यावा लागतो, पण धर्मश्रद्धा, राजनिष्ठा व देशप्रेम अशा कोणत्यातरी पायावर संघटित झालेले लोकांचे संघटन टिकून राहते. धन्यासाठी संघटित झालेल्या लोकांची राजनिष्ठा धन्यासोबतच संपुष्टात येते असे धनी पडले की हे सैनिक नवीन धनी शोधतात. परंतु छ शाहू महाराजांनी आपल्या सरदारात सैन्यात राष्ट्रप्रेम व राजनिष्ठा निर्माण केली व मराठ्यांच्या सत्तेचे साम्राज्यात रुपांतर केले. पण पुढील छत्रपतीची निष्ठा निर्माण न करु शकल्याने गोंधळ उडून साम्राज्याचा नाशास ते कारणीभूत ठरले

- छ. शाहू महाराज हे मराठ्यांची सत्ता समर्थपणे चालवू लागल्याने आपल्या घराण्यातील परंपरेनुसार परधर्म सहिष्णुतेचे तत्त्व स्वीकारले असले, तरी ते स्वधर्माच्या स्वातंत्र्याच्या आड येणारे नव्हते. याचे उत्तम उदा म्हणजे त्यांनी गोवधबंदीची दिलेली आज्ञा. औरंगजेबाच्या कैदेत असताना हिंदू परंपरेप्रमाणे शिजवलेले अन्न न खाणे तसेच ब्रम्हेंद्रस्वामी, कचरेश्वर बाबा, ठाकूरदास बाबा, गोसावी, रामदासी अशा कित्येक धर्मगुरुंना आदरपूर्वक राज्यनगरीत आणून त्यांचे धर्माशीर्वाद स्वीकारले सय्यद अतावाला पिरणारे शंकरकोटी हे भले थोर सत्कर्मीरत याजकरिता स्वामी कृपाळू होऊन त्यास भीजे लोणी गाव इनाम दिले'' यावरुन ते मुस्लिमासही देणगी देत असे त्यांनी हिंदू-मुस्लिम

असा भेदभाव कधीच केला नाही सर्वांना अत्यंत समानतेने वागविले तसेच ख्रिस्ती धर्मियांसही त्यांचा आश्रय व असाच समभाव होता. वसई घेतल्यावर कोकणातील ख्रिस्तीवाद्यांचा छ. शाहूने उच्छेद केला नाही, उलट त्यांचा योग्य परामर्श घेतला. 'मानवी समता' त्यांच्या स्वभावातच भिनलेली होती.

- छ. शाहू महाराज यांनी आपल्या जीवन कार्यात मराठेशाहीच्या हिताबरोबरच आपला स्वाभिमान व वैभव सांभाळले. स्पर्धेत टिकण्यासाठी धन, हत्यारे, सैन्य, प्रभावळ व जहागीर कायम अबाधित ठेवली. कारण साम्राज्य निर्मितीसाठी या सर्व गोष्टीची आवश्यकता आहे.

- छ. शाहू महाराज यांच्या कर्तबगारीचा दुसऱ्या एका दृष्टीने विचार सूचतो तो असा की, बंगाल, मद्रास प्रमाणे महाराष्ट्र भागाचा अंत अठराव्या शतकाच्या मध्याच्या वेळी न होता. पुढील काळात मराठेशाहीचे पानिपत, खर्ड्यासारख्या युद्धात पराक्रम गाजवून आणि आपले नाव इतिहासात अजरामर करुन इतराहून पाऊणशे वर्षे जास्त टिकाव धरला. त्याचे पुष्कळ श्रेय छ. शाहू यांच्या शांत व प्रोत्साहक राजनितीला दिले पाहिजे. हिंदुस्थानातील सर्व प्रांताची व राज्याची आंतरर्बाह्य अधोगती धुमधडाक्याने चालली होती. परिस्थितीची टक्कर देऊन पाचशे वर्षात क्वचित एखादे छ. शिवाजी महाराज निवडले. प्रचंड मोगल बादशाही उलथून पडून पाश्चात्यांची त्यांची हळुहळु सरशी होत चालली होती. अशा संकट प्रसंगी १८व्या शतकाच्या प्रथमार्घात मराठी राज्यात छ. शाहू यांनी नवीन जोम उत्पन्न केला आणि हिंदुस्थानभर मराठ्यांच्या नावाचा दरारा बसविला.

- छ. शाहू यांचा प्रकाशात आलेला नवीन पैलू त्यांचा साधेपणा होय. ते आपल्या संपूर्ण जीवनात अत्यंत साधेपणाने राहत होते. तसेच त्यांचा स्वभावही नम्रभावी होता. त्यांनी थोर व मोठ्या लोकांचा आदरच केला. याचे उदा. त्यांची साधी राहणी, साधे जीवन, संताबाबतची आदराची भावना, अखेरच्या काळात तर ते साताऱ्याबाहेर नदीच्या काठी 'तृणघट' बांधून राहू लागले त्याला 'वणवासवाडी' असे नाव पुढे मिळाले. त्याच्या या स्वभावामुळे त्यांना 'पुण्यश्लोक' म्हणतात.

- छ. शाहू यांचा मौलिक गुण म्हणजे वक्तृत्त्व कौशल्य होय. त्यांच्या मधुर, प्रेमळ भाषणामुळे सर्व स्वकीय व विरोधक लुब्ध होत असत. त्यामुळेच ते त्याच्या संपूर्ण

जीवनात बाळाजी विश्वनाथ, विरुबाई, खंडो बल्लाळ, बाजीराव, नानासाहेब या स्वकीयांबरोबरच निजाम, ताराबाई, औरंगजेब, झेबुन्नीसा, झुल्फिकारखान, बंधू संभाजी यांचे सुद्धा प्रेम संपादले.

- छ. शाहू यांच्या स्वभावातील ठळक गुण लक्षात येतात. ते गुण म्हणजे त्यांची फिनिक्स पक्षाप्रमाणे राखेतून उठून भरारी घेण्याची वृत्ती म्हणजे शुन्यातून विश्व निर्माण करण्याची प्रवृत्ती व सर्वांच्या विचारे विमर्ष करुन आपले धोरण चालविण्याचा स्वभाव होय.

सर्वात महत्त्वाचा गुण जो इतरत्र सहसा आढळत नाही, तो म्हणजे त्यांना चांगले लिहिता-वाचता येत होते, कारण त्यांचे स्वअक्षरातील बरेच पत्र उपलब्ध आहेत. बरीच पत्रे

- मराठ्यांचे साम्राज्य निर्माण करण्याची प्रेरणा आणि सहाय्य त्यांना छ. शिवाजी महाराज व छ. संभाजी महाराज यांच्याकडून मिळाली. छ. शाहू महाराज यांच्या राजकीय कार्याचे श्रेष्ठ शिखर म्हणजे मराठ्यांचे साम्राज्य निर्माण करण्याचे पूर्वजाचे स्वप्न तयांनी प्रत्यक्षात आणले व मोगल सत्तेला थोपविले.

- छ. शाहू महाराज यांनी शहाजीराजे भोसले, छ. शिवाजी महाराज व छ. संभाजी महाराज यांच्याप्रमाणे अखिल हिंदुस्थानातील मराठ्यांचे महत्त्व जाणले होते, मराठ्यांच्या सहकार्याशिवाय दिल्लीची मोगलशाही सत्ता टिकू शकत नाही हे छ. शाहू महाराज यांनी ओळखले होते. छ. शाहू महाराज यांना स्वत:च्या कार्य कर्तृत्वाची व मर्यादेची जाण होती आणि त्याच्या बळावरच त्यांनी मोगल, निजाम, कोल्हापूरकर- संभाजी व इतर सत्ताधीश यांच्या दरबारात वर्चस्व प्रस्थापित करून पूर्ण हिंदुस्थानात पुन:मराठ्यांचा दरारा निर्माण करून मराठ्यांच्या मनात आत्मविश्वास व आत्मभान निर्माण केला.

- समाजातील सामाजिक परिस्थिती आणि धर्म उदात्तीकरणाच्या दृष्टिकोनातून शाहू महाराजांच्या कार्यकर्तृत्वाचा उपयोग प्रचलित समाजासाठी सद्यस्थितीमध्ये महत्त्वाचे ठरतील. समाजात जी अस्थिरता निर्माण झालेली आहे, त्या अस्थिरतेचा समतोल राखण्यासाठी त्यांचे मौलिक विचार आज निश्चितच उपयोगी पडतील.

छ. शाहू यांच्या स्वभावामुळे त्यांना 'अजातशत्रू' म्हटले जात असे निजामउल्मुल्कचा नातू मुजफरजंग यांचे छ. शाहू विषयी उद्‌गार निघालेले आहेत ते

असे, ''मोगलाहून निजामुउल्मुल्क मऱ्हाट राज्यात शाहू राजे होते. ऐसे माणूस पुढे होणार नाहीत. सर्व राज्य पेशव्यास सोपून गेले, छत्रपतीसारखा राजा होणे नाही, 'अजातशत्रू होते.' मृत्यूचे वर्तमान ऐकल्यावरचे हे शब्द आहेत. यावरून 'अजातशत्रू' म्हणजे ज्यांची सर्वाभुतांचे ठायी समदृष्टी राहिली अशा कोटीत छ. शाहूची गणना मुसलमानांनी देखील केलेली दिसून येते.

यावरुन छ. शाहू महाराज यांच्या व्यक्तिमत्त्वाचे काही वैशिष्ट्यपूर्ण पैलू म्हणजे त्यांची प्रखर बुद्धिमत्ता, चातुर्यपणा, सामर्थ्य, दूरदर्शीपणा, शौर्य लढवय्यापणा, धाडस, आत्मविश्वास, आत्मभान, राष्ट्रीयबाणा, धर्मनिष्ठा, न्यायनिष्ठा, समयसूचकता, सर्वधर्मसमभाव वृत्ती दिसून येतात. याचबरोबर त्यांची राजनिती, धुर्तपणा, माघार घेण्याचे तंत्र, मनुष्य स्वभावाची पारख, लोकसंग्रहक अन्यायाविरुद्ध झगडे, मोठ्यांचा आदर करणे, उदार निती इत्यादीच्या जोरावर त्यांनी मराठ्याचे साम्राज्य निर्माण करून यशस्वीपणे टिकविले. हेच त्यांच्या जीवन कार्याचे फलित होय. मराठ्यांचे साम्राज्य निर्माण करण्याचे जे स्वप्न छ. शिवाजी महाराज, छ. संभाजी महाराज, छ. राजाराम महाराज, मातोश्री येसूबाई, ताराबाई यांनी पाहिले ते पूर्ण करण्यासाठी छ. शाहू महाराज आयुष्यभर झटले. अतितटीच्या प्रसंगी आपले स्वस्पर्धक कोल्हापूरकर संभाजी व इतर सरदार मंडळींच्या पाठीशी खंबीरपणे उभे राहिले.

**नवी सैद्धांतिक मांडणीः-**

अखिल भारतात तीन चार शतके ठाण मांडून बसलेला परदेशी इस्लामी सत्तेला अलगद पाडण्याची व राज्यक्रांती घडवून आणण्याचा मान महाराष्ट्राला मिळाला. या राज्यक्रांतीचे नेतृत्त्व भोसले घराण्यातील शहाजीराजे, छ. शिवाजी महाराज, छ. संभाजी महाराज, छ. राजाराम महाराज, महाराणी ताराबाई यांनी केला. पुढे त्यांचे साम्राज्यात रुपांतर करण्याचा यशस्वी प्रयत्न छ. शाहू महाराज यांनी केला. म्हणूनच 'मराठ्यांच्या इतिहासात' छ. शाहू यांचे कार्य प्रभावी असल्याचे दिसून येते.

जसे शहाजीराजे 'स्वराज्य संकल्पक' ठरतात तसेच छ. शिवाजी महाराज 'स्वराज्य संस्थापक' ठरतात त्याचप्रमाणे छ. शाहू महाराज हे पुढील कालखंडात मराठी ज्ञ साम्राज्याचे प्रवर्तक ठरतात.

छ. शाहू महाराज यांच्या जीवनकार्याचा चिकित्सक अभ्यास केला असता, त्यांच्या व्यक्तीमनावर जीवन कार्याचा पैलूंवर प्रकाश टाकता आला. मराठ्यांच्या सार्वभौमत्वासाठी अहोरात्र झटणारे स्वाभिमानी, स्वधर्मभिमानी, राजनिती कुशल, पराक्रमी दूरदर्शी छ. शाहू महाराज मराठ्यांच्या साम्राज्य निर्मितीसाठी सर्वस्व पणाला लावून आपले आयुष्य वेचले. छ. शाहू महाराज यांच्या ठायी काही दोष नव्हते असे नाही. परंतु तत्कालीन समजुतीप्रमाणे त्याचेही वर्तन होते. त्यांनाही काळाचे बंधन होते. परंतु तत्कालीन संघर्षाच्या काळात एवढया योग्यतेचे मनुष्य निपजले होते. त्यांच्या हातून काही दोष घडलेही असतील परंतु त्यांच्या ठायी कायम म्हणण्यासारखे दोष नव्हते व ते दुर्व्यसनांपासून मुक्त होते हे निर्विवाद आहे. मराठ्यांच्या इतिहासात अनेक मुत्सद्दी झालेत परंतु एकाच ठिकाणी अनेक गुण असणारी व्यक्ती तुरळक व छ. शिवाजी महाराज यांच्यासारखी तिथ्य दूरदृष्टी, तडफ शौर्य नसले तरी त्यांच्या परंपरेला शोभेल असे धर्माभिमान, राजकुशल निती, मृदू स्वभाव हे गुण होते. अशा कर्तबगार माणसाच्या उणिवांमुळेच ऐश्वर्यास चढलेल्या मराठी साम्राज्याच्या छत्रपतीपदाची छ. शाहू महाराज यांच्या मागे थोडयाच काळात अवनिती झाली, छत्रपती नामधारी बनले. म्हणूनच हा पुरुष नसता तर औरंगजेबाच्या मृत्यूनंतर जी मराठी राज्यात स्वार्थी दृष्टी वाढली होती, त्यात मराठी राज्य लयास गेले असते. मराठी स्वराज्याचे, साम्राज्यात रुपांतर झाले नसते. येथे महाराणी ताराबाई व इतर मुत्सद्दी मंडळाचे कार्य नाकारण्याचा हेतू नाही. या सर्वांचा सहभाग मान्य करुनही छ. शाहू महाराज नसते काय? हा प्रश्न उरतोच म्हणून मराठ्यांच्या इतिहासातील छ. शाहू महाराज यांचे कार्य उल्लेखनीय ठरले आहे.

# संदर्भ सूची


| | | |
|---|---|---|
| १) | अप्पासाहेब पवार (संपा.), | ताराबाईन कागदपत्रे, खंड-१,२,३, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर, १९६९. |
| ३) | आवळकर शा. वि., | रायगडची जीवनकथा, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई, १९६२. |
| ४) | आपटे द. वि., जोशी श. न. (संपा.), | इतिहास मंजिरी निवडक ऐतिहासीक उतारे, गुप्ते दप्तर. |
| ५) | आपटे द. वि. आणि केळकर न. चि., | शिवचरित्र-निबंधावली, अनुक्रम-२, श्री शिवचरित्र, कार्याशाळा पुणे, शके १८५१. |
| ६) | आपटे द. वि., | महाराष्ट्र इतिहास मंजिरी अथवा निवडक इतिहास उतारे, (पूर्वार्ध),चित्रशाळा प्रेस, पुणे, १९२३. |
| ७) | आपटे द.वि. (संपा.), | शिवचरित्र प्रदीप, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १९२५. |
| ८) | आपटे द.वि., दिवेकर सा.म. (संपा.), | शिवचरित्र प्रदीप, पुणे, शके १८४७. |
| ९) | इ. सं. शंकरराव जोशी सरकार समिती (संपा.), | मराठे-कालीन समाज दर्शन, अनाथ विद्यार्थी प्रकाशन, पुणे,१९६०. |
| १०) | ओतूरकर रा. वि., द. वि. (संपा.), | महाराष्ट्राचा पत्ररुप इतिहस, भारत इतिहास आपटे संशोधन मंडळ, पुणे १९४१. |
| ११) | ओतूरकर रा. वि., | पेशवेकालीन सामाजिक व आर्थिक पत्रव्यवहार, भा. इ. सं.मं., पुणे, १९५०. |
| १२) | ओक प्रमोद, | पेशवे घराण्याचा इतिहास, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, १९२५. |
| १३) | ओक. शि. का. आणि लेले का. कृ., | धार संस्थानचा इतिहास, कचेरी संस्थान, धार,१९३४. |

१४) एशियांटीक सोसायटी ऑफ बंगाल (संपा.), तारीखे खाफीखान, १८७४.

१५) कोलालकर शि. गो., मराठ्यांचा इतिहास, मंगेश प्रकाशन, नागपूर, १९८१.

१६) कुंटे भ.ग. (भाषांतकार), औरंगजेबाचा इतिहास (A short History of Aurangjeb) महाराष्ट्र राज्य संस्कृती, मंडळ, मुंबई, १९७८.

१७) कानेटकर वसंत, शिवशाहीचा शोध, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई, १९९७.

१८) कुलकर्णी अ. रा., खरे ग. ह. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड-१, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९८४.

१९) कुलकर्णी अ. रा., "शिवकालीन महाराष्ट्र", मराठ्यांचा इतिहास, खंड-१, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ, नागपूर, १९८४.

२०) कुलकर्णी अ.रा., खरे ग.ह. (संपा.), मराठ्यांचा इतिहास, खंड-२, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, १९८५.

२१) करकरे द. बा., मराठ्यांचा इतिहास, भाग-३, लोकमित्र हॉफीसी, खानपूर, १९२४.

२२) काळे या.मा. (संपा.), नागपूर भोसले बखर, मध्यप्रांत संशोधन मंडळ, नागपूर, १९३६.

२३) कर्वे इरावती, मराठी लोकांची संस्कृती, देशमुख अँड कंपनी, पुणे, १९५७.

२४) खरे बा. वा., इचलकरंजी संस्थानाचा इतिहास व इचलकरंजी दप्तरांतील निवडक पत्रे यादी, आर्यभूषण छापखाना, पुणे, १९१३.

२५) खरे ग. ह. (संपा.), ऐतिहासीक फारसी साहित्य, खंड-४, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, शके १७४९.

२६) खरे ग. ह., इतिहासकर्ते मराठे, पुणे, १९४७.

२७) खाबडे दिनकर, मराठ्यांचा इतिहास, कैलाश पब्लिकेशन, औरंगाबाद, १९९१.

२८) खेडकर सुशीला, शिवस्तुबो महाराणी येसूबाई, उन्मेष प्रकाशन, पुणे, १९९३. स्नुषा

२९) खोबरेकर वि. गो., महाराष्ट्राचा इतिहास, मराठा कालखंड (भाग-१) शिवकाळ (१६३०-१७०७), महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, २००६.

३०) खोबरेकर वि. गो., तारिखे दिल्कशा (इंग्रजी), मुंबई, १९७२.

३१) गर्गे स. मा., करवीर रियासत, श्री. शहाजी छत्रपती म्युझियम ट्रस्ट, कोल्हापूर, २००३.

३२) गर्गे स.मा., इतिहासाचा सामाजिक वेध, मानसन्मान प्रकाशन, पुणे, १९९५.

३३) गोखले कमल, शिवपुत्र संभाजी, (साधार, विवेचनात्मक चरित्र), ज्ञान-विज्ञान विकास मंडळ, पुणे, १९७१.

३४) गोगटे चि. ग., छत्रपती थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, नवीन किताबखाना, पुणे, १८९३.

३५) गायकवाड, हनमाने, सरदेसाई (संपा.), इतिहास लेखनशास्त्र, फडके प्रकाशन कोल्हापूर, २००१.

३६) घाटोळे रा.ना., समाजशास्त्रीय संशोधन, तत्त्वे व पद्धती, श्री मंगेश प्रकाशन, नागपूर, २००३.

३७) चिटणीस कृ. ना., मध्ययुगीन भारतीय संकल्पना व संस्था, भालचंद्र प्रिंटींग प्रेस, पुणे, २००३.

३८) चौबळ ज. स., असे होते मोगल, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९७४.

३९) जयसिंगराव पवार, महाराणी ताराबाई, ताराराणी विद्यापीठ, कोल्हापूर, १९७५.

४०) जयसिंगराव पवार, शिवछत्रपती एक मागोवा, सुमेरु प्रकाशन, डोंबिवली, २००५.

४१) जयसिंगराव पवार (संपा.), छत्रपती संभाजी महाराज स्मारक ग्रंथ (प्रस्तावना), कोल्हापूर, १९९०.

४२) जयसिंगराव पवार, सेनापती संताजी घोरपडे, मंजुश्री प्रकाशन, कोल्हापूर, १९८७.

४३) जयसिंगराव पवार, मराठेशाहीचा उदय आणि अस्त, मंजुश्री प्रकाशन, कोल्हापूर, १९९३.

४४) जेधे शकावली, शिवचिरत्र प्रदिप, पुणे, १९२५.

४५) जोशी श. ना., सेनापती दाभाडे दप्तर, भाग-१, (इ.स. १५०१ ते १८०६), भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १९५१.

४६) जोशी श. ना., रामचंद्रपंत अमात्य आज्ञापत्र आणि राजनिती, कॉन्टीनेंटल प्रकाशन, पुणे, १९६०.

४७) जोशी श. ना., मराठेकालीन समाज दर्शन, अनाथ विद्यार्थी गृह, पुणे, १९६०.

४८) जोशी श. ना. (संपा.), संभाजीकालीन पत्रसार संग्रह, भारत इतिहास संशोधन मंडळ, स्वीय ग्रंथमाला, पुणे, १९४९.

४९) जोशी श. ना. आणि पुरंदरे कृ.बा. (संपा.), मराठ्यांच्या इतिहासाची साधने, धुळे, राजवाडे संशोधन मंडळ, १९४१.

५०) जोशी. त. ल. (संपा.), राजवाडे लेखसंग्रह, साहित्य अकादमी, १९८४.

५१) जोशी लक्ष्मणशास्त्री (संपा.), मराठी विश्वकोश, म.रा.सा.सं. कोश, मुंबई, १९७७.

५२) थोरात मा. भी. (संपा.), ऐतिहासिक सनदा व पत्रे, इतिहास संशोधन मंडळ, दादर-मुंबई, १९७३.

५३) देशपांडे सुधाकर, मराठ्यांचा इतिहास (उदय-उत्कर्ष-अस्त), शारदा प्रकाशन, नांदेड, १९७५.

५४) देशपांडे प्र. न., अर्वाचीन भारत, कॉन्टिनेंन्टल प्रकाशन, पुणे, १९७६.

५५) देशपांडे प्र. न., ''शाहुचे आगमन आणि बाळाजी विश्वनाथ'', मराठ्यांचा इतिहास, खंड-२, १९८५.

५६) देशमुख शारदा, शिवकालीन व पेशवाईतील स्त्री-जीवन, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे, १९७३.

५७) दळवी गो. दा., मराठ्यांच्या कुळाचा इतिहास, मुंबई, १९१२.

५८) नंदुरबारकर पां. रा., दांडेकर कु. रा. (संपा.), शिवदिग्विजय बखर, बडोदा, शके १८१७.

५९) नातु वी. र., माधवराव उर्फ महादजी शिंदे यांचे चरित्र व कारकिर्द, बेळगाव समाचार, बेळगाव, १८९४.

६०) पारसनीस द. ब. (संपा.), इतिहास संग्रह-२, तुकाराम जावजी, निर्णय सागर प्रेस, मुंबई, १९०९.

६१) पारसनीस द. ब. व पु. वि. मावजी (संपा.), सनदा पत्रातील माहिती, पुणे, १९१३.

६२) पारसनीस द.ब. (संपा.), ऐतिहासीक टिपणे, भाग-१, निर्णय सागर प्रकाशन, मुंबई, १९०८.

६३) पारसनीस द.ब., श्री. महापुरुष ब्रम्हेंद्रस्वामी धावडशीकर, चरित्र व पत्र व्यवहार, बावाजी सखाराम आणि कं., मुंबई, १९००.

६४) पारसनीस द.ब., पेशवे दप्तरातील सनदा पत्रातील माहिती, निर्णय सागर प्रेस, सातारा, १९१७.

६५) पारसनीस द.ब. (संपा.), शाहू महाराजाची बखर, गोविंद खंडेराव चिटणीस, सहसकर प्रेस, पुणे, १९६०.

६६) पारसनीस द. ब. (संपा.), दिल्ली येथील मराठ्यांची राजकारणे भाग १-२, निर्णय सागर प्रेस, पुणे, १९१३.

६७) पाठक अरुणचंद्र (संपा.), महाराष्ट्र शासन राज्य गॅझेटिअर, सातारा जिल्हा, कार्यकारी संपादक व सचिव महाराष्ट्र शासन, मुंबई, १९९९.

६८) पित्रे का. ग., मराठ्यांचा युद्ध इतिहास, इ.स. १६००-१८१८, कॉन्टीनेंटल प्रकाशन, पुणे, २०००.

६९) पुरंदरे कृ. वा., ब्रह्मीभूत शंकराजी नारायण पंतसचिव, पुरंदरे दप्तर, भाग १ ते ४, काशिनाथ श्रीकृष्ण गुप्ते, पुणे, १९४८.

७०) पुरंदरे कृ. वा. (संपा.), पुरंदरे दप्तर, भाग-१, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १९२९.

७१) पंडित भवानीशंकर, महाराष्ट्र जीवनातील स्थित्यांतरे, पुणे विद्यापीठ, पुणे.

७२) पंडित भवानीशंकर, महाराष्ट्र, मराठे आणि मराठी, न. चि. केळकर निबंधमाला, पुणे विद्यापीठ, पुणे, १९६९.

७३) पंडित भवानीशंकर, न. चि. केळकर स्मारक व्याख्यानमाला, महाराष्ट्राच्या जीवनातील स्थित्यांतरे आणि त्यांचा साहित्यावर व संस्कृतीवर झालेला परिणाम, पुणे विद्यापीठ, पुणे, १९६८.

७४) फाटक नरहर रघुनाथ (अनु.), मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९६४.

७५) बाहेकर एस.ए., सिंदखेडकर जाधव घराण्याचा चिकित्सक इतिहास कसब प्रकाशन, जळगाव, २००१.

७६) बेन्द्रे वा. सी., श्री. छत्रपती राजाराम महाराज आणि नेतृत्वहीन 'हिंदवी स्वराज्याचा मोगलाशी झगडा' लोक वाङ्मय गृह, मुंबई, १९७५.

७७) बेन्द्रे वा. सी., श्री. छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र, मनोरमा प्रकाशन, मुंबई, २००१.

७८) बेन्द्रे वा. सी., मालोजी राजे आणि शहाजी महाराज, पुणे, १९६७.

७९) बेन्द्रे वा. सी., (संपा.), राजाराम चरितम्, केशवपंडित कृतम्, (राजाराम महाराज यांचे अथवा जिंजीचा प्रवास), भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १९३१.

८०) बेन्द्रे वा. सी., छत्रपती शिवाजी महाराजांचे चरित्र, पी. पी. एच. बुक स्टॉल प्रकाशन, पुणे, १९७१.

८१) बेन्द्रे वा. सी., श्री. छत्रपती शिवाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र (पूर्वार्ध व उत्तरार्ध), सहकार नगर, मुंबई, १९७२.

८२) बेन्द्रे वा.सी. (संपा.), महाराष्ट्राच्या इतिहासाची साधने, विभाग-२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई, १९६७.

८३) भावे वि. ल., मराठी दप्तर, रुमाल-२, मराठी दप्तर कचेरी, ठाणे, १९३२.

८४) भावे वा. कृ., पेशवे कालीन महाराष्ट्र, भारतीय इतिहास अनुसन्धान परिषद, नवी दिल्ली, १९७६.

८५) भावे वा. ट., शिवकालीन महाराष्ट्र, वरद प्रकाशन, पुणे, १९९८.

८६) भावे वि.ल., मराठी दप्तर रूमाल, भाग-१, मराठी दप्तर कचेरी, ठाणे, १९१७.

८७) भालेराव कविता (संपा.), मराठ्यांची ग्रंथसूची, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९७.

८८) भिमराव कुलकर्णी (संपा.), सभासद बखर, प्रकाशक नंदुरबारकर, पुणे, शके १७८७.

८९) माटे गो. रा., असा घडला सातारा जिल्हा, शनिवार पेठ, सातारा, १९८८.

९०) मीरा मिराशी, महाराणी येसूबाई, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९९९.

९१) मेहेंदळे गं.भा., श्री राजा शिवछत्रपती, खंड-१, पुणे, १९९६.

९२) मोडक बा. पृ., कोल्हापूर राज्याचा इतिहास, भाग-१, शिकाजी हरी सामंत, बेळगाव, १८८६.

९३) मोडक ज.ब., मराठी साम्राज्याची छोटी बखर, ज्ञान प्रकाशन, पुणे, १९८९.

९४) राजवाडे वि. का. (संपा.), मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड-२०, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १९१०.

९५) राजवाडे वि. का., ऐतिहासिक प्रस्तावना, भा.इ.स.मं., पुणे, १९२८.

९६) राजवाडे वि. का. (संपा.), मराठ्यांच्या इतिहासाची साधने (१६८३-१७३९), खंड-१०.

९७) राजवाडे वि. का, भारत वर्ष, मासिक वर्ष-१.

९८) राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड-२२.

९९) राजवाडे वि.का., राधामाधवविलासचंपू, वरदा प्रकाशन, पुणे, १९९२.

१००) वाड. ग. चि., शाहू व पेशवे दप्तर (वतनपत्रे व निवाडा).

१०१) वाड. ग. चि., पारसनिस द.ब., शाहू महाराजांची रोजनिशी, भाग-१, पुणे, १९०६.

१०२) वाड ग. चि. (संपा.), शाहू महाराज यांची रोजनिशी, डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी, पुणे, १९०६.

१०३) वाड. ग. चि., तह व करारमदार, पु. वि. मावजी, निर्णय सागर प्रेस, मुंबई, १९१४.

१०४) वाड. ग. चि., पारसनिस द. ब. (संपा.), इतिहास संग्रह पेशवे दप्तरातील सनदापत्रातील माहिती, निर्णय सागर प्रेस, मुंबई, १९१७.

१०५) वाड ग. चि., पेशवे दप्तरातील सनदा पत्रातील माहिती, निर्णय सागर छापखाना, मुंबई, १९०७.

१०६) वाकसकर वि. स.(संपा.), श्री. छत्रपतीची ९१ कलमी बखर, श्री लक्ष्मी नारायण प्रेस, मुंबई, १९३०.

१०७) वाकसकर वि. स. (संपा.), श्री. शिवछत्रपतीची ९१ कलमी बखर आणि भोसले घराण्याचे चरितावली, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९६२.

१०८) शिवदे स. स., महाराज्ञी येसूबाई, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००४.

१०९) शेजवलकर त्र्य. शं., निजाम-पेशवे संबंध, पुणे विद्यापीठ, पुणे, १९६३.

११०) शेजवलकर त्र्य. शं., श्री. शिवछत्रपती संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना, आराखडा व साधने, मराठा मंदिर, मुंबई, १९६४.

१११) सभासद कृ. अ., सभासद बखर, पुणे, १९२३.

११२) सरदेसाई गो.स., मुसलमानी रियासत, खंड-२, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९३ / १९९५.

११३) सरदेसाई गो.स., मराठी रियासत, खंड-१, शहाजी राजे भोसले, शककर्ता शिवाजी, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९/१९९०.

११४) सरदेसाई गो.स., मराठी रियासत, खंड-२, उग्रप्रकृती संभाजी स्थिर बुद्धी राजाराम, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९/१९९१

११५) सरदेसाई गो.स., मराठी रियासत, खंड-३ पुण्यश्लोक शाहू : पेशवा बाळाजी विश्वनाथ, पेशवा बाजीराव, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८९/१९११

११६) सरदेसाई गो.स., मराठी रियासत, खंड-४, पेशवा बाळाजी उर्फ नानासाहेब पुण्यश्लोक शाहू, छत्रपती रामराजा, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९०.

११७) सरदेसाई गो.स. (संपा.), परमानंद काव्यमअनुपुराण (देवस्त गोविंद), गायकवाड ओरिएंटल सीरीज, वडोदा, १९५२.

११८) सरदेसाई गो. स.(संपा.), पेशवे दप्तर, खंड ५ ते ३२, गव्हर्नमेंट सेंन्ट्रल प्रेस मुंबई, १९३०, १९३२

११९) सरदेसाई गो.स., कुलकर्णी कृ.पा., काळे आ.मा. (संपा.), ऐतिहासिक पत्रव्यवहार, समर्थभारत छापखाना, पुणे, १९३७ .

१२०) सरकार जगुनाथ (अनु.), कोलारकर रा.गो., औरंगजेब (India under Aurangjeb), डायमंड पब्लिकेशन, पुणे, २००६.

१२१) सहस्त्रबुद्धे पु.ग., महाराष्ट्र संस्कृती, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, १९७९.

१२२) साने का.ना. (संपा.), काव्येतिहास संग्रह, ऐतिहासिक पत्रे, याद्या वगैरे, डेक्कन कॉलेज प्रकाशन, पुणे, १९३०.

१२३) साने का.ना. (संपा.), चिटणीस मल्हार रामराव विरचित, थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, पुणे, शके १८१५.

१२४) साने का.ना. (संपा.), श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज यांचे चरित्र, मल्हार रामराव चिटणीस विरचित, पुणे, १९१५.

१२५) सासवडकर प्र.ल., साधना आठवले, मराठी सत्तेचा विकास आणि ऱ्हास, सदाशिव प्रकाशन, १९७४.

१२६) सासवडकर प्र.ल., श्री राजयोगी परमहंस श्री ब्रह्मेंद्रस्वामी सरस्वती धावडशीकर, अमृतधारा, रविवार पेठ, सातारा, १९८५.

१२७) सेतुमाधवराव पगडी (संपा.), माराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (खाफीखानाचा साधन ग्रंथ), जोशी-लोखंडे प्रकाशन, पुणे, १९६२.

१२८) सेतुमाधवराव पगडी (संपा.), मोगल आणि मराठे (तारीखे दिल्कुशा भिमसेन सक्सेना), ठोकळ प्रकाशन, पुणे, १९६३.

१२९) सेतुमाधवराव पगडी (भाषां.), मोगल-मराठा संघर्ष (फुतुआते आलमगिरी रहुतुते शिवाजी), चित्रशाळा प्रेस, पुणे, १९६४.

१३०) सेतुमाधवराव पगडी, मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), ज्ञानराज प्रकाशन, पुणे, १९६३.

१३१) सेतुमाधवराव पगडी (अनु.) मोगल दरबाराची बातमीपत्रे, खंड-३, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, १९८९.

१३२) सेतुमाधवराव पगडी, निजामाची अप्रकाशित पत्रे, नवभारत टाईम्स.

१३३) सेतुमाधवराव पगडी, मराठे निजाम, भू. म. ग्र. सं., मुंबई, १९६१.

१३४) सोमनी स.वि., महाराष्ट्राचे मानकरी, शब्दवेध प्रकाशन, पुणे, १९९५.

१३५) हेरवाडकर र. वि. (संपा.), मल्हार रामराव चिटणीस-विरचित, थोरले शाहू महाराज यांचे चरित्र, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९७६.

१३६) हेडवाडकर र. वि. (संपा.), मल्हार रामराव चिटणीस-विरचित, श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज आणि थोरले राजाराम महाराज यांची चरित्रे, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९७२.

**English Bibliography:-**

1] Bernier F., Travels in the mogul Empire, 2 Ed., London, 1869.
2] Carr E.H., What is History, Continental publication, Mumbai, 1954.
3] Dighe V. G., Peshwa Bajirao I and Maratha Expansion, Karanatak Pab. House, Bombay, 1944.
4] Deopujari M.B., Shivaji and the maratha art of war, Vidharbh sanshodhan mandal, Nagpur, 1953.
5] Duff Grant, History of maratha, Aviskar publication, Jaypur, 1986.
6] Duff Grant, History of maratha, Vol.-3, Oxfored University press, 1921.
7] Elphistone, History of India, Elphiston publication, 1866
8] Joshi P.M., Expansion of maratha power (1707-1761) Government central press, Bombay, 1957.
9] Kelkar N.C., Apte D.V.(ed.), English Records on Shivaji, vol-II, Shivacharitra Karyalaya, Poona, 1931.
10] Mahajan V.D., The muslim rule in India, S. Chand and co., Delhi, 1962.
11] Mujumdar R.C., The Maratha supremacy, Bhartiya vidya Bhavan, Bombay, 1977.
12] Sardesai G.S., Poona Residency correspondence Bombay Govt. central press. 1956.
13] Sarkar Jadunath, Poona Residency correspondence-I, 1936.
14] Sarkar Jadunath, History of Aurangzib, vol-IV, M.C. Sarkar and sons, Calcutta, 1928.
15] Sarkar Jadunath, History of Aurangzib. Vol.-V, M.C. Sarkar and sons, Calcutta, 1928.
16] Sarkar Jadunath, House of Shivaji, Calcutta, 1948.
17] Sarkar J. (ed.), Fall of the moghal Empire, vol-I, Calcutta, 1948.

18] Sen Surendranath, Administrative System of the maratha, Uni. of Calcutta, 1924.

19] Storia do Mogor Mougul India, 1653-1704, By Niccolao manacci venation, translated with Introduction and notes by wiliam Irvine, London, vol-V, 1907.

20] Tarabai papers, shivaji University, Shivaji University press, Kolhapur, 1968.

**नियत कालिके :-**

१) खोबरेकर वि.गो. (संपा.) 'इतिहास आणि संस्कृती', तुंबर मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई.

२) जोशी अ.ग. (संपा.), मराठवाडा संशोधन मंडळ (वार्षिक).

३) भारत इतिहास संशाधेन मंडळ (संपा.), भारत इतिहास संशोधन मंडळ, त्रैमासिक, पुणे, १९२०.

४) राजवाडे वि.का. (संपा.), 'संशोधक', राजवाडे संशोधन मंडळ, धुळे.

५) रोडे सोमनाथ (संपा.), मराठवाडा इतिहास परिषद, निवडक शोधनिबंध, खंड-४, औरंगाबाद, १९९९.

६) रोडे सोमनाथ (संपा.), मराठवाडा इतिहास परिषद, निवडक शोध निबंध, खंड-५, २०००.

७) विविध ज्ञान विस्तार, मासिक, सन-१९९३.

**English:-**

१) Buleteen, Pune Deccan college.

२) Indian History Congress, New Delhi, Yearly.

३) Journal of Indian History, Indian council for Historical Research.

# ऐतिहासिक व्यक्तींची हस्ताक्षरे

छत्रपती शाहू महाराज यांचे पत्र

(पेशवा बाजीराव यांना लिहिलेले पत्र - इ. स. १७२० - १७४०)

ओक प्रमोद, पेशवे घराण्याचा इतिहास,
ऋतुपर्ण अनिरूध्द कुलकर्णी, पुणे, २००१

# औरंगजेबाच्या छावणीतील येसूबाई व शाहूराजे यांचे मुक्काम




कि.मी.0 ते 450 450 ते 600 600 ते 900 900 पेक्षा जास्त

0 20 40 60 80




डॉ. सदाशिव शिवदे, महाराज्ञी येसूबाई,
पद्मगंधा प्रकाशन, पुणे,२००४



छत्रपती संभाजीमहाराज व राजेशाहू

डॉ.सदाशिव शिवदे, महाराज्ञी येसुबाई, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, २००४

307.9



छत्रपती शाहूमहाराजांचे जन्मस्थळ, गांगवली,
ता. मानगांव, जि. रायगड



छत्रपती शाहूमहाराजांचे जन्मस्थळा जवळील नदी,
काळ नदी म्हणुन वोळखली जाते



छत्रपती शाहूमहाराज निर्मीत उद्यान, सातारा



छत्रपती शाहूमहाराज यांनी बांधलेले कृष्णेश्वर मंदीर, सातारा



छत्रपती शाहूमहाराजांचे शिलालेख
कृष्णेश्वर मंदीर येथील, सातारा



छत्रपती शाहूमहाराज निर्मीत कृष्णेश्वर मंदीराजवळील विहीर



छत्रपती शाहूमहाराज निर्मीत ब्रम्हेंद्रस्वामी
धावडशी यांचे मंदीर, धावडशी



छत्रपती शाहूमहाराजाच्यां तक्त्याच्या वाड्यातील विहीर